# आजकालचे विद्यार्थी



ले.—प्रो. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.



पहिली आवृत्ति

इ. स. १९५०

मूल्य ] २॥ रु.

# प्रास्ताविक

पुस्तक वाचूं लागण्याच्या आधीं अनुक्रमणिका वाचावी अशी विनंति आहे. अनुक्रमणिकेंत केवळ प्रकरणांचीच यादी दिलेली नाहीं. प्रत्येक प्रकरणांतील प्रत्येक परिच्छेदांत आलेल्या विषयाचें नांव पृष्ठांकवार दिलेलें आहे. हा तपशिल आगाऊच वाचलेला असला तर पुढील प्रकरणांचें वाचन ओळखीनें होऊं लागेल.

'आजकालचे विद्यार्थी' असें जरी या पुस्तकाचें नांव असलें तरी यांत कॉलेजमधील विद्यार्थी व विद्यार्थिनी यांचाच विचार मुख्यतः केलेला आहे. कॉलेजचे चालक, प्राध्यापक, रेक्टर्स, सैनिकी शिक्षणाचे हवालेदार, पालक, विद्यार्थिनी, विद्यार्थी, सरकारी शिक्षणखातें, इत्यादि अनेकांचा संबंध यांतील लेखांत आलेला आहे. त्यांचे रागलोभ थोडेबहुत खिजणें स्वाभाविक आहे. कांहीं कांहीं प्रकरणांत मी गेलों आहें त्यापेक्षांही जास्त खोलांत जावयास हवें होतें असें कोणाकोणास वाटेल. पण इतर मर्यादा असल्यामुळें, सर्वच्या सर्व विचार दरवेळीं, पूर्णतया सांगतां येणें साधत नाहीं.

वसंत मासिकांत लिहिलेल्या लेखांची डागडुजी करून व त्यांत थोडी भर घालून ते या पुस्तकांत दिले आहेत. माझे मित्र श्री. गजाननराव ठोकळ यांनीं पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाचा भार शिरावर घेतला हे त्यांचे माझ्यावर उपकारच आहेत. मैत्रीच्या पोटीं त्यांनीं हें केलें आहे. त्यांचे आभार मी मनापासून मानतों.

नातूबाग १७।८।५०
पुणें २.

श्रीपाद महादेव माटे

३ त्यांची छानछुकीची हौस— २५

( १ ) विद्यार्थी ओंगळ दिसतात !—२५ ( २ ) स्वच्छतेचें मान कमी झालें आहे—२६ ( ३ ) विद्यार्थिनींचें तसें झालेलें नाहीं—२७ ( ४ ) विद्यार्थिनींना निराळाच उत्साह वाटत आहे—२८ ( ५ ) विद्यार्थ्यांच्या मनाचें चलनवलन—२९ ( ६ ) विद्यार्थ्यांचें औदासिन्य —३० ( ७ ) मनोगतें व पेहराव—३१ ( ८ ) कलेची आवड सध्यां फैलावत आहे—३२ ( ९ ) विद्यार्थ्यांचें औदासिन्य दूर केव्हां होईल—३३ ( १० ) नखरा नको पण शोभा हवी—३४ ( ११ ) नटूं नये असें विद्यार्थ्यांना वाटावें हें नवलाचें आहे—३५

४ विद्यार्थ्यांची विनोद-बुद्धि— ३६

( १ ) विनोद कोणीं कोणीं शिकविला ?—३६ ( २ ) टारग्या विनोदाचे प्रचारक—३७ ( ३ ) अश्लील व्यंजना—३९ ( ४ ) मुली फटकळ नसतात; विनोदांत तिऱ्हाइत खर्चीं पडेनात !—४० ( ५ ) विनोदाचे सोज्वळ वळण—४१ ( ६ ) काइ बिच, काइ सुया, घ्या ग बाई—४२ (७) 'मावशीबाई आल्या; बाळंतीणबाई आल्या'—७४ ( ८ ) ' वरहि वरायास पाहिजे समज '—४५

५ मुली आणि कॉलेजचें सहशिक्षण— ४७

( १ ) स्त्री-शिक्षण कां वाढत आहे ?—४७ ( २ ) इतरांचे आगरकर अजून यावयाचे आहेत !—४९ ( ३ ) आतां कोंडमारा होत नाहीं —४९ ( ४ ) मुलींची संख्या भराभर वाढत चालली आहे—५० ( ५ ) मुलींची संख्या केंव्हा रोडावते—५१ ( ६ ) ' सहशिक्षण नको ' म्हणणारे—५२ ( ७ ) स्वतंत्र शिक्षणसंस्थेचा अर्थ—५३ ( ८ ) मुलींचें कॉलेज कां बुडालें ?—५३ (९) स्वाभिमानी सुशिक्षित मुली—५४ ( १० ) सुशिक्षित स्त्रियांच्या मनाचें चालू काळांतील मुख्य लक्षण—५६ ( ११ ) स्पर्धाळु सुशिक्षित स्त्री—५६ ( १२ )

पुरुषाचे लक्षण 'जपणूक'; स्त्रीचें लक्षण 'स्पर्धा'—५७ ( १३ ) मुद्यांची बेरीज—५७.

६ मुलांमुलींचें लग्नाचें वय व त्यांचें संमिश्र जीवन— ५८

( १ ) गृहस्थिति बदलली आहे—५८ ( २ ) सुशिक्षित मुलींचा स्वार्थत्याग—५९ ( ३ ) श्रीमंत हे गरीबांना अनुसरतात—६० (४) मुलें लग्नेच्छु केव्हां झालेलीं असतात—६१ ( ५ ) तुरग-ब्रह्मचर्य—६१ ( ६ ) सौंदर्य कमी होतें—६२ ( ७ ) परस्परांचें आकर्षण—६३ ( ८ ) परस्पर-ओढीचें प्राथमिक स्तबक—६३ ( ९ ) आई-बापांनीं मुलांचे मित्र बनावे!—६४ ( १० ) आईबापांचा संताप—५५ ( ११ ) प्राध्यापकांवर जास्त विश्वास?—६६ ( १२ ) ही जबाबदारी आईबापांचीच आहे—६६ ( १३ ) मनाची बैठक बदलणें अवश्य आहे—६७

७ विद्यार्थी-विद्यार्थिनींचें आरोग्य— ६८

( १ ) मुलें सुदृढ नसतात?—६८ ( २ ) तालमीची संवय पुन्हां लावली पाहिजे—६९ ( ३ ) दलांनीं तालिमखाने अवश्य काढावे—६९ ( ४ ) घरांतील माणसांना मिळणारें आश्वासन—७० ( ५ ) फिरावयास जाणारांनीं चांगलें बलदंड असावें—७१ ( ६ ) वैद्यकीय [illegible]रीक्षा—७२ ( ७ ) व्यसनाची प्रवृत्ति—७३ ( ८ ) विद्यार्थिनींच्या आरोग्याविषयीं—७४ ( ९ ) सुधारणा म्हणतां म्हणतां विश्रांति गेली!—७५ ( १० ) फॅशनचा जुलूम—७६ ( ११ ) यौवन-शोभा कायमची जात नाहीं—७७

८ मुलांमुलींचे प्रीतिविवाह व पालकांचीं कर्तव्यें— ७९

( १ ) पालकांची झोपमोड—७९ ( २ ) प्रीतिवि[illegible]ण अ[illegible]ावा —८० ( ३ ) सांपत्तिक दृष्टिही आड येते—[illegible]ातलें म[illegible] वें

जात—८३ ( ५ ) गृहशिक्षण-संस्थेची पुनःस्थापना—८४ ( ६ ) घराच्या बाहेरचें जीवन बकाल आहे—८५ ( ७ ) भावी बदलाचीं उगमस्थानें विद्यामंदिरांतच आहेत—८६

९ विवाहविषयक वादळें— ८७

( १ ) कॉलेजांतील मुलें लग्नोत्सुकच असतात—८७ ( २ ) स्त्रीपुरुष-भाव पुष्ट होण्यास व्यवसाय कारण होतो—८८ ( ३ ) स्त्री–पुरुष या मुद्यावर समाजाची वाटणी करूं नये—८९ ( ४ ) प्रीतिविवाहाचा आगम अटळ आहे—९० (५) मोकळेपणा म्हणजे अनीति नव्हे—९१ ( ६ ) सर्व जातींतील मुली भरसंख्येनें कॉलेजांत आल्यानें—९१ ( ७ ) जोंपर्यंत राज्यशासनयंत्र डळमळित आहे—९३ (८) मुलींच्या जीवितांत पडलेला फरक—९४ (९) आगरकरांनीं सासवांस दिलेली नोटीस—(१०) संसारावर आक्रमण चालूं देणार नाहींत—९६

१० सुशिक्षित मुलींना कांहीं सूचना— ९८

( १ ) फिरावयास जाणें ही संस्था—९८ ( २ ) कांहीं गोष्टी मना-विरुद्ध घडणारच—९९ ( ३ ) स्थळ पतकरतांना डोळसपणा हवा—१०० ( ४ ) नापसंती स्वच्छ सांगावी—१०१ ( ५ ) सुशिक्षित मुलांची शेरेमारी—( ६ ) असंतुष्ट आत्म्याचें टपाल–खातें—१०३ ( ७ ) जमणाऱ्या लग्नांत बिब्बा—१०४ ( ८ ) तिखट प्रति[illegible]र करावा—१०५ ( ९ ) कांहीं पोरांचा खोडेलपणा—१९७ ( १० ) वेषभूषा नखरेल असूं नये—१०७

११ नैतिक आचरणाचें बीजारोपण १०९

( १ ) [illegible]नें मनें चालित होणारच—१०९ ( २ ) अभ्यासावर वा[illegible]ीत नसावा.—१०८ ( ३ ) विपरीत परिणाम गृह-[illegible]ं येतील—११० ( ४ ) विद्यार्थ्यांचा उच्छृंखलपणा

# विद्यार्थ्यांची बौद्धिक पातळी कमी होत आहे काय ? १

वयानें मोठ्या झालेल्या पुष्कळ लोकांचा असा एक समज झाला आहे कीं, सध्यांच्या विद्यार्थ्यांत बुद्धीचें मान कमी होत चाललें आहे. पूर्वीं आपल्या काळीं विद्यार्थी विशेष बुद्धिमान् असत पण अलीकडे दिवसें-दिवस त्यांच्या बुद्धीचा निखालस ऱ्हास होत चालला आहे, असा धाक या लोकांना वाटतो. हा अंदेशा प्रगट करणारीं माणसें चांगलीं सुबुद्ध, जबाबदार, आणि समाजाची काळजी वाहणारीं असतात. मागें जें झालें तें चांगलें, सध्यांचें कसेंबसेंच असतें, आणि पुढें तर वाईटच वाढून ठेवलेलें आहे, ही जी एक सामान्य लोकांच्या विचाराची पद्धति असते, तिचा आणि वरील लोकांच्या अभिप्रायाचा मुळींच संबंध नसतो. या लौकिक विचारपद्धतींतून आपल्या बौद्धिक अधिकारानें ते बाहेर पडलेले असतात; आणि बुद्धीचा ऱ्हास होत चाललेला आहे असें वाटावयास त्यांना मधून मधून कांहीं कारणेंही सांपडतात. अर्थात् अशा जबाबदार माणसांच्या मताचा आपण अस्तिबुद्धीनेंच परामर्श घेतला पाहिजे.

शिक्षणखात्यांत वागत असलेल्या माणसांचें हेंच मत होईल असें मला वाटत नाहीं. बुद्धीचा ऱ्हास होत चाललेला आहे हें खरें नव्हे. तो तसा होत आहे याचीं कांहीं प्रत्यक्ष प्रमाणें असतीं, कांहीं हिशेब झाले असते, तर प्रतिप्रमाणांनीं आणि हिशेबांनीं त्यांना उत्तर देतां आलें असतें. परंतु अशीं प्रमाणें किंवा असे हिशेब माझ्या तरी अवलोकनांत आलेले नाहींत. आपल्या या मित्रांचें केवळ स्थूल रूपाचें हें एक निरीक्षण आहे, इतकेंच काय तें. म्हणून त्यांच्या समाधानासाठीं एवढें सांगितलें म्हणजे पुरेसें व्हावें कीं, असा ऱ्हास होत चाललेला नाहीं.

आपल्या शाळाकॉलेजांतून निरनिराळ्या ज्ञातींची मुलें भराभर दाखल होत चाललेलीं आहेत, इकडे आपलें लक्ष असावयास हवें. या मुलांच्या घरच्या पीठिका विद्यासंपादनाला फारशा अनुकूल नसतात; त्यांच्या घरांत ही विद्येची नवीच प्रथा पडत आहे. मुलगा हें काय वाचीत आहे, लिहीत आहे, आणि तोंडानें म्हणत आहे याकडे सर्वथा अशिक्षित बाप केव्हां कौतुकानें, केव्हां अभिमानानें, तर केव्हां भयानें सुद्धां बघत असतो. मुलें जें पठण घरीं करीत असतात त्याच्या बऱ्यावाईटाची चर्चा करणें, हें या पालकांच्या आटोक्याच्या बाहेरचें असतें. आणि सांगितलें तर पुष्कळ विद्यार्थ्यांना थोडा रागहि येईल, पण ही गोष्ट खरी आहे कीं, आपण कांहीं नवेंच शिकत राहिलों आहों आणि आपल्या वडिल माणसांना त्याची कांहींच माहिती नाहीं या जाणिवेनें मुलांना थोडासा पोकळ डौल उत्पन्न होतो ! तीं आईबापांकडे अस्फुट अशा अवहेलनेनें पाहूं लागतात ! आईबापांना केवळ निर्विकल्प आनंद वाटावा किंवा भय वाटावें आणि मुलांच्या मनांत कांहींशी अवहेलनेची बुद्धि जागृत झालेली असावी, हें घरचें वातावरण विद्यार्जनाला फारसें पोषक आहे असें म्हणतां येत नाहीं. उपलटक्षीं पांढरपेशा समाजाचें पहा. मुलांचें अभ्यास घरांत चालू असले म्हणजे वडिलधारीं माणसें त्यांच्या त्या अभ्यासावर बारीक दृष्टि ठेवतात, किंवा निदान ठेवावयाची म्हटलें तर तें त्यांना शक्य असतें. ज्यांना आपल्या मुलांना कांहीं वैचारिक साहाय्य करतां येतें ते हें साहाय्य करतातहि; आणि प्रसंगविशेषीं वर्गाच्या शिक्षकाची आपल्या मुलापुढें थोडीबहुत हजेरीही घेतात. यांत जरी थोडासा मौजेचा भाग असला, तरी मुलाच्या अभ्यासाला घरांत अनुकूल वातावरण उत्पन्न करण्याला याचा फारच उपयोग होतो; आणि शेवटीं त्याच्या एकंदर प्रगतीवर सुद्धां याचा परिणाम होतोच होतो. मागसलेल्या विद्यार्थ्यांना हा फायदा अर्थातच मिळत नाहीं. आणि म्हणून पुष्कळदां त्यांच्या अभ्यासाची तयारी कमी आहे असें वर्गांत दिसून येतें. पण हा बुद्धि कमी असल्याचा पुरावा मात्र खास नव्हे.

कांहीं कांहीं जातींत मागसलेपणाच्या जोडीला दारिद्र्य येऊन बसलेलें असतें. घरांत जागा अगदीं कमी असते, म्हणजे एकच खोली असते. रात्रींच्या वेळीं तेल जाळण्याची ऐपत नसते. अवश्य तेवढीं पुस्तकें विकत घेण्याला पुरेसा पैसा पालकांपाशीं नसतो. पुढारलेल्या विद्यार्थ्यांच्या घरापासून यांचीं घरें दूर अंतरावर असल्यामुळें या बाबतींत मैत्रीचा जो फायदा होण्यासारखा असतो त्यालाही हीं मुलें मुकतात. आपल्या आधुनिक शिक्षणक्रमांत, साधनांवर पुष्कळच भर असतो. पाट्या, पेन्सिली, टांक, दौत, वह्या, पट्टया, कंपासपेट्या, हीं सर्व साधनें आवश्यक बनलेलीं आहेत. दरिद्री बापाला हीं साधनें आपल्या मुलाला उपलब्ध करून देणें सर्वथा अशक्य असतें. विद्यार्थी आपलें काम या साधनांवांचून चालवितो. अर्थात् तेवढ्यापुरतें त्याचें काम कमी कसाचें बनत जातें. आणि हें महिनोन्महिने होत राहिलें म्हणजे हा विद्यार्थी बाकीच्या विद्यार्थ्यांपेक्षां मागसलेला आहे असें दिसूं लागतें. पण हा त्याच्या पिंडगत बुद्धीच्या कमीपणाचा दोष नव्हे. विशेषतः अस्पृष्ट समाजांतील विद्यार्थ्यांचे या बाबतींतील हाल खरोखर पाहण्यासारखे, म्हणजे पाहून कष्ट होण्यासारखेच असतात. अशाही स्थितींत हे सर्व विद्यार्थी विद्यार्जनाचें काम हौसेनें करीत आहेत हें पाहून नवल वाटतें. आपल्या देशांतील दारिद्र्य ही मत्ता केवळ मागसलेल्या लोकांच्याच वाट्याला आलेली आहे, असें मीही समजत नाहीं. पांढरपेशा लोकांतहि शेकडों आईबापें अशीं आहेत कीं आपलीं मुलें कशींतरी लळतलोंबत पुढें चाललेलीं आहेत, हें पाहून त्यांचें अंतःकरण तिळतिळ तुटत असतें. परंतु या दारिद्र्यामुळें विद्यार्थ्यांचें जरी नुकसान होत असलें आणि त्याचा परिणाम त्याच्या अभ्यासावर होत असला, तरी घरांत चालत आलेल्या पीठिका, सुखवस्तू मित्रांचा शेजारधर्म, इत्यादिकांचा उपयोग त्यांना होतोच होतों, आणि होत असलेल्या नुकसानाचीं थोडीबहुत भरपाई होते. पण मागसलेल्या जातींतील मुलांच्या बाबतींत या नुकसानभरपाईला मुळींच जागा नसते. अर्थात् इतर मुलांच्या मानानें तीं वर्गांत मागें राहिल्या-

सारखीं दिसतात; आणि स्थूल मानानें पाहणाऱ्या माणसांना असें वाटतें कीं यांची बुद्धीच कमीं प्रकारची असावी. परंतु याहून बलवत्तर पुराव्याच्या अभावीं त्यांचें हें मत पत्करतां येत नाहीं.

आणखीही एक विचार लक्षांत घ्यावयास हवा. ज्यांना मागासलेले म्हणण्याची वहिवाट आहे, त्यांच्यांतसुद्धां पांढरपेशे ह्या नांवाला पात्र असलेले लोक पुष्कळ असतात. येथें पांढरपेशा या शब्दाचा थोडासा खुलासा करणें इष्ट आहे. जमिनीच्या दोन जाती असतात हें पूर्वी लोकांनीं ओळखलेलें होतें; एक पांढरी आणि एक काळी. या दोन जाती एक-मेकींपासून सर्वथा अलग पडलेल्या असत असें नाहीं. पण काळ्या जमिनीच्या विस्तारांत मधेंच कोठें तरी पांढरी, म्हणजे पांढरसर, म्हणजे मुरमाडाची, म्हणजे टणक अशी जमीन असे. माणसांना वस्तीला जागा हवी होती आणि खायला अन्न हवें होतें. म्हणून त्यांनीं या टणक अथवा पांढऱ्या जमिनीवर वस्ती केली आणि भोंवतालच्या काळ्या जमिनींत धान्यें पेरलीं. अर्थात् शेवटीं काळी या शब्दाचा अर्थ शेतजमीन असा झाला, आणि पांढरी या शब्दाचा अर्थ गांवठाण असा झाला. या गांव-ठाणांत म्हणजेच पांढरींत बसून जे आपला धंदा चालवितात ते पांढरपेशे लोक होत. हळूहळू, पांढरींत कामें करणारे म्हणजे सांवलींत बसून कामें करणारे, असा अर्थ उपन्न झाला आणि या लोकांनाच पांढरपेशे हें नांव मिळालें. वास्तविक पाहतां जे कोणी लोक घराच्या बाहेर राबत नाहींत-ते सारे पांढरपेशेच होत. पण या शब्दाचें आकुंचन होतां होतां तो फक्त ब्राह्मण, प्रभू इत्यादि लोकांनाच लागू पडूं लागला.

कांहीं अज्ञ लोकांना असें वाटतें कीं पांढरा सफेत असा स्वच्छ झळक फळक पोषाख करणारे ते पांढरपेशे होत. पण हा त्यांचा समज कसा चुकीचा आहे हें आतांच सांगितलेल्या उपपत्तीवरून ध्यानांत येईल. अशा ह्या मोठ्या अर्थानें जे लोक पांढरपेशे आहेत आणि जे चांगले पैकेवाले

आहेत, त्यांतील कांहींच्या मनांतही विद्येच्या संबंधानें एक विशेष प्रकारची उपेक्षा वागत आलेली आहे. विद्या शिकणारा मनुष्य फार झालें तर कारकुनी करतो; आणि दहापांच रुपड्यांसाठीं मांडी पालथी घालून आणि मानेवर खडा घेऊन सकाळपासून संध्याकाळपर्यंत राबत बसतो, हें चित्र या गबर लोकांनीं शतकानुशतकें पाहिलेलें होतें. अर्थात् लिहिण्यावाचण्यासंबंधानें त्यांच्या मनांत एक तिरस्कारयुक्त उपेक्षा उत्पन्न झालेली होती. आपल्या पदरचा घोडा ठेवावा, स्वारीशिकारीला जावें, पराक्रम गाजवावा, जमल्यास लूट मिळवून आणावी; हें ज्यांना साधत नाहीं त्यांनीं घरांत गुरें बाळगावीं, आपलीं शेतें आपणच करावीं, आपलीं कोठारें गडगंज भरावीं, पोराबाळांनीं दूध दहीं खाऊन डरकाळ्या फोडीत शेताच्या बांधावर खुशाल फिरावें, अशी कांहीं एक विशेष प्रौढीची भावना, सध्यां आपण ज्यांना मागसलेले समजतों त्यांच्यांतील श्रेष्ठ लोकांच्या मनांत कायमचें मूळ धरून राहिलेली होती. ही उपेक्षाबुद्धि आधुनिक काळांतील विद्येच्या उपासनेला थोडा तरी दंश केल्याशिवाय कधींहि राहत नाहीं. अर्थातच आपण एका समृद्ध पीठिकेंतून बाहेर पडून दुसऱ्याच एका दरिद्री–पीठिकेंत प्रविष्ट होत आहों, या समजुतीनें या जातींतील गबर पालकांचीं मुलें आपल्या अभ्यासाची थोडीबहुत हेळसांड करतात आणि तेवढ्यापुरते तीं मागें पडतात. हा समज ओसरत चाललेला आहे हें खरें. परंतु त्याचीं पावलें अजूनही स्पष्ट दिसतात. मागसलेल्या जातींच्या मागसलेपणाची ही आणखी एक खूण आहे. पण त्यांची बुद्धीच कमी असल्याचा हा पुरावा आहे असें मात्र नव्हे.

मागसलेल्या जातींतील विद्यार्थ्यांच्या बाबतींत आणखी एक मुद्दा ध्यानांत ठेवावयास हवा. एकंदर समाजांतील किती तरी पालकांना आपल्या मासिक मिळकतीच्या बळावर प्रपंचाची तोंडमिळवणी करतां येत नाहीं; पण आपल्या मुलांनीं शिकावें असें तर त्यांना वाटतें. आतां, मुलांना गरिबीच्या स्थितींत शिकविणें ही कांहीं साधी गोष्ट नाहीं. आईबापांना, विशेषतः

आईला पोटाला चिमटा घ्यावा लागतो आणि प्रसंगविशेषीं आपण अर्ध-पोटीं राहून किंवा कोठें तरी अधिक काबाडकष्ट करून मुलाच्या शिक्षणाची व्यवस्था त्यांना करावी लागते. पांढरपेशा समाजांतील शेंकडों आई-बापांना आणि विशेषतः आयांना हा अनुभव नेहमींच येत असतो. पण कितीही हाल झाले तरी मुलाला शिकवावें आणि शहाणें करावें, असा सात्त्विक हट्ट या समाजांतील मातापितरांच्या पोटांत कायमचा उत्पन्न झालेला असतो. हेंही सामाजिक भांडवलच आहे. या बळावर मुलांचें विद्यार्जन होतें; परंतु, ज्या मुलांच्या आईबापांना हेंही होण्यासारखें नसेल तीं मुलें मधुकरी मागतात किंवा वारानें जेवतात. आपण भिक्षांदेही केवळ पोठासाठीं करीत नसून विद्यार्जनासाठीं करीत आहों, ही जाणीव या मुलांना असल्यामुळें या व्रतांतील मानहानीची त्यांची लाज थोडीशी तरी कमी होते. ज्या आईबापांना आपल्या मुलानें पत्करलेलें हें व्रत उघड्या डोळ्यांनीं बघावें लागतें त्यांच्या मनाची कालवाकालव अनुभवानें किंवा कल्पनेनेंच ओळखावयास हवी. परंतु, पिढ्यानूपिढ्या विद्यार्जनाचा आग्रह घरांत कायम झालेला असल्यामुळें या असिधाराव्रताचें दुःख मुलें आणि त्यांचे आई-बाप दोघेंही खुषीनें सोसतात. अशा प्रकारची सात्त्विक परंतु जहरी पीठिका मागसलेल्या ज्ञातींच्या घरांतून अजून प्रस्थापित झालेली नसल्यामुळें, विद्यार्थ्यांना कामाला लावण्याचा मोह पालकांना आवरतां येत नाहीं. त्यागाची बुद्धि या लोकांत कमी आहे असें मला मुळींच म्हणावयाचें नाहीं. फक्त मुलांच्या विद्येसाठीं तो त्याग करावा लागतो ही जागृति त्यांना अजून प्राप्त झालेली नाहीं. हा जागृतीचा अभाव आणि धादांत दारिद्र्य या दोहोंचा संगम होऊन मुलांना कोठें तरी कामाला चिकटवण्याची बुद्धि पालकांत आपोआप उत्पन्न होते. एवढ्या बालवयांत द्रव्यार्जन व विद्यार्जन हीं दोनही कामें मुलांना झेंपण्यासारखीं नसतात. स्वाभाविकपणेंच मुलांच्या अभ्यासावर याचा विपरीत परिणाम होतो.

मागसलेल्या जातीचीं मुलें कमी बुद्धिमान आहेत असें अजून तरी कोणाला म्हणतां येणार नाहीं. वर सांगितलेले विचार लक्षांत घेतले म्हणजे या बाबतींत अवश्य तो पुरावा उपलब्धच झालेला नाहीं, असेंच अनुमान करावें लागतें. उलट, अशी हलाखी असतांना सुद्धां आणि पीठिकांची प्रतिकूलता असतांना सुद्धां मागासलेल्या जातींतील कित्येक विद्यार्थी इतरांच्यांशीं प्रत्येक क्षेत्रांत स्पर्धा करतात हें पाहून समाधान वाटतें.

पुढारलेल्या वर्गांतील विद्यार्थ्यांच्या संबंधानेंही या बाबतींत कांहीं लिहितां येण्यासारखें आहे. विद्यार्थ्यांची बुद्धि कमी झालेली आहे असें मुळींच वाटत नाहीं. मागल्या पिढींतील लोकांनीं बुद्धीच्या आणि तरतरीच्या ज्या कसोट्या ठरविल्या होत्या, त्या कसोट्यांचाच मान आधुनिक काळांत कमी झालेला आहे. परंतु याला मुलांचा कांहीं इलाज नाहीं. सध्यां मुलांना कांहींही पाठ येत नाहीं, त्यांना व्याकरणाचा गंधही नाहीं, व्युत्पत्ति त्यांच्या गांवींही नाहीं, हे प्रकार पाहिले म्हणजे मागील पिढींतील माणसांना असें वाटूं लागतें कीं हीं पोरें बुद्धीनेंच दरिद्री झालेलीं आहेत. पण हें अनुमान चुकीचें आहे. या गोष्टी त्यांना येत नाहींत याचें खरें कारण हें आहे कीं, त्या त्यांना कधीं शिकविलेल्याच नसतात. ही विद्याखात्याची हेळसांड आहे; हा मुलांच्या बुद्धिमत्तेचा कमकुवतपणा नव्हे. ‘ डिरेक्ट मेथड,’ ‘ डिरेक्ट मेथड,’ या नांवाचें जें एक बंड इकडे पंचवीस–तीस वर्षांपूर्वी अवतरलें, त्यांत एकदोन बऱ्या गोष्टी झाल्या. मुलांना थोडा चुणचुणीतपणा प्राप्त झाला. प्रश्नोत्तरांची लज्जत त्यांना प्राप्त झाली. पण या लाभाच्या मानानें या पद्धतीनें हानी मात्र फार केली. विद्यार्थ्यानें घरीं कांहीं करावें लागतें, अभ्यासाचा आखाडा घरीं मांडावा लागतो, ही जुनी पीठिका ह्या पद्धतीनें उध्वस्तच केली. तिनें पाठांतरावरील विश्वास उडविला, व्याकरणाची हेळसांड केली, आणि व्युत्पत्तीकडे पाठ फिरविली. आणि हें परदेशांतून आलेलें त्रियाणें येथें कमी फोंफावलें कीं काय असें

वाटून स्वकीयांनीं शुद्धलेखनावरच घाव घातला. कोणच्या तरी एका प्रकारचें कां होईना, पण शुद्धलेखन सक्तीनें शिकवावें लागतें, या गोष्टीकडे लक्ष राहिलें नाहीं, आणि जुन्या शुद्धलेखनाला वाङ्मयांतलि श्रेष्ठ लोकांनीं सुद्धां प्राणघातक टोला दिला. दुसऱ्या अंगानें वर्तमानपत्रांतील खिळाऱ्यांनीं आणि तिसऱ्या अंगानें मागसलेल्या जातींतील विद्यार्थ्यांनीं आणि लेखकांनीं या संस्थेवर जोराचा हल्ला चढविला आणि शुद्धलेखन साफ मरून गेलें. अवश्य त्या गोष्टींचा असा हा नायनाट झाल्यामुळें विद्यार्थ्यांच्या ज्ञानाला कसलेंही आंखीव रूप राहिलें नाहीं; आणि वाङ्मयाच्या नव्हाळींतील थोडीशी पचपच मात्र त्यांच्या पदरांत पडली.

परंतु या कामीं विद्यार्थ्यांकडे कसलाही दोष येत नाहीं. सरकारी विद्याखात्याचा आणि मागील पिढींतील भाषासुधारकांचा हा गुन्हा आहे. मुलांची बुद्धि कमी झाली आहे असें ज्यांना वाटतें, त्यांनीं या चार गोष्टींची हत्या करणाऱ्या लोकांनाच जबाब विचारला पाहिजे. आपण गुन्हे करावे आणि मुलांना धोपटावें हें वडिलपणाला मुळींच शोभत नाहीं. वर सांगितलेल्या पद्धतीचे जे थोडेसे आग्रही उपासक अजूनही येथें राहिलेले आहेत, ते सांगतात कीं आमच्या या अभिनव पद्धतींत हें हत्याकांड मुळींच सांगितलेलें नाहीं. परंतु हा त्यांचा सावरण्याचा प्रयत्न आहे इतकेंच काय तें! ही नवी पद्धति येऊन शाळेंत दाखल झाल्याचा काळ मी स्वतः डोळ्यांनीं पाहिलेला आहे; अनुभविलेला आहे; आणि त्या पद्धतीच्या उपासकांचें कृत्रिम समर्थन मुलांना कसें फुसलावी हेंही मीं पाहिलेलें आहे. झालेल्या नुकसानाचा बोभाटा झाल्यानंतर, ‘ आपल्या कानीं सात खडे ’ म्हणण्याचा हा उपाहास्य प्रयत्न आहे. पण आतां तें सारें विसरावयास हवें. प्रस्तुतचा मुद्दा असा आहे कीं पूर्वींच्या पिढींतील लोकांनीं ठरविलेल्या ज्या ज्ञानाच्या यथार्थ कसोट्या होत्या त्यांना मानच न राहिल्यामुळें विद्यार्थी त्या बाबतींत कमी पडतात; आणि मग लोकांचा असा समज होतो कीं हे नव्या काळांतील विद्यार्थी बुद्धीनेंच कमी असले पाहिजेत.

वरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांच्या जीवितावर विद्यार्थीदशेंतच आधुनिक काळांत जें नवेनवे संस्कार होत आहेत तेही या बाबतींत लक्षांत घ्यावयास हवेत. एक दीड पिढीच्या मागें विद्यार्थ्यांच्या मनाला अभ्यासाशिवाय दुसरें व्यवधानच नव्हतें. त्यांच्या मनाच्या सर्व शक्ति अभ्यासावरच केंद्रित होत असत. त्यांतील चढाओढी हाच त्यांचा मुख्य व्यवसाय असे आणि, जणूं कांहीं शाळेंत पुरेसें विद्यार्जन होत नाहीं असें पाहून, कोणी गांवांतील शास्त्री–पंडितांकडे जात, किंवा एखाद्या इंग्रजी पंडिताकडे जात. आपल्या ज्ञानांत स्वतंत्रपणें भर घालण्याचा असाही प्रघात तेव्हां असे. पण, आधुनिक काळांत विद्यार्थ्यांच्या मनाची फारच कुतरओढ चालू असते. ज्या ज्या मानानें विद्यार्थी वरच्या वरच्या वर्गांतला व वयानें अधिक अधिक त्या त्या मानानें ही ओढ त्याला जास्त बसते. आपल्या देशांतील राजकारण टिळकांच्या वेळीं जास्त प्रखर बनत चाललें तेव्हांपासूनचें स्मरण सर्वांनीं अवश्य करावें. जे कोणी त्यांना म्हणत कीं तुम्ही विद्यार्थ्यांना आपल्याकडे ओढतां, त्यांना टिळक हे आपल्या अगदीं करड्या भाषेनें उत्तर देत असत. ते म्हणत, " पेन्शनर हे पेन्शनर म्हातारे म्हणून सभेस यावयास नकोत आणि आले तरी त्यांचा कांहीं उपयोग नाहीं; मध्यमवयीन लोक हे सरकारी नोकर म्हणून त्यांना सभेस यावयास नको; आणि विद्यार्थी हे विद्या शिकतात म्हणून त्यांना आम्ही इकडे ओढतां कामा नये असें तुम्ही म्हणतां. मग आम्ही देशाभिमानाचा संस्कार कुणाच्या मनावर करावयाचा ? " टिळकांच्या या उत्तरांतील मर्म गेल्या तीसपस्तीस वर्षांच्या काळाला सारखें लागू पडत राहिलेलें आहे. हा पुढारी गेला आणि तो आला असें जरी झालें, तरी विद्यार्थी हें भांडवल हातून जातां कामा नये असें प्रत्येकाचें धोरण रहात आलें आहे. अर्थात् देशांत सुरू असलेलें देशाभिमानी राजकारणाचें आवाहन विद्यार्थ्यांच्या मनाला जलद पोंचावें, त्यानें त्या राजकारणाच्या चिंतनांत आणि वादविवादांत प्रत्यहीं वाटेल तितका वेळ घालवावा, आणि मग त्याच्या अभ्यासावर याचा कांहीं परिणाम व्हावा हें सारें ओघानेंच येतें.

शुद्ध आणि विशाल अर्थानें बघितलें तर हेंही एक शिक्षणच असतें. एका बाजूनें नुकसान झाल्यासारखें वाटलें तर दुसऱ्या बाजूनें नव्या पिढीला, आणि म्हणून एकंदर देशाला, लाभच झालेला असतो. परंतु ठराविक कसोट्यांना हीं मुलें उतरतनाशीं झाल्यामुळें तीं बुद्धीनेंच कमी आहेत असा कोणाकोणाचा समज होऊन बसतो.

युरोपांतून अनेक गोष्टींची आवक झाली, त्यांत 'यूथमूव्हमेंट' म्हणजे तरुण लोकांची संघटना या गोष्टीची आवक आपण केली. आणि यांतही कांहीं चुकलें असें वाटत नाहीं. पूर्वीच्या काळीं विद्यार्थीदशा लवकर संपत असे. अठरा-एकोणीस वर्षांच्या वयाला, म्हणजे बापाचा जोडा मुलाच्या पायाला येऊं लागल्याबरोबर, मुलगा गृहस्थाश्रमी बने आणि तो जसा प्रपंचाचा तसाच सार्वजनिक जीविताचाही भार वाहूं लागे. महाराष्ट्राच्या इतिहासांत जीं मोठमोठालीं नांवें आढळतात तीं या दृष्टीनें तपासून पाहण्यासारखीं आहेत. हे लोक अगदीं पोरसवदा असतांनाच राजकारणांत प्रविष्ट झालेले होते. यांतले किती तरी लोक अल्पवयांतच मेले आणि यांनीं कामही पुष्कळ केलें, या दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत. मग हें त्यांना साधलें तरी कसें ? याचें उत्तर हें कीं त्यांनीं कामाला आरंभ फार लहानपणीं केलेला होता. परंतु, विद्यार्थीदशा त्यांनीं आपण होऊन संपविलेली असल्यामुळें आणि ते गृहस्थाश्रमांत दाखल झालेले असल्यामुळें, प्रौढ नागरिक या दृष्टीनें आपण त्यांच्याकडे पाहूं लागतों. आणि सध्यांचे विद्यार्थी वयानें केवढेही झालेले असले तरी ते अजून शिकत आहेत एवढ्याच मुद्द्यावर आपण त्यांना लहान समजत राहतों. विद्यार्थी जर वयानें मोठे आहेत तर त्या वयाला अनुसरून त्यांच्या सार्वजनिक जबाबदाऱ्या वाढाव्या, त्यांचें संघटन व्हावें हें ओघानेंच प्राप्त होतें. अर्थात् युरोपांतून जी तरुण-संघटना नांवाची चळवळ इकडे आली, ती येथें जोरानें फोफावत गेली. आणि ज्या अर्थी ही संघटना कांहीं कामासाठीं व्हावयाची होती, त्या अर्थी विद्यार्थ्यांनीं त्या त्या कामांत पडावें हेंही

ओघानेंच प्राप्त झालें. शिवाय जुन्या काळीं सर्व लोकांनीं शिकावयाची विद्याच मुळीं थोडी असे. सध्यांच्या काळीं ती विद्या फार झालेली आहे. अर्थात् मुलांची विद्यार्थीदशा लांबत चाललेली असते; पण ती लांबत चालली म्हणून त्यांचें वय जेथल्या तेथें राहत नाहीं. तेंही वाढतच असतें. आणि मग त्या प्रौढ वयाला अनुसरून चळवळींतही पडावें असें त्यांना वाटूं लागतें. अर्थात् त्या त्या मानानें अभ्यासावरचें त्यांचें लक्ष कमी होतें. पण मुलांची बुद्धि कमी होत चाललेली आहे याचा मात्र हा पुरावा नाहीं.

परंतु, इतकें लिहूनही, म्हणजे पडलेल्या फरकाचें रूप जितक्या विधायक बुद्धीनें पाहतां येईल तितकें पाहूनही, मला असें वाटतें कीं विद्यार्थीदशेंत ज्या प्रास्ताविक गोष्टी भक्कम बसावयास हव्या असतात त्या बसविण्याकडे शाळाधिकाऱ्यांनीं, पालकांनीं, आणि विशेषतः विद्याखात्यानें अवश्य लक्ष द्यावयास हवें. तें जर त्यांनीं दिलें आणि शिक्षणांत अवश्य ती सक्ति उत्पन्न केली, तर विद्यार्थ्यांच्या मनाला इतर व्यवधानें असूनही त्यांची बुद्धी पूर्वीच्या कसोट्यांना पहिल्यासारखीच उतरूं लागेल.

मुलांची बुद्धि कमी होत चाललेली आहे असें विधान जे कोणी करतात, त्यांच्यापाशीं जो कोणचा पुरावा असेल तो त्यांनीं पुढें मांडला तर त्याचे परीक्षण स्वतंत्रपणें करणें हें शक्य होईल. माझा समज असा आहे कीं विद्यार्थी जुन्या कसोट्यांना चांगले उतरत नाहींत, आणि त्यांच्या अभ्यासाची हेळसांड होते याकडे लक्ष देऊनच लोकांना असा वहिम येऊं लागला असावा कीं, मुलें बुद्धीनेंच कमी होत चालली आहेत. शिक्षणाचा व्यवसाय करणारे लोक त्यांना सांगतील कीं ही आपत्ति समाजावर आलेली नाहीं. अगदीं पहिल्या प्रतीचें यश मिळविणारे किती तरी विद्यार्थी आम्हांला प्रत्यहीं भेटतात. ते जीं उत्तरें वर्गांत देतात किंवा ज्या शंका ते विचारतात त्या पाहिल्या म्हणजे या मुलांची बुद्धि मागल्या पिढींतील मुलांच्या बुद्धीइतकीच तीव्र आहे असें स्वच्छ दिसून येतें. यांतच मुलींच्या बुद्धीची

भर पडल्यामुळें आणि कित्येक वेळां त्या मुलांनाही मागें टाकीत असल्याचें दिसूं लागल्यानें, देशांतील बुद्धीच कमी होत चालली आहे कीं काय, असा प्रश्न शिक्षणाचा धंदा करणाऱ्या कोणत्याही माणसाला पडणार नाहीं. ज्यांना हा प्रश्न उत्पन्न होतो त्यांनीं वरील परिच्छेदांतून सांगितलेल्या बाबींकडे लक्ष दिलें तर तेही या काळजींतून थोडेबहुत मुक्त होतील असा भरंवसा आहे.

---

# शिक्षकांविषयीं विद्यार्थ्यांच्या मनांत आदर उरला नाहीं हें खरें आहे का? २

मला असें वाटतें कीं सध्यांच्या विद्यार्थीवर्गाचा अधिक्षेप करण्यांत टीकाकार लोक जितकी तत्परता दाखवितात तितकी विद्यार्थ्यांची परिस्थिति समजावून घेण्याच्या कामीं त्यांनीं दाखविली, तर समाजाच्या अभ्यासाला तें जास्त हितावह होईल. गुरुजनांच्या संबंधानें विद्यार्थ्यांच्या मनांत आदरभाव नसतो, अशी एक कायमची तक्रार सध्यां ऐकूं येते. जे लोक ही तक्रार करतात त्यांना खचितच असें म्हणावयाचें असतें कीं, विद्यार्थी उर्मट बनले आहेत; वडिलधाऱ्या माणसांना आणि गुरुजनांना आदर दाखवावा, त्यांचा मान ठेवावा ही पूर्वींच्या विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं दिसून येणारी भावना या उर्मटपणामुळें नष्ट झाली आहे; विद्यार्थ्यांचा मनःपिंडच बदलला आहे. त्यांचें म्हणणें असें दिसतें कीं बाकीच्या साऱ्या गोष्टी असावयाच्या तशा आहेत, पण विद्यार्थ्यांच्या मनाच्या ठेवणींत अकल्पितपणें हा एक फरक पडलेला आहे. टीकाकारांची हीं तक्रार डावलून चालावयाचें नाहीं. गुरुजनांच्या संबंधानें दोन पिढ्यांपूर्वीं विद्यार्थ्यांच्या मनांत जी आदरबुद्धि होती ती कमी झाली आहे, यांत कांहींच संशय नाहीं. पण ही तक्रार करतांना विद्यार्थ्याला दोषी ठरविण्याची जी टीकाकारांची उर्मी असते ती मात्र मला बरोबर वाटत नाहीं. म्हणजे आदरभाव कमी झाला आहे किंवा क्वचित् कोठें कोठें समूळ लोपलेला दिसतो हें खरें आहे; पण या कामीं मी विद्यार्थ्यांना दोषी ठरविण्यास मात्र तयार नाहीं. अगदीं मागल्या पिढींत विद्यार्थ्यांच्या मनांत जो आदरभाव होता तो दुसऱ्या पिढीला उरला नाहीं, आणि जो दुसऱ्या पिढीला होता तो सध्यांच्या पिढीला राहिलेला नाहीं; ही ढळती उत्तरोत्तरता मला मान्य

आहे; पण या उतरत्या मापाचें खापर विद्यार्थ्यांच्या डोक्यावर फोडावयास मात्र मी तयार नाहीं.

आपल्या समाजाची ऐपत कशी वाढत चालली आहे, इकडे आपले लक्ष पुष्कळदां जात नाहीं. तीन पिढ्यांपूर्वीपासून आपल्या समाजाची बौद्धिक उंची किती वाढत चालली आहे, हें आपण तपासून पहावें. समाजांत बुद्धिमान्, कलावान्, कर्तबगार, प्रतापी माणसें पूर्वी किती होतीं व आतां किती आहेत, हें पहावें. म्हणजे दिसून येईल कीं विद्वत्ता, शहाणपणा, देशाभिमान, कर्तबगारी या बाबतींत आपला समाज उत्तरोत्तर जास्त समृद्ध होत चालला आहे. गेल्या तीन पिढ्यांतील अशा लोकांची एका एका काळांतील संख्या पहावी, म्हणजे आपल्या वाढत्या समृद्धीची कल्पना आपल्याला येईल. जों जों मागें जावें तों तों ही संख्या लहान आहे, असें दिसून येतें. ज्यावेळीं सरसकट समाजांत विद्वान् व आदरणीय लोकांची संख्या अगदीं कमी होती, त्यावेळीं शिक्षकांसंबंधींचा आदरभाव विद्यार्थ्यांच्या मनांत जास्त असावा, हें रास्तच आहे. विद्वान् व कर्ती माणसें शाळाकॉलेजांच्या परिसरापलीकडे समाजांत फारशीं दिसतच नसत त्यावेळीं शिक्षक हेच विद्यार्थ्यांचें आदरस्थान बनणें क्रमप्राप्तच होतें. त्यांनीं आपल्या आदरबुद्धीचा वापर इतर कोणाच्या बाबतींत करावयास हवा होता असें शोधून पाहिलें, तर शाळाकॉलेजांच्या आवाराच्या बाहेर फारसें कोणी नव्हतेंच असें दिसून येईल. विष्णुशास्त्री चिपळोणकरांचा काळ पहावा व सध्यांचा काळ पहावा. तेजस्वी लेखक, कलावंत लेखक, कर्तबगार पुरुष त्यावेळीं बाहेरच्या समाजांत कितीसे होते तें पहावें व शाळाकॉलेजांत म्हणजे प्रत्यक्ष विद्येच्या व्यवसायांत किती तें पहावें. बाहेरच्या समाजांत फारसें कोणी नव्हतें असेंच दिसून येईल. ठळक नांवें म्हणजे हींच, ना— डॉ. भांडारकर, न्या. रानडे, विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर ? पण हें सारे लोक विद्येच्या प्रभावानें आदरणीय झाले होते व एक रानडे सोडले तर त्यांच्या संबंधींचा आदरभाव शाळा—कॉलेजांतच वाढला होता. यांच्या

वेळीं बाहेरच्या समाजांत ‘ आदरणीय माणसें ’ वाटतील असे लोक कोण होते ? तेच विद्वान्, तेच शिक्षक–प्राध्यापक, व म्हणून तेच आदरणीय. उलट सध्यांच्या काळीं पहा. शाळा–कॉलेजांत जे शिक्षक–प्राध्यापक आहेत त्यांच्यापेक्षां विद्वान्, कल्पक, कलावन्त, कर्तबगार, देशाभिमानी असे लोक बाहेरच्या समाजांतच जास्त आहेत, म्हणजे मुख्यतः बाहेरच आहेत, हें मोजदादीनें सहज दिसून येईल.

सावरकर, जयकर, धनंजयराव, लक्ष्मणशास्त्री, पोतदार, अत्रे, रावसाहेब व अच्युतराव पटवर्धन, भाई डांगे, भाऊराव पाटील, भोपटकर, जावडेकर, न. वि. गाडगीळ, ना. ग. गोरे, एस्. एम्. जोशी, फडके, खांडेकर, य. गो. जोशी, माडखोलकर, यशवंत, कुसुमाग्रज हे व अशासारखे दुसरे दांडगे लोक बाहेरच्या समाजांतच दिसतात. यांच्या मानानें शाळा–कॉलेजांतील माणसें खुजीं दिसतात. बरें, हे लोक नुसतेच आडदांड आहेत व म्हणून विद्यार्थ्यांच्या मनांत भरतात, असें कुणाला तरी म्हणतां येईल काय ? हे कर्ते आहेत, विद्वान् आहेत, त्यागी आहेत. यांच्याशीं तोलून पाहतां शिक्षक–प्राध्यापकांच्या कर्तृत्वाचा कस व व्याप कमी दिसतो. स्वाभाविकपणेंच विद्यार्थी त्यांच्यासंबंधानें उदासीन बनले, तर त्यांत नवल वाटण्यासारखें कांहीं नाहीं. त्या त्या माणसाची आपापल्या विषयापुरती जी योग्यता असेल तिचा गौरव विद्यार्थी नेहमींच करतात. सोयीसाठीं ‘ शिक्षक ’ हा शब्द मी आतां प्रध्यापकांच्या संबंधानेंही योजतों.—असा कोण पटाईत शिक्षक आहे कीं, ज्याच्या विद्वत्तेचा दबदबाट विद्यार्थ्यांच्या मनावर पडला आहे आणि तरीही विद्यार्थ्यांनीं त्याची अवहेलना केली आहे? पण असें असलें तरी त्याच्या कामाचा व्यापच इतका थोडा असतो कीं, आणि सद्यःस्थितींतील विद्यार्थ्यांच्या क्षुधा इतक्या विविध व प्रखर आहेत कीं त्याच्या ठिकाणींच आपली आदरबुद्धि खर्च करावी, असें विद्यार्थ्यांना वाटत नाहीं. त्यांच्या आदरबुद्धीचा ओघ दुसरीकडे वळतोच वळतो.

आपल्या शिक्षकांविषयीं विद्यार्थ्यांच्या मनांत आदरबुद्धि कमी झाली आहे या विधानाचा अर्थ इतकाच घ्यावयास हवा. शिक्षक कितीही हुशार, विद्वान् व कळकळीनें काम करणारा असला तरी विद्यार्थी त्याला आदर दाखवीत नाहींत, हें म्हणणें सर्वथा असत्य आहे. पण जेथें तुलनेचा प्रसंग येतो तेथें वर सांगितलेल्या लोकांकडे त्यांची आदरबुद्धि अधिक तत्परतेनें वळते, हें मात्र खरें आहे. विषय चांगला समजाऊन सांगितला या गोष्टीला पुष्कळच महत्त्व आहे; पण विषय सांगितला व शिवाय कलात्मक रीतीचें किंवा त्यागाचें किंवा उग्र देशाभिमानाचें कर्तृत्वही दाखविलें तर त्या गोष्टीला जास्त अर्थ आहे, हें कोणीही मान्य करील. ज्या काळीं विशेष प्रकारचें कर्तृत्वच उदित झालें नव्हतें आणि केवळ ज्ञान–दानानें प्रकट होणाऱ्या विद्वत्तेलाच मान होता, त्यावेळीं विद्यार्थ्यांनीं आपल्या गुरूच्या संबंधानें नितान्त आदरबुद्धि दाखवावी, हें बरोबर होतें. पण आतां देशांतील आदरस्थानाचा गुरुत्वमध्यच जर दुसरीकडे ढळला आहे तर त्याला विद्यार्थ्यांनीं तरी काय करावें ? माझें म्हणणें असें आहे कीं, आधुनिक विद्यार्थ्यांत केवळ त्याच्या आधुनिकतेमुळें कांहीं लोकविलक्षण फरक पडला आहे, असें मानण्याचें कारण नाहीं. विद्यार्थ्यांच्या शारीरिक जीविताचा कबजा निरनिराळ्या दलांनीं घेतला आहे आणि त्यांच्या मनबुद्धींचा कबजा कर्त्या लोकांनीं घेतला आहे; व अशा रीतीनें दोनही बाबतींत विद्यार्थी विद्येच्या संस्थांतून निश्चयानें बाहेर पडले आहेत. इतकेंच काय, पण या संस्थांचा उपयोग ते आपल्या बाहेरच्या आग्रहांना करून घेत आहेत !

ज्ञानाची कोणचीही शाखा निघो, तिच्यांतील विचाराचीं पुढलीं पुढलीं स्तबकें कोणचीं आहेत हें सांगण्याचें काम बाहेरचे लोक जितके करीत असतात, तितके शाळा कॉलेजांत ज्ञानदानाचें काम करणारे लोक करीत असतात असें वाटत नाहीं. ज्या ज्ञानाला अगदीं आटीव आणि घोटीव रूप प्राप्त झालेलें आहे, तें ज्ञान विद्यार्थ्यांना देण्याची कसोशी शिक्षक

करतात, ही गोष्ट खरी आहे; पण सध्यांचा काळ असा आहे कीं हर-तऱ्हेच्या ज्ञानाला नवे नवे अंकूर सारखे फुटत असतात आणि हें ज्यांच्या बुद्धिमत्त्वामुळें घडून येतें ते लोक बहुधा आपल्या या संस्थांच्या बाहेरचे असतात, ही गोष्ट नाकारतां येणार नाहीं. सिद्ध झालेलें ज्ञान खुलवून सांगणें, निघालेलीं मतमतांतरें गोळा करून आणून तीं विद्यार्थ्यांपुढें मांडणें, एवढेंच काम शिक्षकांना करतां येतें. त्यांच्या हातून नवें संशोधन कसलेंच होत नाहीं. पण मी हा त्यांचा दोष समजत नाहीं. एवढें काम उरकतां उरकतांच त्यांना पुरेवाट होते. आणि या कामाचें महत्त्वही कमी आहे असें नाहीं. परंतु जो नव्या कल्पना काढतो, नवा शोध लावतो, नवें सिद्ध करूं पाहतो, एखाद्या मतपंथाचा आग्रह धरतो, परदेशांतील अपरिचित विचार आणून लोकांपुढें मांडतो, नवी कलाकृति निर्माण करतो, किंवा एखादी लोकोपयोगाची मोठी चळवळ करतो आणि तिचें तत्त्वज्ञान बनवून त्यांचें लक्ष आकृष्ट करून घेतो, तो मनुष्य विद्यार्थ्यांना अधिक आदरणीय वाटावा हें मनुष्यस्वभावाला धरून आहे. बरें, हा माणूस विद्यार्थ्यांना आदरणीय वाटला म्हणजे लगेच आपल्या शिक्षकाबद्दल त्याला अनादरच उत्पन्न होतो, असें समजण्याचें कारण नाहीं. फार झालें तर इतकेंच म्हणतां येईल कीं,. आपल्या नेहमींच्या गुरूपेक्षां या नव्या गुरूबद्दल त्याला जास्त आदर वाटतो. परंतु, जास्त आदर आणि कमी आदर असें हें तारतम्य शिल्लक न राहतां, 'कमी आदर' याचा अर्थ 'मुळींच आदर नसणें' असा होऊन बसलेला आहे. पण ज्यांच्या बुद्धींत हा घोटाळा झालेला नाहीं आणि जे आतां सांगितलेला हा तारतम्य–भाव उमगतात, त्यांना मान्य करावयास हरकत वाटूं नये कीं नवें कल्पिणारे, सांगणारे, आणि आचरणारे असे जे लोक आतांच उल्लेखिले त्यांचा महिमा आपल्या शिक्षकांच्यापेक्षां विद्यार्थ्यांना जास्त वाटावा हें बरोबर आहे.

यांतच आणखी एका विचाराची भर पडली आहे. ज्या राजकीय विचारांना संस्थांचें रूप प्राप्त झालेलें आहे, म्हणजे जे सरसकट समाजाच्या

अंगवळणीं पडले आहेत, जे विचार सरकार–दरबारीं मान्यता पावले आहेत, तेच राजकीय विचार स्वीकार्य आहेत आणि विद्यार्थ्यांनीं तेच पसंत करावे, असा आग्रह पुष्कळ शिक्षक लोक धरतात. ते या विचारांतील समतोलपणा, युक्तिसिद्धता, आणि व्यवहार्यता पटवून देण्याचे यत्न विद्यार्थ्यांपुढें करतात आणि कांहीं कांहीं वेळां तर राजकारणक्षेत्रांत धडाडीनें कामें करणारे लोक जे तेजस्वी विचार जनतेपुढें मांडतात त्यांचा उपहासच ते प्रसंगवशात् जाणूनबुजून करतात. वास्तविक पाहतां या नव्या विचारांची युक्तायुक्तता पृथक्करण–बुद्धीनें तपासून पाहण्याची जबाबदारी त्यांच्यावर मुळींच आलेली नसते. परंतु तें नवें मत त्यांना पसंत नसल्यामुळें थोडीं थोडीं विषयांतरें करून शिक्षक लोक चालू राजकारणावर केवळ टीका करतात, इतकेंच नव्हे तर प्रसंगविशेषीं ताशेरासुद्धां झाडतात आणि मग त्यांना या विषयांतराची किंमत खचितच द्यावी लागते. शिक्षकांबद्दलचा आदरभाव विद्यार्थ्यांच्या मनांत कमी होत जाण्याचें हें आणखी एक कारण आहे.

या कामीं पुष्कळदां पुढारी लोकांच्या हातूनही चुका घडतात. आणि शिक्षकांच्या पदरीं कांहीं दोष नसतांना आपल्याबद्दलचा आदरभाव कमी झाल्याचें दुःख मात्र त्यांना सोसावें लागतें. गेल्या चाळीस वर्षांची आठवण मला चांगली आहे. जेव्हां जेव्हां नवी चळवळ सुरू झाली, तेव्हां तेव्हां पुढाऱ्यांनीं शिक्षणसंस्थांवर हल्ले चढविले. वास्तविक पाहतां अशा प्रकारच्या शिक्षणसंस्था काढणें हें पूर्वीं एक देशाभिमानाचेंच लक्षण होतें. पण पुढल्यापुढल्या चळवळी येऊन ठेपेतोंपर्यंत, टीकाकारांच्या मतानें, या संस्थांना वतनदारीचें, धंद्याचें आणि जुन्या प्रथेचें रूप प्राप्त झालेलें होतें. खरें पाहूं जातां, कोणाचीही जरी चळवळ निघाली, मग ती टिळकांची असो वा गांधींची असो, तरी विद्यार्थ्यांना शिक्षण हवेंच होतें. परंतु त्या शिक्षणावर आणि तें देणाऱ्या संस्थांवर पुढारी लोकांनीं अशी झोड उठविली कीं, आपल्या शिक्षणसंस्था म्हणजे केवळ दुकानें आहेत आणि शिक्षक

म्हणजे देशाभिमानशून्य असे भाडोत्री पोटभरू लोक आहेत, असा प्रत्येक विद्यार्थ्याचा ग्रह व्हावा. चळवळींचे महापूर ओसरल्यानंतर, या संस्थांचा गाडा चालू राहिला आहे एवढेंच दिसून आलें नाहीं तर तो दसपट वेगानें चालू आहे, असें याच पुढाऱ्यांच्या प्रत्ययास आलें ! लोकांना शिक्षण हवें आहे हें नाकारून चालावयाचें नाहीं. चालू आहे यापेक्षां जास्त चांगलें कोणचें शिक्षण द्यावयाचें तें माहीत झालें आणि त्या शिक्षणाला पंडित– वर्गात मान्यता मिळाली, म्हणजे या शिक्षणसंस्था तेंही ज्ञान देऊं लागतील. पण तोंपर्यंत सध्यांचें ज्ञान त्याज्य मानावें, हा आग्रह मात्र पुढाऱ्यांना सोयस्कर वाटला तरी संस्थाचालकांना तारतम्यशून्य वाटतो, आणि सर- सकट जनतेला तर तो केव्हांच पसंत पडत नाहीं. पण या रणधुमाळीची धूळ खालीं बसली आणि या संस्थांचे नित्याचे व्यवसाय पुन्हां सुरळीत सुरू झाले, तरी चळवळीचें 'काव्य' मात्र शिल्लक राहिलेलें असतें ! शिक्षकवर्गाची जी नालस्ती झालेली असते तिचा विद्यार्थ्यांच्या मनावरील परिणाम टिकूनच राहतो. आणि मग हा आदरभाव कमी होण्याला ज्यांचा बेतालपणा कारण झालेला असतो तेच लोक पुन्हा कुरकूर करूं लागतात कीं विद्यार्थ्यांच्या मनांत आपल्या गुरुजनांविषयीं कांहींही आदरभाव राहि- लेला नाहीं. आदरभाव कमी होण्याचें हें आणखी एक कारण झालें.

पुढारी लोकांना अनुयायी हवे असतात. पण हे अनुयायी जर केवळ सामान्य जनसमूहांतील असतील तर आपल्या चळवळीचा दर्जा कमी राहतो म्हणून उच्च प्रकारचें शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थीवर्गातून आपल्या अनुयायी वर्गात मोठी भरती व्हावी, अशी त्यांची खटपट चालू असते. चळवळीला बुद्धीची रोषणाई येत नाहीं, अशी रुखरुख त्यांना लागलेली असते; पण याबरोबर हेंही सांगितलें पाहिजे कीं, आपल्याला प्राप्त झालेला नवा विचार हा अज्ञ लोकांपुढें सांगून उपयोग नाहीं, तो जाणत्या लोकांपुढें मांडल्यानेंच समाजाला त्याचें यथार्थ ज्ञान होईल, असेंही पुढाऱ्यांना वाटतें;

आणि म्हणूनच ते आपला सगळा खजिना विद्यार्थ्यांच्यापुढें रिकामा करतात. त्यांनीं जर एवढेंच केलें असतें तर कांहीं विशेष हरकत नव्हती. परंतु आजवरच्या ज्ञानाची आणि तें देणाऱ्या शिक्षणसंस्थांची नालस्ती करण्याचा धडाका पुढारी लोक चालू करतात! ही काय ती खरी अडचण असते; आणि यामुळेंच शिक्षकांविषयींचा आदरभाव कमी होऊं लागतो.

खुद्द शिक्षकांच्या हातूनही अनेक दोष घडतात; आणि त्यांना नेमणाऱ्या शिक्षणसंस्थाही अनेक प्रकारच्या चुका करतात. या दोघांविषयीं बोलणें हें पुढाऱ्यांच्याविषयीं बोलण्याइतकेंच दुःखकारक आहे; म्हणजे बोलणाराला दुःख देणारें आहे. परंतु आदरभाव कमी होत चालला आहे या विषयाची पूर्तता करण्यासाठीं याचा उच्चार केला पाहिजे. शाळा–कॉलेजांतील नोकरी हा एक सरळ धंदा आहे. या नोकरीला धंदा म्हटलें म्हणजे पुष्कळ लोकांना अवमान वाटतो आणि, ज्ञानदानासारख्या पवित्र कामाला हें बाजारी नांव देणें अप्रशस्त आहे, असें त्यांना वाटतें. परंतु लहानमोठ्या सर्वच शिक्षकांची नोकरी धरण्याची, ती सोडण्याची, बदलण्याची आणि करण्याची तऱ्हा पाहिली म्हणजे हा धंदा आहे असें म्हणावयास मला कांहींच हरकत वाटत नाहीं. आपण जर केलेल्या कामाबद्दल मोबदला घेतों आणि तो योग्य मिळत नसला तर तक्रार करतों, तर आपण एक धंदा करीत आहों असें म्हणावयास हरकत काय म्हणून वाटावी? वास्तविक धंदा करण्यांत कांहींही गैर नाहीं. ही एक उघडउघड देवघेव आहे. या देवघेवींत सचोटी किती राहते, हें आपल्या समाजाच्या उन्नतपणावर अवलंबून आहे. ज्या मानानें समाजाचा हा उन्नतपणा कमी जास्त असेल त्या मानानें सचोटीचें मानही कमी किंवा जास्त राहील.

मला या धंद्यांतील माणसांची जी माहिती आहे तीवरून असें वाटतें कीं, या धंद्यांतील बहुतेक माणसें आपला व्यवसाय प्रामाणिकपणानें करतात. परंतु चुकार शिक्षकांच्या अपवर्तनामुळें विद्यार्थीवर्गांत शिक्षकांच्याविषयीं

अतिशय वाईट मत पसरत जातें. चांगल्या शिक्षकांच्या चांगलेपणाविषयीं विद्यार्थी लोक जितकें बोलतात त्यापेक्षां, वाईट शिक्षकांच्या वाईटपणाविषयीं ते जास्त बोलत सुटतात, हेंही खरें आहे. आणि त्यामुळेंच सामान्य लोकांचा असा समज होतो कीं आपल्या गुरुजनांच्या विषयीं विद्यार्थ्यांना कसलाही आदरभाव राहिलेला नाहीं. पण, जे शिक्षक आपला धंदा प्रामाणिकपणें करतात असें मीं म्हटलें ते प्रामाणिक असले तरी शिक्षकवर्गाविषयीं विद्यार्थ्यांच्या मनांत असलेला आदरभाव कमी करण्याला ते एका निराळ्याच चुकीमुळें कारण होतात. विद्यार्थ्याला असें वाटावें कीं आपला गुरु उत्तम विद्वान् आहे, त्यानें हातीं घेतलेला विषय त्याला चांगला समजला आहे, इतकेंच नव्हे तर त्यानें त्याचें उत्कृष्ट अध्ययन केलें आहे, याच्यापाशीं योग्य त्या ज्ञानाचा मोठा खजिना आहे, आणि आपण जेवढी जेवढी जिज्ञासा प्रगट करूं तेवढा तेवढा हा प्रसन्न होत जातो आणि आपल्या खजिन्याची द्वारें खुलीं करतो; शंका कुशंका हा मोकळ्या मनानें चर्चेला घेतो; आणि जर केव्हां उत्तर सुचलें नाहीं तर आतां सांगतां येत नाहीं असें म्हणण्याचा प्रांजलपणा दाखवितो. आपल्यासमोर बसलेले विद्यार्थी म्हणजे आपलें एक ऋण आहे, असें त्या शिक्षकाला वाटावें आणि खुर्चीवर बसलेला शिक्षक हा ज्ञानानें कितीही श्रेष्ठ असला तरी शेवटीं तो आपला मित्रच आहे अशी भावना विद्यार्थ्यांच्या मनांत उत्पन्न व्हावी.

परंतु पुष्कळदां असें दिसून येतें शिक्षकाचें ज्ञान केवळ चुटपुटतें असतें, त्याला थोडेसुद्धां आजूबाजूला सरतां येत नाहीं; खोल पाण्यांत शिरण्याचें तो जाणून बुजूनच चुकवितो; आणि मी सांगत आहें येवढें तुम्हांला बस्स झालें, असें बजावून जिज्ञासू विद्यार्थ्यांची तोंडें तो बंद करतो. पण विद्यार्थीही चांगले खमंग असतात. त्यांना सगळें कळतें—कुणाचें पाणी किती आहे, हें जोखण्यास विद्यार्थ्यांना फारसा वेळ लागत नाहीं. म्हणून आपल्यासंबंधानें विद्यार्थ्यांच्या मनांत आदरबुद्धि उत्पन्न व्हावी असें ज्याला वाटत

असेल त्यानें आपला ज्ञानाचा खजिना नेहमींच समृद्ध ठेवावा. पण आतांच सांगितल्याप्रमाणें किती तरी शिक्षक लोक आपल्या ज्ञानाचा पल्ला अगदीं चालचलाऊ स्वरूपाचा, तोटका, आणि चुटपुटता ठेवतात. यामुळें हे लोक विद्यार्थ्यांच्या मनांतून अगदीं उरतात. शिवाय, उच्च शिक्षणाच्या कामीं तर केवळ भारवाहकतेचा उपयोग फारसा होत नाहीं. विद्यार्थी आपण होऊन आजूबाजूचें फार थोडें वाचतात हें खरें, पण तेवढयाचा फायदा घेऊन शिक्षकानें जर आपलें वर्गांतलें व्याख्यान म्हणजे केवळ मतमतांतरांचा एक अजबखाना बनविला किंवा कानांत घुमणारीं मोठमोठालीं प्रमेयें उद्‌धृत करून आतषबाजी उत्पन्न केली, तर विद्यार्थी भयंकर अचंबा पावतील, पण त्यांच्या मनांत आदरबुद्धि उत्पन्न होणार नाहीं. शिक्षक महाशयांचा हा उद्‌धृत मतांचा गजबजाट चालू असतां ते मनांत म्हणत असतात कीं आपण हीं मतमतांतरें सांगतां येथपर्यंत बरोबर आहे; पण तुम्हांला स्वतःला कांहीं सांगतां येण्यासारखें आहे काय? बहुतेक वेळां जें घडतें तें हें कीं शिक्षक हा स्वतःच्या मनांत माजलेला मतामतांचा गलबला विद्यार्थ्यांच्या मनांत उतरविण्याची दगदगच फक्त करतो. अर्थातच, याला स्वतःचें असें कांहींच सांगतां येत नाहीं, किंवा या भिन्नभिन्न मतांचा अन्वयही लावतां येत नाहीं, अथवा त्यांचें खंडन करतां येत नाहीं असा कयास विद्यार्थी करतात. हें झाल्यावर त्यांच्या मनांत अशा शिक्षकांविषयीं आदरभाव कसा उत्पन्न होणार? म्हणून शिक्षकानें दसपट तयार करावें आणि एकपट सांगावें अशी पद्धति ठेवली तरच त्याला या कामीं यश मिळेल.

परंतु या कामांत आणखी एकजण जबाबदार आहे. उच्च शिक्षण देण्याला आपल्या मोठमोठाल्या संस्था जीं माणसें नेमतात तीं कित्येकदां अगदीं नवथर आणि पुष्कळदा बालिशसुद्धां असतात. हे तरुण लोक परीक्षेंत पुष्कळ वर आलेले असतात आणि ही गोष्ट त्यांना भूषणावह असते. परंतु चोवीस–पंचवीस वर्षांचा तरुण मनुष्य परीक्षेंत जरी पहिला

आलेला असला तरी त्याला आपल्याकडे बोलावून आणून एकदम प्रबुद्ध विद्यार्थ्यांच्यापुढें उभा करणें हें अप्रशस्त आहे, असें मला वाटतें. यांच्यापैकीं एखाद दुसराच मनुष्य असा निघतो कीं जो अंगावर पडलेलें काम योग्य रीतीनें बजावतो. बाकी किती तरी तरुण लोकांची स्थिति फार चमत्कारिक होते. मी पुढें म्हणतो हें कसें घडवून आणावयाचें हें मला माहीत नाहीं, ती जबाबदारी संस्थाचालकांची आहे. पण या नव्या माणसांची पुष्कळ पहाणी आधींच करावयास हवी. केवळ परीक्षेंत मोठें यश मिळालेलें आहे एवढ्यावर जाऊं नये. त्याला चांगलें बोलतां येतें कां, त्याचा आवाज चांगला मोठा आहे ना, त्याच्या ठिकाणीं कांहीं थोडें व्यक्तिमत्व आहे ना, हेंही संस्थांनीं बघावयास हवें. या बाबीकडे लक्ष न देतां किती तरी तरुण लोकांना विद्यार्थ्यांच्यापुढें आणून उभें करतात आणि मग यांपैकीं अनेकांना नालायक म्हणून बाजूला पडावें लागतें. हा नालायकीचा शिक्का त्यांना पुढें फार बाधक ठरतो. हा एक स्वतंत्रच मुद्दा आहे. पण चालू विषयाच्या दृष्टीनें पहातां संस्थांनीं केलेले हे प्रयोग फारच अपकारक ठरतात. असल्या माणसांची हुर्रेवडी करण्याकडे विद्यार्थ्यांची प्रवृत्ति आपोआपच होते आणि संस्थांच्या चालकांकडून विद्यार्थ्यांना जरब पोंचविण्याचा उपक्रम न झाल्यामुळें वर्गाचा केवळ बाजार बनतो. आणि या होतकरू माणसाच्या भावी जीविताला धक्का बसतो. तो तर बोलून चालून नवीनच असतो. पण त्याची योजना करणारांनीं पुरेशी दक्षता न बाळगल्यामुळें तो वांया जातो आणि विद्यार्थी उच्छृंखल बनतात. म्हणून वक्तृत्व, आवाज, व्यक्तिमत्व इत्यादींविषयीं चालक जर दक्ष राहिले आणि अवश्य तेवढी जरब त्यांनीं विद्यार्थ्यांवर ठेवली तर शिक्षकांविषयींचा मुळांतच थोडासा उरलेला आदरभाव टिकवून धरल्याचें श्रेय त्यांना लाभेल. विद्यार्थ्यांच्या मनांत शिक्षकांविषयींचा अनादर पसरत जाण्यास हेंही एक कारण होतें. असो.

जुन्या काळांतील कांहीं थोर व्यक्तींची नांवें घेऊन वडिल माणसें असें सांगतात कीं आतां तशीं माणसें राहिलेलीं नाहींत. त्यांच्या या उद्गाराचें मर्म शिक्षकांनीं अवश्य ध्यानांत ठेवावें. अर्थात् संस्थेंतील सर्वच्यासर्व शिक्षक त्या व्यक्तींच्या तोलाचे नसत हे सांगण्याची आवश्यकता नाहीं. कारण तसें असतें तर या वडिल माणसांनीं कांहीं थोड्याशाच व्यक्तींची नांवें घेतलीं नसतीं ! पण ध्यानांत ठेवावयाचें मर्म तें हें कीं जर आपण विद्या शिकवितों, ज्ञान देतों, विद्यार्थ्यांचा मनःपिंड तयार करतों, त्यांची दानत बनवितों तर आपलें बोलणेंचालणें, आपला पोषाख, आपला रीतिरिवाज आपला व्यासंग यांकडे शिक्षकवर्गानें फार बारकाईनें लक्ष दिलें पाहिजे. गुरु या शब्दानें जें कांहीं व्यक्त होतें व सूचित होतें तें सारें आपल्या अंगीं आणण्याची शिकस्त शिक्षकांनीं केली पाहिजे. हें त्यांनीं केलें तर विद्यार्थ्यांच्या मनांत शिक्षकासंबंधानें आदरभाव रहात नाहीं, ही खुद्द शिक्षकांची व इतरांची कल्पना साफ नाहींशी होईल. वरील परिच्छेदांतील सर्व विचार एकत्रित करूनही, विद्यार्थ्यांच्या अंगाला कांहींच दोष नसतील, असें मात्र मला म्हणावयाचें नाहीं.

---

# त्यांची छानछुकीची हौस ३

विद्यार्थी विशेष छानछोकपणानें वागतात असें कांहीं लोकांना वाटतें. बघावयास गेलें तर दिसून येईल कीं सध्यांच्या छानछुकीची किंमत पूर्वीच्या छानछुकीच्या किंमतीहून कमी आहे. सध्यांच्या विद्यार्थ्यांचा पोशाख खरोखर अगदीं कमी किंमतीचा असतो. बहुतेकांनीं कोट घालण्याचें सोडून दिलें आहे आणि टोपीचाही खर्च आतां त्यांच्यांतील फार थोडे लोक करतात. अंगांत एकावर एक कपडे घालण्याची प्रवृत्ति नाहींशी झालेली असून एका सदऱ्यानें बहुतेकांचें भागतें. कांहींजण तर याच्याही पुढें जाऊन कोपऱ्या किंवा दंडकीच घालतात. थोडे दिवसांपूर्वींपर्यंत चांगल्या मुंडा हात रुंदीच्या आणि आंतल्या तंगडीच्या चारपांच पट पोकळ अशा उरफाट्या शिवणीच्या विजारी, म्हणजे कापडी नळे, घालण्याची प्रथा होती. आतां तेंही गुडघ्यापर्यंत आलें आहे आणि पांढरें कापड मागें पडून एखादें मळखाऊ कापड वापरण्याकडेच प्रवृत्ति झालेली आहे. पायांत बूट न घालण्याची चालच बळावत चालली आहे आणि विशेष दिमाख म्हणजे पठाणी वहाणा असून, सरसकट साधीं पायताणें घालण्याची चाल पडली आहे. मग यांत छानछुकीला जागा तरी कोठें आहे ? मुलें केस राखतात; पण केसांची विशेष निगा ठेवण्याची दगदगही फारसें कोणी करीत नाहीं. कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या वेषभूषेचें हें वर्णन अगदीं यथार्थ आहे कीं नाहीं हें कोणीही पहावें. सध्यां विद्यार्थी वागतात त्यापेक्षां जास्त टापटिपीनें व शोभेकडे लक्ष देऊन वागलें तर मला बरें वाटेल. हें मी पुरुष विद्यार्थ्यां-संबंधानें सांगत आहें. वर्गांत बसलेल्या रांगाच्या रांगा पहाव्या म्हणजे मनावर संस्कार होतो तो हा कीं हे लोक थोडे ओंगळ आहेत ! अंगावरचा कपडा स्वच्छ ठेवावा, इकडंसुद्धां असावें तितकें लक्ष विद्यार्थीवर्ग देत नाहीं.

याला कारणें आहेत तीं विविध प्रकारचीं आहेत. गरीबी, युद्धकालीन तोटकेपणा, अनुकरण, दलवेष, उपेक्षा इत्यादि कारणांनीं विद्यार्थ्यांच्या पोषाखाला सध्याचें ओंगळ आणि थिटें रूप आलें आहे. खरोखर विद्यार्थी थोड्या छानछोकीनें वागते तरी बरें होतें! या मानानें मागचे विद्यार्थी मोठे नटवे असत; आणि असें असतांही सध्यांच्या विद्यार्थ्यांच्या छानछोकीबद्दल वडील माणसांनीं तक्रार करावी याचें नवल वाटतें.

बंगालच्या फाळणीनंतर जी स्वदेशीची चळवळ सुरू झाली तिच्या वेळीं विद्यार्थीवर्गाच्या पोषाखांत एकदम फरक पडला. ही चळवळ पुरती व्यापक होईपर्यंतच्या काळांतले विद्यार्थी मोरासारखे नटत असत. विलायती वस्तु वापरण्यांतच ज्याला त्याला भूषण वाटत असल्यामुळें आणि विलायती वस्तु तलम, मोहक आणि रुबाबदार असल्यामुळें विद्यार्थ्यांचा पोषाख फार सुंदर दिसत असे. पण स्वदेशी चळवळ सुरू झाली आणि हा नूर पालटला. एक सदरा व वर सोलापुरी किंवा मद्रास चेकचा एक जाडाभरडा कोट हा नेहमींचा पोषाख झाला. थंडी असली तर एक भरड सुताचा गंजीफ्राक आंतून घालावयाचा अशी पद्धत पडली. इटॅलियन कॅप्स् किंवा नानाप्रकारच्या वेलबुट्टी काढलेल्या टोप्या मुलांच्या डोक्याला असत. त्या जाऊन देशी कापडाच्या टोप्या तेथें आल्या. विद्यार्थीवर्ग हा पुरता स्वदेशी बनला. तेव्हांपासून विद्यार्थ्यांच्या रुचींत व अभिमानांत नाना प्रकारचे फरक पडत आले आहेत. पण सध्यांच्या इतका ओंगळपणा व तोटकेपणा पूर्वीं कधींही पाहिलेला आठवत नाहीं. सध्यांच्या हातखादीचा इतकासा परिणाम महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांवर झाला नाहीं; आणि ज्यांच्या बाबतींत तो झाला त्यांनीं ओंगळपणाला भरतीच आणली. गेलीं सहा वर्षें तर महागाईनें जीव खाल्ला आहे आणि कापडाचें दुर्भिक्षच झालें आहे. पूर्वीं विद्यार्थी आपलीं धोतरें धुऊन स्वच्छ ठेवण्यांत भूषण मानीत. नाहीं तर धोतरें धुण्याचा धंदा करणाऱ्या लोकांवर अवलंबून रहात. सदाशिवपेठचा हौद

हें मोठें नमुनेदार ठिकाण होतें ! किती तरी धोतरबडवे लोक याच्या फरसावर धोतरें धुण्याचा उद्योग करून पोट भरीत. मुलांचीं धोतरें बहुतेक करून स्वच्छ असत. हळूहळू रशियन मताच्या तरुण लोकांनीं वर सांगितलेल्या अतीव पोकळ विजारी रूढ केल्या. पहिल्या पहिल्यानें, दिसावयास बेढब असलेल्या विजारीसुद्धां स्वच्छपणामुळें सुरेख दिसत. पण खादी जशी महाराष्ट्रांतील मध्यमवर्गीयांना स्वच्छ ठेवतां येईना तशाच या विजारीही ठेवतां येईनाशा झाल्या. गुजराथी लोकांच्या अंगावरची खादी बघा, आणि आपल्या लोकांच्या अंगावरची बघा. गुजराथी लोकांनीं खादीचा पोषाख हें एक सौंदर्यवर्धनाचें साधनच बनविलें आहे. आमच्या लोकांनीं या व्रतांतून निघणारा ओंगळपणा आणि बेडौलपणा खुषीनें पत्करला आहे. विजारीही ओंगळ झाल्या, कारण त्यांच्या पुरेशा जोड्या जवळ बाळगणें व त्या वरचेवर परटाकडे देणें हें मुलांना झेपेनासें झालें. धोतरांचा स्वच्छपणा नित्य धुण्यामुळें शिल्लक राही तोही गेला आणि हीं पोकळ कणगुलीं आपल्या ओंगळपणाचें प्रदर्शन करीत अंगावर राहिलीं. वर सांगितलेंच आहे कीं या विजारीही दूरच होत चालल्या आणि आतां खादी किंवा तत्सम जाडेंभरडें व मळिण वाणाचें कापड यांच्या केलेल्या अत्यंत लांड्या विजारी मुलें घालूं लागलीं आहेत. एकंदरीनें पाहतां मुलांचा पोषाख स्वच्छता, शोभा आणि टापटीप या दृष्टींनीं अगदीं शेवटच्या टप्प्यावर येऊन बसला आहे.

स्त्री विद्यार्थी म्हणजे विद्यार्थिनीं यांचे वेष मात्र निराळे आहेत. मुलींना नटण्यासवरण्याची सवय आधींच असते. कॉलेजांत आल्यानंतर त्यांची सौंदर्यसाधनाची बुद्धि पुष्ट होते आणि पालकसुद्धां मुलांच्या पोषाखांत जितका पैसा खर्च करतात त्यापेक्षां जास्त मुलींच्या पोषाखावर करतात. वर्गांतील मुली ओंगळ दिसत नाहींत, याचें कारण इतकेंच आहे कीं त्यांचे वेष स्वच्छ, रंगीबेरंगी, व टापटिपीचे असतात. वस्त्र रोज बदलल्यानें स्वच्छ

रहातें; पातळें, लुगडीं, आणि गोलनेसणीं नानाप्रकारच्या रंगांचीच केलेलीं असतात आणि टापटीप हा मुलींचा उपजत गुण दिसतो. मुलें भोंगळपणांतच सुख मानूं लागलीं आहेत. पण मुलींनीं तरी वेषभूषा कायम ठेविली आहे इतकेंच नव्हे तर थोडी जास्तच आल्हादकारक बनविली आहे. शिवाय केशभूषेच्या बाबतींत आधुनिक काळांत विलक्षण स्थित्यन्तर झालें आहे. तीन पेडांचे चाक रद्द होऊन केसांचा अंबाडा झाला. अंबाडा आवळला खरा पण मागच्या बाजूला थोडा ढिला होऊं लागला आणि त्यांतून गळून पडलेल्या फुलांवर कवि गुंजारव करूं लागले. होता होतां संगळे पेड एकमेकांपासून मोकळे सुटले, आणि पाठीवर रुळूं लागले. त्याचे आणखीही कांहीं पर्याय झाले. गंगावन रानटी म्हणतां म्हणतां फारच लोकप्रिय बनलें आणि वनगाईच्या केसांचीं गंगावनें हळूहळू मागें पडून माणसांच्या केसांचीं अमलांत येऊं लागलीं. वेणींवरचा गजरा अंबाड्यावर आला. तेथून तो ओघळता होऊन मानेवरील केसापर्यंत आला आहे आणि "शेपट्या"च्या टोकाला गोंडाही रुळूं लागला आहे. अशी ही विद्यार्थीनींच्या केशभूषेची उत्क्रांति आहे. गोलनेसण हें सरसहा चालू झालें असून लुगडें नेसण्यानें अकालीं पोक्तपणा आल्यासारखें दिसतें असा मुलींचा समज झालेला आहे. हात जवळजवळ सारे मोकळे टाकणें या सौंदर्यप्रसाधनाला रूढीचें रूप प्राप्त झालें आहे. क्वचित् कोठें उंच टाचांच्या वहाणा डोकावूं लागल्या आहेत; पण सरसहा म्हणजे आपली नेहमींची वहाणच अजून टिकून आहे. मुलींच्या हातांतील बांगड्या बहुतेक लोपल्या आहेत. एकादी बांगडी कांचेची किंवा सोन्याची घालण्याची प्रवृत्तिही बळावली आहे.

उभय जातींच्या विद्यार्थ्यांच्या वेषांचें केलेलें हें वर्णन वाचलें म्हणजे दिसून येईल कीं मुलांचा पोषाख हा स्वच्छता, शोभा, व टापटीप या बाबतींत अगदीं खालावला आहे आणि मुलींचा वेष मात्र या तीनही दृष्टींनीं

लक्षांत भरण्याइतपत सुरेख राहिला आहे. या फरकाची उपपत्ति कांहीं अंशीं तरी बसवितां येईल असें वाटतें. आपण शिक्षण घेऊं लागलों आहों; त्यांतही उच्च शिक्षणांत प्रविष्ट झालों आहों; आपण पुरुषांच्याशीं बरोबरी प्रस्थापित करीत आहों; जुन्या जळमटांतून बाहेर पडत आहों; आपल्यालाही कांहीं स्वतंत्र बुद्धि आहे; अशा प्रकारच्या कांहीं उत्तेजक जाणिवेचें आसन मुलींच्या मनांत कायम झालेलें आहे; त्या कसल्या तरी विरश्रीच्या अभिमानानें नटलेल्या आहेत. सकाळचें ऊन खाण्याचा आनंद त्या भोगीत आहेत. आतांपर्यंत झालें आहे हें कांहींच नव्हे, आम्हांला अजून किती तरी विजय मिळवावयाचे आहेत, अशी एक गूढ अहंता त्यांच्या ठिकाणीं दृढ झाली आहे. बंधविमोचन हा या काळाचा संदेश स्त्रीविमोचनापुरता त्यांनीं फार बारकाईनें ऐकला आहे व तें विमोचनाचें काम आपण पुढें नेणार आहों असा एक अस्फुट व साकारता न पावलेला चेतनेचा आविष्कार त्यांच्या मनांत होत आहे.

विद्यार्थ्यांच्या मनाचें चलनवलन, सार्वजनिक जीविताच्या दृष्टीनें सध्यां अगदीं निराळें आहे आणि विद्यार्थीनींच्या मनाचें अगदीं निराळें आहे. विद्यार्थी राजकारणाचा आणि कांहीं अंशीं समाजकारणाचा विचार करीत असतात. ते निरनिराळ्या संघटनांच्या मागें आहेत; परंतु विद्यार्थिनी या मात्र स्त्रियांच्या बंधविमोचनाच्या आतांपर्यंत सफल झालेल्या कल्पनाचाच उपभोग घेत आहेत व नवीन कल्पनांची जुळणी आपल्या मनाशीं करण्यांत, कदाचित् न कळतच गुंतलेल्या आहेत. स्त्री–जीवनापलीकडे त्यांची दृष्टि गेली आहे असें वाटत नाहीं. मुलें काय किंवा मुली काय, कांहीं मंडळी अशी असावयाचीच कीं ज्यांचें लक्ष कोणीकडेच नाहीं. पण नवीन कल्पनांच्या जुळणींत जरी या मुलींचें मन गुंतलेलें नसलें तरी विमोचनाच्या ज्या कल्पना अंमलांत आलेल्या आहेत त्यांचा भोग मात्र या सर्व मुली केवळ वारसाहक्क म्हणूनच आतां घेत आहेत.

कांहीं मुली राजकीय ध्येयवादांत सुद्धां सांपडलेल्या दिसतात. परंतु यांचें प्रमाण इतकें अल्प आहे कीं, त्यांच्याविषयींचा स्वतंत्र उल्लेख करण्याची आवश्यकता नाहीं. विद्यार्थीवर्ग मात्र प्रतिजबाबी बनलेला आहे. आज ज्याला जें राजकीय किंवा सामाजिक ध्येय पसंत पडतें त्याच्याशीं तो इतका तन्मय झालेला असतो कीं, प्रसंग येईल तेव्हां तेव्हां आपल्या प्रतिजबाबीपणाचा आविष्कार तो मोठ्या उत्सुकतेनें करतो. कोणी कांहींहि म्हणोत, विद्यार्थ्यांची प्रवृत्ति गंभीरच झालेली आहे. अजून निबर न बनलेल्या त्याच्या मनावर ही गांभीर्याची छाया सतत टिकून राहणें अर्थातच अशक्य आहे; म्हणून केव्हां केव्हां त्याच्या हातून थिल्लरपणा सुद्धां होतो. परंतु जेव्हां राष्ट्रांत एकादें नवें वारें वाहूं लागतें, एकादा नवा प्रश्न उत्पन्न होतो, एकादा नवा पुढारी त्यांच्यापुढें उभा राहतो, तेव्हां तेव्हां अपेक्षित जाब द्यावयास विद्यार्थी नेहमीं तत्पर असतात, ही गोष्ट नाकारून चालावयाचें नाहीं. विद्यार्थिनींच्या मनाचा सध्यांचा स्थायीभाव विमोचनानें प्राप्त होत असलेलें उत्तेजन हा आहे, आणि विद्यार्थ्यांच्या मनाचा स्थायीभाव कसल्या तरी एकाद्या नव्या प्रश्नाचा विचार, संघटना, आणि चळवळ हा आहे. मला असें वाटतें कीं, हे स्थायीभाव त्यांच्या पोषाखांत चांगले व्यक्त होतात.

आमच्या जीवितांत स्त्रियांचा प्रवेश अर्थातच उशीरां झाला आहे; त्यांचे प्रश्न मुख्यतः स्त्रीजीवितासंबंधींचेच असल्यामुळें त्यांचें मन त्यांतच मग्न राहावें आणि मिळत चाललेल्या यशानें तें उत्तेजित व्हावें, हें अगदीं स्वाभाविक आहे. आधुनिक जीविताचा प्रवास पुरुषांनीं थोडा आधीं सुरू केला असल्यामुळें आणि पुरुषजातीचे असे स्वतंत्र प्रश्न त्यांच्या मनाशीं नसल्यामुळें विद्यार्थी एकदमच राष्ट्रीय विचाराच्या आखाड्यांत शिरतात आणि त्या ठिकाणीं प्राप्त होणारा एक तऱ्हेचा राकटपणा, बेफिकीरी, कांहींसा बेतालपणा त्यांच्या वृत्तींत आपोआपच दिसूं लागतो. जो वृत्तींत

दिसतो तो त्यांच्या वेषांतहि व्यक्त होतो. मागें सांगितल्याप्रमाणें युद्धकालीन परिस्थितीमुळें वेषावर अधिक पैसा खर्च करणें त्यांना शक्यहि नसतें, हा विचार अर्थातच जमेस धरावयास हवा. पण माझ्या मतें, स्वच्छता, शोभा आणि टापटीप या बाबतींत त्यांचा वेष इतका खालीं उतरण्याचें खरेंखुरें कारण म्हणजे त्यांना प्राप्त झालेलें औदासिन्य होय. या औदासिन्याची जाणीव दरवेळीं त्यांच्या मनांत जागृतच असली पाहिजे असें नाहीं. परंतु त्यांच्या मनाचा कब्जा, अजूनहि कुंचबत पडलेलें आपलें जें राजकीय व समाजिक जीवित आहे, त्यानें प्राप्त होणाऱ्या औदासिन्यानेंच घेतला आहे. विद्यार्थीनींच्या मनाचें चलनवलन हें या प्रकारचें नाहीं. स्त्रीविमोचनाकडे त्यांच्या मनाचा मुख्य कल आहे. या दोघांचीहि प्रगति जर बरोबर झाली असती, म्हणजे पुरुष पुढें गेलेले आणि बायका मागें राहिलेल्या असें जर झालें नसतें, तर हेंच औदासिन्य मुलींनासुद्धां आलें असतें. परन्तु त्यांच्या मनाचें चिंतनच निराळें आहे; आणि त्यांत चळवळीच्या सफलतेचें उत्तेजन मिश्रित झालेलें आहे.

मुलांना ज्या चळवळी प्रिय वाटतात, त्या अजून थबकून राहिलेल्या आहेत आणि म्हणून एक तऱ्हेचें सूक्ष्म औदासिन्य त्यांच्या मनाला आलेलें आहे. दोघांच्याहि पोषाखांत या भावना हरतऱ्हेनें व्यक्त होतात असें मला वाटतें. विद्यार्थीनी ही मनानें थोडीशी सुखी असेल असें वाटतें. त्या मानानें विद्यार्थी कांहींसा कष्टी असावा असें दिसतें. तो कोठच्या तरी प्रवासाला निघाला आहे, पण कुचंबला आहे असें दिसतें. माझी खात्री आहे कीं, उद्यां जर आपल्या अर्थरुप राजकीय चळवळी यशस्वी झाल्या, जिकडेतिकडे चळवळीच्या साफल्याचा आनंद पसरला आणि युद्धजन्य परिस्थिति पूर्ण लोपून बाजारांना पहिली रोषनाई पुन्हा प्राप्त झाली, तर विद्यार्थी मुलींच्यापेक्षांहि उंची आणि नखऱ्याचे पोशाख करूं लागतील. प्राप्त झालेला आनंद ते खरोखर याच साधनांनीं

व्यक्त करूं लागतील. हें पृथक्करण करतांना मी मुलींना दोषी ठरवितों असें समजणें म्हणजे माझा मुद्दा मी अजूनहि सुस्पष्ट केला नाहीं असेंच समजावें लागेल. दोघांची उत्थानभूमीच निराळी आहे; त्यांचीं विचारांचीं क्षेत्रेंच भिन्न भिन्न आहेत; त्यांच्या मनाचें चलनवलनच निराळें आहे, आणि त्यामुळें हा फरक पडलेला आहे. दारिद्र्य दोघांनाहि लागू आहे. परन्तु सौंदर्याचें जें साधन हस्तगत होण्यासारखें आहे त्याचा उपयोगसुद्धां विद्यार्थी करतात असें दिसत नाहीं. डोक्यावरचे केस नीट ठेवणें, ते स्वच्छ ठेवणें, त्यांच्यावर अवश्य ते ते संस्कार रोज करणें, या गोष्टींना विशेष खर्च येतो असें नाहीं. परन्तु थोड्या वर्षांपूर्वींपर्यंत त्यांच्या ठिकाणीं केसांची निगा ठेवण्याची जी प्रवृत्ति दिसत असे, तीसुद्धां सध्यां अगदीं लोपलेली दिसते. असो. विद्यार्थ्यांच्या पोशाखाविषयीं लिहितांना आणखीहि एका गोष्टीचा उल्लेख करावयास हवा.

पूर्वींच्या. काळापेक्षां सध्यां तरुण लोकांना कलेचें ज्ञान जास्त झालेलें असतें. गायन, वादन, नर्तन, नाटक, सिनेमा यांची ओळख आधुनिक काळांतील तरुण लोकांना जितकी आहे तितकी पूर्वींच्या तरुण लोकांना खचितच नव्हती. सध्यां सौंदर्याची दृष्टि जास्त बारीक झालेली आहे. ही कलात्मकता उत्पन्न करण्यास आणि वाढीस लावण्यास ‘ चित्रपट ’ हा मुख्यतः कारण झालेला आहे. त्याच्याकडून मिळालेली कलात्मकता तो सगळीकडे शोधूं लागतो. त्याच्यापुढें जे वाङ्मयाचे नमुने सध्यां येतात त्यांतहि कलेचा प्रसार फारच मोठा असतो. निबंध–लेखन ही कला आहे खरी. परंतु कादंबरीलेखन, नाटकलेखन, लघुकथालेखन, यांच्यांतील कला ही जास्त खोल आणि व्यापक असते हें कोणीहि मान्य करील. किंबहुना तिच्यावरच या वाङ्मयाचा मुख्य भर असतो. गेल्या कांहीं वर्षांत या वाङ्मयाचा प्रसार आपल्या देशांत फार झपाट्यानें होत राहिला आहे. अर्थात् ज्याप्रमाणें सिनेमा पाहिल्यानें, त्याप्रमाणेंच हें वाङ्मय वाचल्यानेंहि

तरुण माणसाची कलादृष्टि ही अधिक सूक्ष्म बनलेली आहे. पूर्वीच्या काळीं तरुण लोकांच्या कानावर जितकें संगीत जात असे त्याच्या दसपट संगीत सध्यांच्या काळीं जात आहे. हे सारे लोक गवयांचीं गाणीं दसपट ऐकतात असें नव्हे. गवयांचीं गाणींसुद्धां पूर्वीच्यापेक्षां ते सध्यां जास्त ऐकतातच, पण फोनोग्राफ, रेडिओ यांची त्यांत फार मोठी भर पडलेली आहे. यानें सुद्धां तरुण माणसांची कलादृष्टि वाढत चाललेली आहे. ही दृष्टि पोशाखांत व्यक्त होणें अगदीं अपरिहार्य आहे. या दृष्टीनें पाहतां आपली कलात्मकता व्यक्त करण्याची संधी पुरुष विद्यार्थ्यांना मिळत नाहीं, किंवा ही संधी प्राप्त झालेली असूनसुद्धां तिचा उपयोग करून घेण्याची मनाची तयारी ते दाखवीत नाहींत हें स्पष्ट आहे. विद्यार्थिनी मात्र ही कलेची दृष्टि निःसंशय दाखवितात.

पूर्वीसुद्धां कलादृष्टि होतीच. परंतु तिचा आविष्कार अंगवळणीं पडल्यामुळें त्या आविष्कारांतील कलापणच लक्षांत येईनासें झालेलें आहे. अर्थात् तरुण माणसानें कांहीं नवें केलें, कांहीं नवीन नमुना उत्पन्न केला म्हणजे जुन्यांना वाटतें कीं, तरुण लोकांच्या अंगीं थिल्लरपणा येत आहे. परंतु ही त्यांची टीका अगदीं अस्थानीं असते. या नेहमींच्या संप्रदायांत, सध्यां वाढत असलेली कलात्मकता येऊन मिळाली म्हणजे तिचे आविष्कार जास्त जास्त व्हावे यांत काय आश्चर्य ? थोडेसें अंगवळणीं पडल्यानंतर आणि आपल्याला वाटला होता तसा धोका यांत कांहीं नाहीं असें कळून आल्यानंतर त्या सौंदर्यसाधनाचें म्हणजे फॅशन्‌चें कांहीं वाटेनासें होतें. विद्यार्थिनींचा सध्यांचा जो वेष आहे यांतील जवळजवळ प्रत्येक कलम गेल्या दहाबारा वर्षांत नव्यानेंच उत्पन्न झालें आहे. कांहीं नवें पाहिल्याबरोबर दचकण्याची संवय बहुधा सर्वांनाच असते. परंतु एकदां दृष्टि मेली, गोष्ट अंगवळणीं पडली म्हणजे त्याचें कांहीं वाटेनासें होतें. सौंदर्यसाधन म्हणजे काय आणि अनीतीच्या बाजूचा जो कल असतो त्याचा

आविष्कार म्हणजे काय, याचें पृथक्करण रसिक माणसानें नेहमींच करावयास हवें. आणि ज्या ठिकाणीं आतांच सांगितलेला कल व्यक्त होत आहे असें दिसेल त्या ठिकाणीं जरब उत्पन्न केली तर तें अवश्यहि आहे. परंतु कलात्मकतेचा आविष्कार हा मात्र जरबेचा विषय होता उपयोगाचा नाहीं. अंदाज असा आहे कीं, मुलांच्या मनावरचें सध्यांच्या औदासिन्याचें आणि कांहींसें वैराग्याचें पटल दूर झाल्याबरोबर त्यांची ही कलात्मकता त्यांच्या पोषाखांत भराभर व्यक्त होऊं लागेल. आणि जीविताच्या निराळ्या क्षेत्रांत वागत असलेल्या मुली ज्याप्रमाणें आपल्या पेहरावाच्या कामीं बराच बारीक–निरीकपणा दाखवितात तसा विद्यार्थीहि दाखवूं लागतील.

वास्तविक पाहतां, आपण विशेष प्रकारचा चांगला पोषाख करून आणि नटूनथटून कॉलेजच्या आवारांत हिंडावें अशी वासना विद्यार्थ्यांच्या मनांत उत्पन्न व्हावी अशी परिस्थिति सध्यांच आहे. परिस्थिति कसलीही असो, आपण चांगलें दिसावें असें, अगोदर, प्रत्येकाला वाटतेंच वाटतें. पण सध्यां तर प्रौढ वयाचे विद्यार्थी आणि विद्यार्थिनी हीं एकाच वर्गांत आणि एकाच आवारांत एकदोन प्रहर तरी रोज एकत्र नांदत असतात. अशा वेळीं आपण चांगलें दिसावें ही वासना उभयतांच्याहि मनांत उत्पन्न व्हावी हें किती स्वाभाविक आहे? या वासनेचा आविष्कार विद्यार्थिनींच्या वर्तनांत परिपूर्ण होतो असें मला वाटतें. परन्तु विद्यार्थ्यांच्या वर्तनांत मात्र ही वासना दृग्गोचर होते असें वाटत नाहीं. विनाकारण ऐट करावी, मखरेलपणानें वागावें, फारच छानछोकी दाखवावी, असें कोणीच म्हणत नाहीं. असें वर्तन जर एखाद्या विद्यार्थ्यानें केलें तर विद्यार्थिनीं त्याची थट्टाच करतात, आणि एखादी विद्यार्थिनी फारच नखऱ्यानें वागूं लागली तर मुलेंहि तिची योग्य ती संभावना करतात. पण हा प्रकार सोडून दिला तर शोभा, स्वच्छता, टापटीप, यांच्या बळावर आपला वेष चांगला दिसेलसा करावा आणि लोकांना आपलें दर्शन आनंददायक करावें असें वाटण्यांत कांहींच चूक नाहीं.

बहुतेक स्त्रीविद्यार्थिनी या शिष्ट आणि संभावित मार्गाचा अवलंब खचितच करतात, आणि यांत कांहींहि चूक नाहीं. पण विद्यार्थी मात्र, सरसकट मानानें पाहतां, या मार्गाचा अवलंब मुळींच करीत नाहींत. त्यांनीं जणुं कांहीं सौंदर्याच्या कल्पनेला रजाच दिलेली आहे! एकादा नटवा प्राणी सोडून दिला तर बाकीचे विद्यार्थी सौंदर्यसाधनाकडे बिलकुल वळलेले दिसत नाहींत. जे नित्य अवलोकन करीत असतील त्यांच्या हें ध्यानांत येऊन चुकलें असेल. म्हणून मला असें वाटतें कीं, विद्यार्थ्यांचीं मनें दुसरीकडे कोठें तरी आहेत. इतक्या तरुण मुली समोरून जात येत असतांना आपणहि नटावें असें विद्यार्थ्यांना वाटूं नये यांचें खरोखर नवल वाटतें! पण सध्यां वस्तुस्थिति मात्र ही अशी आहे. या वस्तुस्थितीची मीमांसा माझ्या मतानें मीं वर केलेली आहे. केवळ दारिद्र्याकडे बोट दाखवून चालण्यासारखें नाहीं. कारण, तुलनेनें जरी पालक हा मुलीच्या सौंदर्यसाधनावर थोडा जास्त पैसा खर्च करावयास तयार असला तरी मुलाच्या बाबतींत तो आपला हात अगदींच आखडता घेतो हें मात्र बिलकुल खरें नाहीं. उलट कित्येक घरांत असें भांडण चालत असलेलें दिसून येईल कीं, "तूं असा पोशाख कर, तसा पोशाख कर" असें बापानें म्हणावें, आणि लेकानें केवळ कुडतें घालूनच घरांतून बाहेर पडावें! असो. विद्यार्थि-जीवनाच्या इतर विषयांविषयीं बोलतांना मला या विषयाकडे पुन्हा एकदां थोडेंसें वळावें लागेल.

---

# विद्यार्थ्यांची विनोदबुद्धि ४

विद्यार्थीवर्ग कधीं काळीं दुर्मुखलेला असतो किंवा विनोदबुद्धीला तो पारखा बनतो असें मला वाटतच नाहीं. आधुनिक काळांत तर विनोद-बुद्धीचा फैलाव विद्यार्थीवर्गांत अधिकच झालेला आहे. कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचीं नाटकें पाहतांना व वाचतांना, तरुण लोकांना काय किंवा वृद्धांना काय, वाङ्मयांतील विनोदाचा लाभ पहिल्यानें झाला. त्याच्या आधीं वाङ्मयांत विनोद नव्हता असें नाहीं. परंतु तो अस्पष्ट, क्षणिक आणि बहुधा पोरकट रूपाचा असे. सौभद्र नाटक या दृष्टीनें पुन्हां एकदां पहावें, म्हणजे ध्यानांत येईल कीं, कृष्णाचा मित्र असलेला एक भटजी विनोद करतो खरा, परंतु त्याचा तो विनोद बालिश असतो. फार्ससारखें एखादें उत्तान विनोदाचें प्रहसन जुने नाटककार लिहीत. विष्णुशास्त्री यांनीं आपल्या निबंधमालेंत विनोदमहदाख्यायिका लिहून, विनोद या नांवाचा एक स्वतंत्र रस आपल्या जीवितांत खास आहे हें दाखवून दिलें. परंतु, कोल्हट-करांचें वाङ्मय सुरू होईपर्यंत विनोदाचा घवघवीत अवतार आपल्या वाङ्म-यांत झाला नव्हता. शेक्सपिअरच्या वाचनानें कोल्हटकर यांना शाब्दिक कोट्यांचा महिमा कळूं लागला, आणि विरोधानें चमत्कृति उत्पन्न करतां येते हा तर त्यांच्या प्रतिभेनें एक स्वतंत्रच शोध लावला. या कोट्यांनीं आणि चमत्कृतींनीं, कोल्हटकर यांनीं महाराष्ट्रांतील लोकांना पहिल्यानें चांगल्या प्रकारचें हास्य शिकविलें. मागोमाग त्यांचें शिष्य गडकरी हे येऊन प्राप्त झाले आणि त्यांनीं आपल्या गुरूवर मात करून दाखविली. शाब्दिक कोट्यांचा तर त्यांनीं केवळ पाऊसच पाडला आणि कोल्हटकरांच्या विरोध-चमत्कृतींच्या ऐवजीं त्यांनीं अतिशयोक्तीचा अवलंब केला. कै. गडकरी यांच्या पश्चात् शुद्ध विनोदबुद्धीच्या विलासाला थोडा खंड पडला, पण प्रि.

अत्रे हे नाट्यवाङ्मय किंवा नाट्यमयवाङ्मय लिहूं लागल्यापासून महाराष्ट्रांत विनोदाचा धबधबाच सुरू झाला. मात्र या बाबतींत गडकरी यांची लोकप्रियता अबाधितच राहिलेली आहे. प्रौढ विद्यार्थ्यांच्या मनावर, आज पंचेचाळीस वर्षें झालीं, या विनोदी वाङ्‌मयाचा परिणाम अव्याहतः होत राहिला आहे. आणि गांभीर्याला कितीही किंमत असली तरी पोटभर हसणें हेंही मानवी जीवितांत अवश्यच आहे हा विचार आतां आपल्या देशांत कायम होऊन राहिला आहे. परंतु तरुण लोकांचा संबंध या विनोद वाङ्‌मयाशीं नित्य येत असल्यामुळें त्यांच्या ठिकाणचें हास्य बळावतच चाललें आहे. प्रसंगविशेषी हे विद्यार्थी जास्त हंसत आहेत, असा प्रत्यय कित्येक प्राध्यापकांना येतो. तथापि राजकारण आणि समाजकारण यांतील अनेक गंभीर स्वरूपाच्या चळवळी देशांत अधूनमधून होत असल्यामुळें त्यांच्या या हसण्याच्या संवयीला पुष्कळदा आळा बसतो हें मान्य केलें पाहिजे.

पण या विनोदबुद्धीला कित्येक प्रसंगीं अत्यंत ग्राम्य आणि हिडिस असें रूप प्राप्त होतें, हेंही प्राध्यापकांच्या ध्यानांत येऊन चुकलें आहे. शब्दावर कोट्या करतांकरतां मराठींतील अनेक लेखकांनीं आणि वक्त्यांनीं किंचित् अश्लील स्वरूपाच्या कोट्या करण्यास सुरवात केली. या लेखकांची नांवें सांगण्याची आवश्यकता नाहीं. एक तर ते अनेक आहेत आणि दुसरें म्हणजे माझ्यापेक्षां वाचकवर्गालाच त्यांची ओळख जास्त आहे. कोणचाही शब्द काढा, त्याला एक लैंगिक स्वरूपाचें वळण देणें आणि त्यांतून उत्पन्न होणारा घाणेरडा विनोद अनुभविणें, यांत या लेखकांना आणि वक्त्यांना मोठें भूषण वाटत असतें. आपल्या प्रतिभेचा हा एक स्वतंत्र विलास आहे आणि मराठींतील लेखी आणि तोंडी वाङ्मय या विलासाच्या योगानें आपण समृद्ध करीत आहों, असा भलताच समज या लोकांनीं करून घेतलेला आहे; आणि यांच्या वाङ्मयांत एरवींचा मालमसाला बरा असल्यामुळें हा

त्यांचा पाचकळपणासुद्धां विनोदाच्या खात्यांतच जमा होतो. सूक्ष्म आश्लील्याचा वास मारणाऱ्या या वाङ्मयाचा परिणाम विद्यार्थीवर्गाच्या मनावर अतोनात झालेला आहे. एखाद्या विषयाचें कितीहि गंभीर विवेचन चालूं असू द्या, विद्यार्थी भलत्याच एखाद्या शब्दापाशीं मनानें थांबतात आणि त्यांतून जी अश्लील व्यंजना उपन्न होण्यासारखी असते ती ध्यानांत येऊन फिदी फिदी हंसूं लागतात;आणि नेत्रपल्लवीनें हा आश्लील्याचा वास इतरांना पोंचवून अत्यंत हीन रुचीचा विनोद वर्गांत पिकवीत राहतात. प्राध्यापक शहाणा असला तर या गोष्टीकडे तो काणाडोळाच करतो आणि, जणूं कांहीं लक्ष देण्यासारखा कांहीं निराळा प्रकार घडून आलेलाच नाहीं, असें दाखवून तो आपला बोलण्याचा उद्योग पुढें चालू ठेवतो. परंतु मनांतून तो अतिशय संतापलेला असतो व ज्या लेखकांनीं आणि वक्त्यांनीं अश्लील व्यंजनांची ही प्रथा मराठींत चालू केली त्यांची प्रगट किंवा अप्रगट अवहेलना करण्याची संधि तो प्रसंगविशेषीं साधतो. असल्या अश्लील चारगटपणाला विशेष अक्कल लागते असें नाहीं. एकदां ती मोडणी ध्यानांत आली म्हणजे तासचे तास त्याच तऱ्हेची थट्टा करीत बसावें आणि आपल्या ऐन पुष्ठयांतील मित्रमंडळींत हास्याची खसखस पिकवावी हा उद्योग अनेक बोलके लोक करीत असतातच. परंतु बाहेरच्या लोकांना त्यांच्या या गलिच्छ विनोदाची बाधा सहसा होत नाहीं. कारण, कांहीं झालें तरी आपला हा विनोद घाणेरड्या प्रकारचा आहे याची जाणीव त्यांना असते. परंतु कांहीं वाङ्मयसेवकांनीं आणि वक्त्यांनीं हीही लाज ठेवली नाहीं. त्यांनीं या चारगटपणाला चोरट्या वाटेनें वाङ्मयाच्या दरबारांत आणून सोडलें आणि मग संभावित ठिकाणीं प्रवेश मिळाल्यामुळें हुरळून जाऊन या ग्राम्य विनोदानें चांगलेंच थैमान सुरू केलें. विद्यार्थीवर्गाला याची बाधा अतोनात झाली आहे. मोठ्या शहरांपासून दूर असलेल्या मध्यम प्रकारच्या गांवांतील विद्यार्थ्यांनासुद्धां ही घाणेरडी लज्जत लागली आहे अशी जबानी त्या त्या ठिकाणचे शिक्षकसुद्धां देतील.

विनोद चांगला म्हणतां म्हणतां, त्यांतील बौद्धिक व्यापार लुप्त होऊन, अश्लील व्यंजनेचा सहजप्राप्य आस्वाद आपण चाखावा व लोकांना द्यावा ही वासना चांगल्या चांगल्या लेखकांना आणि वक्त्यांना व्हावी याचें नवल वाटतें. दोनदोनशें मुलांचे समोर बसलेले वर्ग म्हणजे अनेक प्रकारच्या भावनांची मापनयंत्रेंच होत. या यंत्रांवरील कांट्याकडे लक्ष दिलें तर असें दिसून येईल कीं, या विनोदबुध्दीला एका निराळ्याच कारणानें स्थैर्य येऊं पाहत आहे. विनोदाचा हलका प्रकार स्त्रीपुरुषांच्या नात्यांत शिरत आहे आणि वर्गांतील मुली खर्ची पडून पुरुष विद्यार्थी उच्छृंखलपणानें फिदीफिदी करावयास शिकत आहेत. सर्वांना हें माहितच आहे कीं आतां कॉलेजांत मुलींचा भरणा भराभर वाढत चालला आहे आणि, मुलें आणि मुली मिळून जरी सरमिसळीनें बसण्याची वहिवाट नसली तरी विद्यार्थी आणि विद्यार्थिनी एकाच वर्गांत आणि शेजारीं शेजारीं बसलेलीं असतात. वाचावयाच्या मजकुरांत स्त्रियांचा संबंध असलेला कोणचाही कथाभाग निघाला आणि त्यांत जर का हास्याचा अल्पहि उद्गम असला, तर विद्यार्थी हे एकदमच उच्छृंखल बनतात; आणि मुलींच्याकडे पाहून विनोदाचा मुळांत असलेला अल्पही अंश फेंसाळून मोठा करून भोगतात. मौज ही कीं, अथवा शरमेची गोष्ट ही कीं, त्यांना यांत कांहीं लाज वाटत नाहीं. मुलींचा हा शेजारधर्म म्हणजे त्यांना एक करमणुकीचाच विषय झालेला दिसतो. ज्या हीन विनोदाची चर्चा मी सध्यां करीत आहें, त्या विनोदाचा उद्भव जाणूनबुजून करण्याचे प्रसंग विद्यार्थी मुद्दामच उत्पन्न करतात; आणि हा सारा प्रकार प्रवृत्तीनें मवाळ किंवा अप्रिय बनण्याची भीति बाळगणारे प्राध्यापक चूप बसून सहन करतात. कित्येक वेळां तर असें घडतें कीं वर्गांतल्या रंगभूमीवर येऊन दाखल झालेला नवथर प्राध्यापक स्वतःच थोडा थिल्लर असतो आणि स्त्रीपुरुषांविषयींच्या कोट्या, उपमा, कथा यांची चर्चा घोळघोळून करण्यांत तो मोठें सुख मानतो. उसाच्या चोयटींतून, जास्तजास्त चाखल्यानें, अधिकच रस निघावा,

त्याप्रमाणें ही चर्चा खुद्द प्राध्यापकालाच सुरस वाटत जाते. आणि मग एकीकडे वर्गातील विद्यार्थिनी गंभीर बनलेल्या आणि पुस्तकांकडे पाहात बसलेल्या असतांना दुसरीकडे विद्यार्थी आणि स्वतः प्राध्यापक कांहींशा बाष्कळ विनोदाचा अनुभव घेत असतात. माझें हें लिहिणें प्राध्यापक-वर्गाला आणि कदाचित् विद्यार्थिवर्गालाही दंशकारी वाटेल. पण मला खरें तेंच लिहिलें पाहिजे. प्राध्यापक जर प्रवृत्तीनेंच गंभीर असेल किंवा विनोदी असूनही वर्गावर त्याची करडी हुकमत असेल तर तो स्वतः सावध राहतो आणि केवळ चर्चेच्या बळावर विद्यार्थ्यांना उच्छृंखल होऊं देत नाहीं. परंतु. या पेशांत नवीनच शिरलेल्या माणसांना लोकप्रिय बनण्याची हौस उत्पन्न होते आणि ती भागविण्यासाठीं त्यांना असल्या कांहीं तरी इला-जांचा अवलंब करावा लागतो.

वास्तविक पाहतां, या कामीं मुलींचा अवमानच होतो. परंतु फट-कळपणाचा गुण विद्यार्थिनींच्या अंगीं अजून उत्पन्न झालेला नसल्यामुळें या चहाटळपणाला आळा घालण्याचें धैर्य त्यांना होत नाहीं. वाङ्मयांत—विशेषतः काव्यनाटकादींचें विवेचन चालू असतां—स्त्रीपुरुषांच्या प्रीतीचीं वर्णनें पुष्कळ ठिकाणीं येतात. स्त्रीपुरुषांची प्रीति ही मानवी जीवितांतील एक अत्यंत प्रियकर आणि मनोरम भावना असल्यामुळें तिच्या संबंधाचें विवेचन कदाचित् कोणी विशेष खुलावटीनेंसुद्धां करील, परंतु यांतच कोणी एक प्रकारचा सूक्ष्म लाळघोटेपणा करतात; याच विषयावर जास्त गुंजारव करीत राहावें असें त्यांना वाटतें; आणि मग आपल्या विनोदबुद्धीला हें आवाहन आहे हें विद्यार्थी ओळखतात. असल्या या विनोदाची खुमारी वाढत जाण्याला आणखी एक कारण झालेलें आहे. आपल्या जीवितांत अनेक बारीक बारीक संस्कृतींचा संकर होत चाललेला आहे. या बारीक बारीक संस्कृति म्हणजे काय याचा खुलासा करणें अवश्य आहे असें वाटत नाहीं. निरनिराळ्या जातींचे, पंथांचे आणि धर्मांचे विद्यार्थी व विद्यार्थिनी हीं

एकत्र बसलेलीं असतात. पण तपशिलानें पाहूं जातां विद्यार्थीनींच्या समूहांत बहुधा एकदोन जातींच्याच मुली आढळून येतात. पुरुष विद्यार्थ्यांत मात्र शिक्षणांत मागासलेले व विषम संस्कृतींच्या निरनिराळ्या कल्पना मनांत बाळगणारे विद्यार्थी एकत्र आलेले असतात. त्यांच्या कानांवर विनोदाची ही तऱ्हा गेली म्हणजे, परस्पर कोणाच्या तरी स्त्रियांची ही अवहेलना होत आहे अशा समजुतीनें, त्यांची विनोदबुद्धि जास्तच चेकाळत जाते. वास्तविक पाहतां कोणच्याही जातीचा स्त्रीवर्ग घेतला तरी शालीनता, मर्यादा, आणि आदब या दृष्टींनीं तो सारखाच संभावित असतो. परन्तु स्त्रीवर्गाच्या संबंधानें ही एक परस्पर खर्ची पडल्याची भावना उत्पन्न होण्याला, आपलें निरनिराळ्या संस्कृतींच्या लोकांचें मिश्रण पुष्कळच कारण होतें. म्हणून खुद्द प्राध्यापकांनीं विनोदनिर्मितीची आपली प्रवृत्ति नेहमीं कक्षांतच ठेवली पाहिजे. विशेषतः आपल्या हातून हीन दर्जाचा विनोद होईल कीं काय आणि असला विनोद उत्पन्न करण्याची संधी आपण योजलेल्या शब्दांतून विद्यार्थ्यांना लाभेल कीं काय, याविषयीं प्राध्यापकांनीं सक्त खबरदारी बाळगली पाहिजे.

वरचें लिहिणें जरी खरें असलें तरी विद्यार्थ्यांच्या विनोदबुद्धीचा सरसकट अधिक्षेप मात्र मला मुळींच करावयाचा नाहीं. वयाला अनुसरून त्यांची वृत्ति उल्हसित असावी; त्यांच्या मुखावर हास्य सहज उमटावें आणि हें हास्य पुष्कळदां मनसोक्त असावें, हें अत्यंत स्वाभाविक आहे. मुली तर त्यांतूनही जास्त हसऱ्या असतात. आपल्याला जें घरांत दिसतें तें शाळा–कॉलेजांतही दिसावें यांत काय नवल आहे ? या त्यांच्या विनोदबुद्धीचा विलास, वरील परिच्छेदांतील प्रसंग सोडून दिले तर अत्यंत हृदयंगमपणें चालतो. कॉलेजांत आल्यानंतर मुला–मुलींना एक तऱ्हेचें स्वतंत्रपण लाभतें. उल्हासानें त्यांचें सारें जीवित व्यापून जातें. जिकडे पहावें तिकडे आनंद, खेळकरपणा आणि उल्हास यांचीच दीप्ति पसरलेली आहे असें त्यांना वाटतें. घरांतील मर्यादित जीवनांतून बाहेर पडून आपण एका

मोठ्या विशाल जीवितांत प्रविष्ट झालों आहों, याचा प्रत्यय त्यांना पदोपदीं येतो. पांचपन्नास मुलांच्या वर्गांत बसण्याच्याऐवजीं दोनदोनशें मुलांनीं भरलेल्या मोठमोठ्या उंची वर्गांत आपण बसलों आहों, जिकडे तिकडे विद्यार्थीच विद्यार्थी बसलेले आहेत, आपल्याला प्राध्यापकांचा कसलाही धाक नाहीं, आपण शाळेंत पाहत होतों त्यापेक्षां अधिक झकपक दिसणारीं खुर्च्या बाकें आपल्यासाठीं मांडलेलीं आहेत, कदाचित् ज्यांचीं वाङ्मयें आपण आधींच वाचलीं असतील किंवा सार्वजनिक जीवितांत ज्यांचा बरावाईट लौकिक आधींच कानांवर आला असेल, ते प्राध्यापक व्यास-पीठावर येऊन उभे राहात आहेत, आपण त्यांच्याविषयीं जी कल्पना केली होती तिच्याहून ते कितीतरी निराळे दिसत आहेत—असल्या गोष्टींनींच मुलांमुलींची मनें तोंडोतोंड भरून गेलेलीं असतात. उल्हासानें उल्हास वाढत जातो, आणि पौगंडदशेला सहज अशी जी विनोदबुद्धि, ती या उल्हासानें अधिकच तरल बनते. विद्यार्थ्यांच्या या प्रवृत्तीला जर प्राध्या-पकांनीं उत्तम वळण दिलें आणि वर्ग चांगला काबूंत ठेवला तर अत्यंत गंभीर विषयाचें विवेचनसुद्धां विनोदाच्या शलकांनीं प्रियकर बनल्याशिवाय रहात नाहीं. अशा वेळीं विनोदाचें खरें खरें रहस्य विद्यार्थ्यांना कळतें. आणि विनोद ही मानवी मनाची एक मोठी उत्तेजक आणि जीवितांत स्वारस्य उत्पन्न करणारी भावना आहे हें त्यांना पटूं लागतें. परंतु, अधांत्री न बोलतां मी याचीं कांहीं उदाहरणेंच देतों.

विद्यार्थी हे मोठे चोखंदळ टीकाकार असतात; आणि आपल्या मार्मिक टीकांनीं ते उत्कृष्ट विनोदनिर्मिती करतात. आमच्या कॉलेजांत एक स्त्रीप्रोफेसर होत्या. या बाईची शिकविण्याची तडफ अगदीं जाज्वल्य असे. विद्यार्थ्यांना पहिल्यापहिल्यानें वाटलें होतें कीं, बाईमाणूस आहे; आपण चांगल्याचांगल्यांची रेवडी उडविली आहे; तेव्हां यांचाहि नक्षा उतर-विण्यास आपल्याला फारसा वेळ लागणार नाहीं! परंतु बाईच्या व्याख्या-नांचा झपाटा चालू झाला आणि विद्यार्थ्यांच्या ध्यानांत आलें कीं हें

प्रकरण कांहीं निराळेंच आहे. बाईंचें इंग्रजी वक्तृत्व चांगलें फर्मास असें, त्यामुळें मुलांची वर्गांतील नेहमींची चलबिचल एकदमच बंद पडली. उशीरां येणारांना बाई टाफरून बोलूं लागल्या. पुढें पुढें त्या त्यांना वर्गांतही येऊं देईनात. पण पोरांचा कांहीं इलाज चालेना. कारण बाईंचें बोलणें अस्खलित, शिकविणें मार्मिक, आणि बोलणें चालणें अगदीं करडें. परंतु विद्यार्थ्यांनीं एक गोष्ट हेरलेली होती कीं केव्हां केव्हां बाई विशेष प्रकारें नटत असातात. बाईंचें लग्न झालेलें नव्हतें, तेव्हां हा प्रासंगिक नट्टापट्टा बहुधा प्रणयाचा ओनामा असावा, हें त्यांनीं हेरलें. याचा अर्थ असा कीं बाईंचें बाकीचें अवसान जरी मोठें करडें असलें तरी त्यांच्यांतील दुसरी एक नरम जागा विद्यार्थ्यांच्या ध्यानांत आली. बाई विशेष प्रसंगीं नटत तेव्हां त्यांच्या रुचीची लज्जत कांहीं निराळी आहे असेंही दिसून येई. वीतवीत रेशमी कांठाचीं काळीं लुगडीं त्या नेसत आणि गळ्यांत व कानांत कांहीं मुलुखानिराळेच अलंकार घालीत. त्यांतही बाईंची सुरत जर विशेष उमदी असती तर ही विद्यार्थ्यांची विनोदबुद्धि थोडी थबकून राहिली असती. किंबहुना या अलौकिक जाम्यानिम्यानें त्यांच्या रूपाला चढलेली कळा पाहून विद्यार्थी मनांतल्यामनांत तरी हरखूनच गेले असते. परन्तु बाई रूपानें दहाजणींसारख्या, नव्हे शंभरजणींसारख्या, आणि वर्णानें तर कस्तुरीसारख्या होत्या. अर्थात् त्यांचा हा नट्टापट्टा पाहून कॉलेजच्या आवारांत हिंडणारीं पोरें एकमेकांना कोपरखळ्या देऊन हसूं लागत. बाईंच्याही हें ध्यानांत येत नव्हतें असें नाहीं. पण कॉलेजचें आवार म्हणजे कांहीं वर्गाची कोंडलेली जागा नव्हे. एकदां असें झालें कीं लहान वासरांच्या गळ्यांत जसली एक काळ्या रेशमांत ओवलेलीं जांभळासारख्या मण्यांची माळ घालतात, तसली माळ गळ्यांत घालून बाई कॉलेजच्या आवारांत प्रविष्ट झाल्या. भल्या रुंद कांठाचें तें काळें लुगडें, त्यांचा कस्तुरीचा वर्ण आणि आज त्यांनीं धारण केलेली काळ्या मण्यांची माळ, हीं पाहून, उशीरां आले म्हणून वर्गाच्या दारांतून

कदाचित् धुडकावून लावलेले कांहीं विद्यार्थी एकमेकांकडे पाहून, पण बाईंना ऐकूं जाईल अशा बेतानें, मोठयानें ओरडले, “ काइ बिबं, काइ सुया, काइ सागरगोटं घ्या ग बाई ! ” विद्यार्थ्यांनीं केलेला हा विनोद अतिशय गमतीचा होता. यांत टीका असेल पण दुष्टावा नव्हता आणि हास्याची प्रवृत्ति असेल, पण ती हीन प्रकारची नव्हती. हा विनोद आपल्याला कसा काय मानवला हें बाईंना कोण विचारणार ? पण त्यांचा उमदा स्वभाव लक्षांत घेतां त्या मनांतल्या मनांत खूपच हंसल्या असतील, यांत कांहींच शंका नाहीं, कारण विद्यार्थ्यांनीं त्यांच्या त्या दृष्टमणिमाळेची चांगलीच टर उडविली होती.

एकदां एक वयानें चांगल्या प्रौढ झालेल्या बाई विद्यार्थिनीचा पेशा पत्करून कॉलेजांत येऊं लागल्या. वयाला अनुसरून त्यांच्या शरीराचा डौलही मोठा घवघवीत आलेला होता. एवढी मोठी स्त्री विद्यार्थिनी कशाला बनते आणि आमच्या मेळांत येते, असें विद्यार्थ्यांना म्हणावयाचें होतें. पण हें म्हणण्याचा त्यांनीं कांहीं एक निराळाच मार्ग शोधून काढला. ते त्यांना ‘ मावशीबाई ’च म्हणूं लागले. मावशीबाई आल्या, मावशीबाई गेल्या, असा त्यांचा उल्लेख ते करूं लागले. अर्थात् त्यांच्या मनांत असलेल्या साऱ्या विनोदी टीकेचें काम या शब्दानेंच भागलें. एकदां पूर्वी शिक्षक असलेले एक गृहस्थ प्रोफेसर होऊन कॉलेजांत आले. येऊन एकदोन दिवस होतात तों त्यांच्या अंगात एक नवा कोट दिसला. हा कोटही अगदीं साध्या कापडाचा होता. पण कॉलेजच्या आवारांत त्यांच्या शेजारून जाणाऱ्या दोन विद्यार्थ्यांपैकीं एकजण लटकेंच दुसऱ्याला उद्देशून म्हणतो “ हा तुमचा कॉलेजचा कोट वाटतं : ” आतां या टीकेला कांहीं नांव ना गांव. पण या टीकेंत एक विनोदाची गमतीची काडी होती हें विसरतां येगार नाहीं. मी स्वतः जेव्हां कॉलेजांत आलों तेव्हां माझ्या मिशा फार मोठ्या असत व माझी मुद्रा उग्र असे. कॉलेजच्या संमेलनाच्या वेळीं

फिशपाँडचा समारंभ झाला. हा समारंभ म्हणजे एक चटकदार, मार्मिक, कोपरखळीवजा पण संभावित टीका करण्याचा प्रसंग असतो. अर्थात् आपल्या वांट्याला कोणची टीका येते अशी धाकधूक सगळ्यांच्याच मनांत असते. येतां येतां हें प्रकरण माझ्यापर्यंत येऊन ठेपलें. आणि त्या विद्यार्थ्यानें ' व्हॉन हिंडेनबुर्ग ' म्हणून त्या जर्मन सेनापतीचें एक मोठें चित्र माझ्या पुढें केलें. अर्थात् सादृश्याचा यांतला माझा वांटा कोणचा याचें बरोबर ज्ञान मला होतें. विद्यार्थिनी काय किंवा इतर आधुनिक बायका काय, त्यांच्या चोळ्या–अस्तन्यांची लांबी ऱ्हस्व होतां होतां अगदीं खांद्यापर्यंत येऊन ठेपली आहेत. पण हें सौंदर्यसाधन म्हणजे फॅशन आतां सार्वत्रिक झाल्यामुळें त्यांचें कोणाला कांहीं वाटेनासें झालें आहे; इतकेंच काय पण तेंच बरोबर आहे हाच समज रूढ झाला आहे. एकदां असें झालें कीं, एका मुलीनें कोपरांपर्यंत लांब अस्तन्यांचा कपांचा शर्ट घालावयास सुरवात केली. त्या-बरोबर विद्यार्थ्यांची विनोदबुद्धि जागृत झाली आणि ही विद्यार्थिनी वर्गांत आली कीं, " बाळंतीणबाई आल्या, बाळंतीणबाई आल्या " अशा शब्दांनीं तिला ऐकूं जाईल असें, पण एकमेकांकडे बघूनच, ते तिचें स्वागत करूं लागले. अशीं उदाहरणें मला पुष्कळ देतां येतील. या विनोदांत थोडासा दंश असतो हें खरें. परन्तु विनोद करणारे लोक आणि ज्यांचा विनोद होतो ते लोक समवयस्क आणि तरुण असल्यामुळें तेवढा दंश पचनीं पाडून उत्पन्न झालेल्या हास्यांत आपणहि मिसळणें विद्यार्थ्यांना सोपें जातें आणि विद्यार्थ्यांतच अहोरात्र वागल्यानें ज्यांच्या मनाचा ताजेपणा अजूनही शिल्लक राहिलेला आहे, त्या पोक्त प्राध्यापकांनासुद्धां असले विनोद करून घेण्यांत गंमतच वाटते.

वर्गांत होणाऱ्या विनोदाचें एक अत्यंत मनोज्ञ उदाहरण सांगून विषयाची ही बाजू मी पुरी करतों. मी मोरोपंताचें उद्योगपर्व शिकवीत होतों. विशेष अभ्यासाला मराठी घेतलेले विद्यार्थी अर्थातच पंचवीसतीस

असतील; त्यांत पंधरावीस मुली आणि दहाबारा मुलगे असा संच वर्गात बसला होता. मुलगे चांगले विशीबाविशींतील आणि मुलीही उपवर हाच नेहमींचा प्रकार याही वर्गांत होता. कथाभाग असा निघाला कीं, दुर्योधन व अर्जुन हे श्रीकृष्णाकडे साहाय्य मागावयास आले आहेत. अर्जुन पायाशींच बसला होता. त्याला कृष्णानें विचारलें, "मी किंवा माझे छप्पन्न कोटी यादव अशा वाटण्या मी करतों. या दोहोंपैकीं तुला कोण पाहिजे ?" दुर्योधनालाही कृष्णानें तोच प्रश्न विचारला. तेव्हां अर्जुन म्हणाला "निःशस्त्र असा तूं एकटा मला हवास." आणि दुर्योधन म्हणाला कीं, "तुझें सारें सशस्त्र सैन्यच मला हवें." या संबंधानें मोरोपंतांनीं लिहिलेल्या आर्येवर आम्ही येऊन ठेपलों. अर्जुनानें कोणचा वर मागितला आणि दुर्योधनानें कोणचा मागितला हें या आर्येंत सांगितलें आहे हें खरें, पण मागणें मागणारांच्या शहाणपणावरहि शेवटीं थोडीशी टीका केली आहे आणि त्या टीकेंतूनच मोठ्या मनोज्ञ विनोदाला जागा उत्पन्न झाली. पंतांची आर्या अशी आहे—

पार्थ म्हणे ' गोविंदा ! न्यस्तायुध तूंचि पाहिजेस मज '
सैन्य सुयोधन मागे; **वरहि वरायासि** पाहिजे समज.

पंतांना म्हणावयाचें आहे कीं वर मागायला सुद्धां कांहीं अक्कल लागते. पण वर्गात बसलेल्या त्या तरुण लोकांच्या मनांत ' वरहि वरायास ' या शब्दांवर श्लेष उत्पन्न झाला आणि एकत्र वागल्यानें संकोचबुद्धि थोडीशी गेलेली असल्यामुळें त्यांच्यांतील कांहीं लोकांनीं एकमेकांकडे पाहून मंजुळ हास्य केलें ! हा विनोद अमर्दी अपरिहार्य आहे; आणि मनोज्ञ म्हणजे मनाचेंच अनुभवितां येण्यासारखा आहे !

---

# मुली आणि कॉलेजचें सहशिक्षण ५

कॉलेजच्या जीवितांत गेल्या दहाबारा वर्षांत एक विलक्षण फरक पडला आहे आणि दिवसेंदिवस तो वाढतच चाललेला आहे. या फरकानें या कॉलेजच्या जीविताची सारी तब्बाच बदलली आहे. कॉलेजचें शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या इतक्या झपाट्यानें वाढत आहे कीं कोणालाहि आश्चर्यच वाटावें. मुलींना मुलांच्याप्रमाणेंच शिकविलें पाहिजे, हा न्याय पांढरपेशा समाजांत तरी आतां रुळून गेला आहे. पण पांढरपेशा समाज या शब्दसंहतीच्या व्याप्तींत ज्या साऱ्या जाती सांपडतात, त्या सर्वांना हा न्याय पटला आहे असें मात्र म्हणतां येत नाहीं. गुजर, मारवाडी, सोनार इ. पांढरपेशा लोकांत स्त्रीशिक्षणानें अजूनही मूळ धरलें आहे असें वाटत नाहीं. वास्तविक पाहतां ब्राह्मण, प्रभू, इ. जातींच्यापेक्षां या जातींची सांपत्तिक स्थिति अधिक चांगली असते हें कोणीही मान्य करील. आणि म्हणून स्त्रीशिक्षणाचा फैलाव या जातींत जलदीनें होण्याला कसलाही प्रत्यवाय असूं नये. पण जी बाब स्त्रीशिक्षणाला प्रोत्साहक असें आपल्याला वाटतें, तीच बाब या समाजांतील स्त्रीशिक्षण रेंगाळत ठेवण्यास कारणीभूत झाली आहे. ब्राह्मण, प्रभू इ. पांढरपेशा जातींतील मुली शिकूं लागल्या याचें कारण, या जातींतील लोकांना स्त्रीशिक्षणाचा महिमा पटला, हें जसें आहे तसेंच सांपत्तिक स्थितीचा पेंच हेंही एक आहे. मुलांनीं शिकलेंच पाहिजे तर त्यांच्या बायकांनाही शिक्षण मिळालेलें असलेंच पाहिजे, हाही एक विचार स्त्रीशिक्षणाच्या फैलावाला कारणीभूत होतो. अगदीं अशिक्षित मुलीशीं लग्न करणें सुशिक्षित मुलांना नकोसें वाटतें. गुजर, मारवाडी, सोनार इ. समाजांतील मुलें जों जों जास्त शिकूं लागतील तों तों तीं हा आग्रह धरतीलच कीं आपण सुशिक्षित मुलीशींच लग्न करूं;

इतरांशीं करणार नाहीं. ही त्यांची प्रवृत्ति जसजशी पालकांच्या ओळखीची होत जाईल, तसतसा या जातींत स्त्रीशिक्षणाचा फैलाव होत राहील. आतांच सांगितलेलें स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराचें हें कारण ब्राह्मण, प्रभू इ. समाजानाही लागू पडलेंच होतें. पण जें कारण या जातींना लागू आहे आणि गुजर मारवाडी इ. समाजांना लागू नाहीं, तें म्हणजे गृहस्थितीचें अथवा सांपत्तिक पेंचाचें होय. ब्राह्मण, प्रभू इ. पांढरपेशा जाती सुशिक्षित आहेत आणि म्हणून संपत्तीच्या उपभोगाची—मग ती कितीही असो—एक विशेष प्रकारची कल्पना त्यांना प्राप्त झालेली आहे. अर्थातच त्यांच्या सार्वजनिक जीवितांत तरी एक विशेष प्रकारची ठाकाठिकी दिसते. तेवढ्या-वरून लोकांचा असा समज होतो कीं, हे लोक घरचे चांगलेच सुखी असावेत. हा समज खरा नाहीं. मिळत असलेल्या पैशाचा व्यय जीविताच्या कोणच्या शाखेंत करावा, यासंबंधींच्या यांच्या कल्पना इतर लोकांच्या कल्पनांहून थोड्या भिन्न आहेत इतकेंच काय तें. प्रभू जातींतील लोक तर जीविताच्या या बाजूवर ब्राह्मणांच्या पेक्षांही जास्त खर्च करतात. आणि म्हणून ते विशेष सुखी आहेत असें कोणाला वाटण्याचा संभव आहे. पण तेंही खरें नाहीं. मिळणारा पैसा आपण विशेषेंकरून कशावर खर्च करतों, यावर हें सारें अवलंबून आहे. असो. हा सांपत्तिक पेंच वाढत चालल्या-मुळें प्रपंचांतील दोघांहि माणसांनीं जमल्यास मिळविते बनावें, अशी ब्राह्मण, प्रभू, इ. जातींची खात्री होऊन चुकली आहे. या समाजांत स्त्रीशिक्ष-णाची वाढ अर्थातच वेगानें होत आहे.

वर सूचित केलें आहेच कीं, स्त्रीशिक्षणाचा स्वयंभू महिमा या जातींना खासच पटलेला आहे. ज्ञान हें केवळ पुरुषांनाच मिळावें आणि तें स्त्रियांपासून दूर ठेवावें, ही या जातींच्या मनांतील भावना सुधारकांच्या प्रतिपादनामुळें बव्हंशीं नाहींशी झाली आहे. म्हणजे असें झालें कीं, शिक्षण या वस्तूचाच महिमा पटल्यामुळें, लग्नाच्या मुलांना सुशिक्षितच

मुली हव्या असल्यामुळें आणि सांपत्तिक पेंचामुळें या जातींत स्त्रीशिक्षण पुरतें फैलावलेलें दिसतें. ज्या गुजर इ. जातींचा उल्लेख वर केला आहे त्यांना स्त्रीशिक्षणाचा स्वयंभू महिमाच अजून पुरता पटला आहे, असें मला वाटत नाहीं. माझें हें लिहिणें महाराष्ट्रांतील गुजर, मारवाडी, सोनार इ.च्या संबंधानें आहे, हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. महाराष्ट्रांतील या जातींना त्यांचे आगरकर अजून भेटावयाचे आहेत. सांपत्तिक पेंच तर यांना नाहींच नाहीं. पण यांच्यांतील मुलें मात्र बरींच शिकत असल्यामुळें, आम्हांला सुशिक्षितच मुली मिळाल्या पाहिजेत असा हट्ट तीं धरत असतील आणि म्हणून तेवढ्यापुरता स्त्रीशिक्षणाचा फैलाव या जातींत होत असेल. अर्थातच कॉलेजचें शिक्षण घेणाऱ्या मुली या पांढरपेशा समाजांतील असतात, हें आरंभीं केलेलें विधान, आतांच सांगितलेला अपवाद सोडूनच पत्करावयास हवें.

दहाबारा वर्षांपूर्वी कॉलेजांतील मुलींची संख्या अगदीं अल्प असे; आणि म्हणूनच या मुलींच्या जीविताचा एक तऱ्हेचा कोंडमारा होत असे. वर्गांत जिकडेतिकडे मुलें बसलेलीं असावयाचीं; आणि पुढल्या एकदोन बाकांवर दहापांच मुली बसलेल्या असायच्या. अर्थात मोकळेपणानें हसणें, बोलणें, चर्चा करणें, कॉलेजच्या क्रीडांगणाचा मनसोक्त उपभोग घेणें, वसतिगृहांतील सर्व प्रकारच्या गमती अनुभविणें, प्राप्त झालेलें मर्यादित स्वातंत्र्यच कां होईना पण मनमुराद अंगीं लावून घेणें, वादसभा, संमेलनें इत्यादिकांत बेधडकपणानें शिरणें, हे प्रकार मुलींना पूर्वीं करतां येत नसत. यामुळें त्यांचा जीव अगदीं कानकोंडा होऊन जाई. मिळत असलेल्या शिक्षणानें विविध प्रकारच्या स्वातंत्र्याच्या कल्पना त्यांच्या मनाला प्रतीत होत असत. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत आणि चालचलणुकींत एक तऱ्हेच्या अलिप्तपणामुळें त्यांना अगदीं कोंडल्यासारखें वाटे. किंबहुना, लोक असें म्हणत असत कीं, कर्वे यांच्या युनिव्हर्सिटींत मुलींना जें स्वातंत्र्य आहे, तें

आमच्या या इतर कॉलेजांतील मुलींना खासच नाहीं. आणि म्हणून शिक्षणामुळें होणारी मनाची वाढ तेथील मुलींच्या ठिकाणीं जितकी संभवते, तितकी आमच्या कॉलेजांतील मुलींच्या ठिकाणीं संभवत नाहीं. लोकांचें हें बोलणें दहाबारा वर्षांपूर्वींपर्यंत बरोबर होतें. आतां मात्र हें बिलकुल लागूं नाहीं.

आमच्या या कॉलेजांतून मुलींची संख्या इतकी झालेली आहे कीं, आपण एकलकोंडीं आहों, बाजूला पडलों आहों, असें मुलींना वाटण्याचें कारणच उरलें नाहीं. मुलींच्या झुंडीच्या झुंडी कॉलेजच्या आवारांतून हिंडत असतात; कांहीं कांहीं वर्ग तर जवळ जवळ निम्यानें मुलींनींच भरलेले असतात; कॉलेजच्या पटांगणावर त्यांच्यात्यांच्यांत चढाओढीचे सामने होतात आणि प्रसंगविशेषीं क्रिकेटच्या मॅचेसही होतात; आपले क्लब स्थापन करून मुली आपलीं स्वतंत्र नाटकें करतात, आणि संमेलन इ. सामुदायिक चळवळींत पुरुष विद्यार्थ्यांशीं त्या बरोबरीची स्पर्धा करतात. म्हणून आतां कोणासही असें म्हणतां येणार नाहीं कीं, मुलांच्या कॉलेजांत गेलें म्हणून मुलींना बाजूस पडल्याचा सासुरवास होत आहे. कांहीं वर्षेंपर्यंत वर्गांतील पुढच्या दोनतीन रांगा मुलींच्यासाठीं राखून ठेवण्याची वहिवाट होती. पण मुलींची संख्या एवढी वाढली कीं, मोठ्या थोरल्या हॉलमधील पुढचीं निम्मीं बाकें मुलीच बळकावून बसूं लागल्या; आणि बापडे पुरुष विद्यार्थी लांब मागें कोठेंतरी बसूं लागले. माझ्यापुरता तरी हा न्याय मीं एकदम बदलून टाकला. वर्गांतील कांहीं उभ्या रांगा मीं मुलांच्या वांटणीला दिल्या आणि कांहीं रांगा मुलींच्या वांटणीला दिल्या; आणि अशा रीतीनें मूळचा पृथक्पणा शिल्लक राहून शिकविणाराच्या जवळ किंवा लांब बसण्याचीं जीं काय सुखदुःखें असतील, तीं उभयतांच्या वांट्याला समसमानच येऊं लागलीं. बी. ए. च्या वर्गांतील ऐच्छिक विषयाच्या बाजूला तर कांहीं कांहीं विषयांत मुलांपेक्षां मुलींचाच भरणा जास्त असतो! या पडलेल्या

फरकावर विनोदी विद्यार्थ्यांनीं एकदां एक फार समर्पक टीका केली. ते मला म्हणाले, " आम्हां पुरुष विद्यार्थ्यांसाठीं उजव्या डाव्या हातचीं दोन चार बाकें राखून ठेवीत जा आणि बाकीचा सारा वर्ग मुलींच्या ताब्यांत देत जा. " त्यांच्या म्हणण्याचा रोख असा कीं, वर्गातील चारदोन बाकें ज्याप्रमाणें पूर्वीं मुलींच्यासाठीं राखून ठेवण्याची वहिवाट असे, तीच वहिवाट आतां आम्हां मुलांना लागू करावी. सांगण्याचा मतलब असा कीं, कॉलेजचें शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या, निदान पहिल्या दोन वर्षांपुरती तरी, मुलांच्या बरोबरीची होत आली आहे.

पहिल्या दोन वर्षांत तरी मुलींची संख्या जवळ जवळ मुलांच्या संख्येइतकीच होत आली आहे, याचा अर्थ स्पष्टच हा आहे कीं, पुढील दोन वर्षांत या उभयतांच्या संख्येंत फार तफावत पडते, आणि या तफावतीचें कारणही सहज समजण्यासारखें आहे. मुली सातव्या यत्तेंत आल्यापासूनच त्यांच्यासाठीं स्थळें शोधण्याचें काम वडील मंडळी सुरू करतात. मॅट्रिक झाल्याबरोबर अनेक मुलींचीं लग्नें होतात म्हणून व अनेक पालकांना मुलींच्या पुढच्या शिक्षणाचा खर्च झेपत नाहीं म्हणून, पास झालेल्या मुलींच्या मानानें कॉलेजांत येणाऱ्या मुलींची संख्या पुष्कळच कमी असते. मुली एकदां कॉलेजांत प्रविष्ट झाल्यानंतर, खर्च झेपत नाहीं म्हणून पालकांनीं ज्यांचें शिक्षण बंद केलें आहे, अशा मुलींची संख्या फारच कमी असते. परन्तु त्यांचें लग्न करून टाकण्याची पालकांची इच्छा मात्र बळावत चाललेली असते. आणि म्हणून पहिल्या वर्षांतल्या मानानें दुसऱ्या वर्षांत म्हणजे इंटरमीजिएटच्या वर्गात मुलींची संख्या पुष्कळच कमी होते. तथापि या कामीं एक मौजेची गोष्ट दिसून येते. लग्न होऊनहि कांहीं मुली शिक्षणाचा लाभ घेतच राहातात, आणि आधींच्या वर्षीं ज्यांचीं नांवें, कुमारी अमुक कुमारी तमुक, अशीं लिहिलेलीं असतात, त्यांचीं नांवें पुढल्याच वर्षीं, सौभाग्यवती अमुक, सौभाग्यवती तमुक, अशीं लिहिलेलीं आढळतात. परन्तु एकंदरीनें पाहतां या दुसऱ्या वर्षीं त्यांची संख्या

पुष्कळच कमी होते. मुली इंटरमीजिएट झाल्या म्हणजे लग्नाचा पुष्कळच धडाका उडतो असें दिसतें. योग्य स्थळ हुडकून काढण्याचे तीन वर्षांपूर्वी सुरू झालेले पालकांचे प्रयत्न एवढ्या अवधींत यशस्वी होतात, किंवा ते यशस्वी करावे लागतातच ! कारण यावेळेपर्यंत मुली सुमारें वीस वर्षांपर्यंत येऊन ठेपलेल्या असतात. याच्यापुढें त्यांचें वय वाढूं देण्यास पालकांची तयारी नसते, आणि माझा अंदाज जर खरा असला तर, बऱ्याचशा मुलींनाच आतां लग्न करावें असें वाटूं लागतें. अर्थातच बी. ए. च्या वर्गात मुलींची संख्या फारच रोडावते.

उत्तरोत्तर ही संख्या जरी कमी होत जात असली तरी सामग्र्यानें पाहतां उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या जलदीनें वाढत आहे हें खरेंच आहे. ही संख्या वाढूं लागली आहे हें पाहतांच अनेक लोकांच्या मनांत असे विचार येऊं लागले कीं, ज्याप्रमाणें मुलींचीं स्वतंत्र हायस्कुलें आहेत त्याप्रमाणें त्यांचीं स्वतंत्र कॉलेजेंही असावीं. कर्वे युनिव्हर्सिटी ही केवळ स्त्रियांसाठीं आहे हें खरें. परन्तु मराठी माध्यमाची स्वतंत्र सोय त्यांनीं केलेली असल्यामुळें तेंच त्या संस्थेचें मुख्य लक्षण बनलें. स्त्रियांना पुरुषां-च्यांत बसवून शिकवावयास नको, अशा भावनेनें ही संस्था सुरू झालेली नाहीं. किंवा सरकारमान्य कॉलेजांतून जें कांहीं शिक्षण मिळतें त्याच्याहून कांहीं अलौकिक निराळें शिकवावें, अशीहि योजना त्या संस्थेनें केलेली नाहीं. अर्थातच, केवळ मराठी माध्यमासाठीं तिकडची ओढ खावी आणि सरकारी मान्यता बुडवावी, असें मुलींच्या पालकांना वाटेना. आणि म्हणून ते आपल्या मुली सरकारमान्य शिक्षणसंस्थांतच घालूं लागले. अनेक पाल-कांना व समाजविचारी लोकांना हें सहशिक्षण मनांतून आवडत नव्हतें. परंतु कॉलेजांत जाणाऱ्या मुलींची संख्याच एवढी अल्प होती कीं, त्यांच्या-साठीं स्वतंत्र कॉलेज काढण्याची कल्पना त्यांच्या मनांत आली तरी ती बळ धरीना. पण, आतां गेल्या थोड्याशा वर्षांत ही संख्या खूप मोठी झालेली असल्यामुळें, स्त्रियांसाठीं स्वतंत्र कॉलेज असावें या कल्पनेनें पुन्हां

एकदां उचल खाल्ली. आणि येथील हुजूरपागा हायस्कूलच्या चालक मंडळींनीं कन्याकॉलेजची स्थापनाही करून टाकली.

ही स्थापना करणाऱ्या लोकांपैकीं कांहींच्या मनांत असा विचार प्रबल होता कीं, सर्वत्र चालू असलेला सध्यांचा सहशिक्षणाचा प्रघात समाजस्वास्थ्याला फारसा पोषक नाहीं; आणि दुसऱ्या कांहींच्या मनांत अशी एक कल्पना होती कीं, ज्ञानाचा बहुतेक भाग जरी स्त्री आणि पुरुष या दोघांना सामान्यच असला तरी, बहुतेक स्त्रिया लग्न करून प्रापंचिक बनणार असल्यामुळें, प्रपंचाला उपयोगी अशीं विशेष प्रकारचीं ज्ञानें त्यांना द्यावीं हें बरोबर आहे, व म्हणून तीं देण्याची निराळी व्यवस्था केली पाहिजे. या किंवा त्या किंवा दोन्ही कारणांसाठीं स्वतंत्र व्यवस्था करावी असा विचार जेव्हां वाढूं लागला, तेव्हां पांढरपेशा लोकांच्या मनांत, सध्यां काय चालूं आहे आणि विशेषतः त्यांच्यांतील स्त्रियांनीं आधुनिक कालांतील आपल्या जीविताविषयीं कोणचा ध्येयवाद आपल्या दृष्टीपुढें ठेवला आहे, याचा परस्पर निकाल झाला असें क्षणभर वाटलें.

स्वतंत्र कॉलेजची स्थापना ज्यांनीं केली, ते चांगले चौकस आणि समंजस गृहस्थ होते; आणि आपल्याला या कामीं किती यश मिळेल, याचा अंदाजही त्यांनीं बरोबर केला होता. ज्या पालकांना सध्यां चालूं असलेलें सहशिक्षण नको किंवा केवळ स्त्रियांना उपयोगी असें कांहीं निराळें शिक्षण मिळावें असें वाटलें, त्यांनीं आपल्या मुली या नवीन कॉलेजांत घातल्या. परंतु, पुणें शहरांत सध्यां कॉलेजांत जाणाऱ्या मुलींची जी संख्या आहे, तिच्या मानानें या कॉलेजांतील मुलींची संख्या फारच लहान ठरली. कोणचेंही नवीन कॉलेज निघालें म्हणजे पहिल्यानें त्याची संख्या थोडी लहानच असते, हें समाधान या ठिकाणीं लागूं पडण्यासारखें नव्हतें. निराळें कॉलेज काढावें या बाजूचे दोन स्पष्ट विचार या संस्थेला उपकारक म्हणून पुढें आलेले होते. आणि ते आतांच वर सांगितले

आहेत. या दोन्ही विचारांचा या संस्थेला तावडतोब उपयोग व्हावयास हवा होता. पालकांना आणि स्त्रीवर्गाला जर ते विचार पसंत असते, तर ते या संस्थेच्या उपयोगी पडलेही असते. पण ते पडले नाहींत हें, तें कॉलेज बुडालें यावरून, स्पष्ट आहे. शेंकडों पालकांचें असें स्पष्ट मत आहे कीं, सध्यां ज्या पद्धतीनें मुलें आणि मुली एकत्र बसून शिकतात, त्या पद्धतींत कांहींहीं गैर नाहीं; आणि म्हणून स्वतंत्र संस्थांची कसलीच जरूरी नाहीं. पालकांनीं आपलें मत प्रत्यक्ष कृतीनें दाखविलेलें आहे हें ध्यानांत टेवण्यासारखें आहे. पण या कामीं एक खरा खरा बलवत्तर विचार सरसकट समाजांत पण विशेषतः स्त्रीवर्गाच्या मनांत उभा आहे, त्याकडे आपल्याला जास्त लक्ष दिलें पाहिजे. तो विचार असा.

संस्कृतीच्या जपणुकीची जी काळजी पुरुषवर्गाला आहे तीच काळजी स्त्रीवर्गालासुद्धां आहे. ही काळजी फक्त आपल्या वांट्याला आलेली आहे आणि स्त्रीवर्गाचीं मतें या बाबतींत शुद्ध निष्काळजी बनलीं आहेत, असें समजणें हें स्त्रियांच्या मनाची पारख केली नसल्याचेंच दर्शक आहे. समाजाचें सामुदायिक हित दोघांच्याहि मनांत आहे. परंतु, शिक्षणाचें वारें प्यालेल्या स्त्रियांच्या मनांत या कालमानांत तरी प्रबलपणानें वागणारा विचार कोणचा, हें बऱ्याच पुरुषांनीं अजून ओळखलेलें नाहीं. वर सांगितलेलें कॉलेज निघावयाच्या आधीं त्या कामांत गढलेल्या माझ्या एका स्नेह्यानें मला सांगितलें कीं, मुलींच्यासाठीं निराळें कॉलेज असावें काय, याबद्दलचें तुमच्या कॉलेजांतील मुलींचें मत तुम्ही एकदां अजमावून पहा. मी त्याप्रमाणें करून पाहिलें आणि त्यांना सांगितलें कीं, प्रौढ विद्यार्थीनींचें फार मोठें बहुमत या निराळ्या संस्थेच्या विरुद्ध आहे. या माझ्या स्नेह्याला या गोष्टीचें मोठें नवल वाटलें, आणि त्यानें मला परत सांगितलें कीं, बरेचसे पालकही या मुलींच्याच मताचे आहेत. मुलींच्या या मताचा अर्थ भाबड्या लोकांनीं अगदीं निराळा लावला.

ते म्हणाले, “ मुलांच्या सहवासांतून बाहेर पडणें या मुलींना नकोसें वाटत असलें पाहिजे. आणि म्हणून याचा अर्थ असा होतो कीं, मुली धृष्टच बनल्या आहेत. ” भाबड्या लोकांनीं बसविलेला हा अर्थ सपशेल चूक आहे, असें मलाही वाटत नाहीं. मुलांच्या सहवासांतून बाहेर पडण्याची कल्पना मुलींनाहीं नापसंत असणें अगदीं शक्य आहे. पण तेवढ्यावरून त्या धृष्ट बनलेल्या आहेत हें अनुमान मात्र मला काढतां येत नाहीं. मुलांच्या सहवासांत एवढें बिचकण्यासारखें काय आहे, कीं ज्यासाठीं आम्ही त्यांच्यांतून निराळें निघावें ? हाच विचार मुलींच्या मनांत असतो. कांहीं मुलें जर वाणीनें किंवा वर्तनानें वाईट असलीं तरे त्यांच्यापासून पळून जाऊन नव्हे तर त्यांची उपेक्षा करून किंवा अवश्य असल्यास त्यांचा प्रतिकार करूनच, त्यांचा उपसर्ग मोडला पाहिजे. बिभिस्तपणा हा पुष्कळदां दुष्प्रवृत्त माणसाला प्रोत्साहक बनतो; आणि म्हणून, त्याच गुणाचा अवलंब न करतां आपल्या भूमीवर ठांसून उभें राहणें, यांतच स्त्रीस्वभावाचें खरें वैभव आहे, असेंच स्वाभिमानी सुशिक्षित मुलींना वाटणें अगदीं बरोबर आहे. शिवाय, पुरुषवर्ग म्हणजे कांहीं त्याज्य वस्तू आहे कीं काय ? परस्परांच्या सान्निध्यांत कांहीं एक विशेष प्रकारच्या गुणांची देवघेव आपोआप होते. आणि युक्त मर्यादेनें आंखून दिलेलें यौवनसुलभ साहचर्याचें मानसिक सुख अनुभविण्यांत कसलाही प्रत्यवाय नसावा, असेंही त्यांस वाटत असलें पाहिजे. आपल्या घरच्या प्रपंचांत किंवा स्नेह्यासोबत्यांच्या संगतींत स्त्रीपुरुषांच्या मिश्रणानें सुखाचा जो साक्षात्कार सर्वांनाच होतो, तोच विद्येच्या मंदिरांतहि त्याच मिश्रणानें कांहीं काळ येत राहिला तर त्यांत काय गैर आहे ? हाच विचार सुशिक्षित स्त्रियांच्या आणि आतांच सांगितलेल्या पालकांच्या मनांत प्रबलपणानें वागत असला पाहिजे.

परन्तु याहीपेक्षां महत्त्वाचा विचार पुढेंच आहे. नवीन स्त्रियांच्या मनाचें या युगमानांतलें मुख्य लक्षण हें आहे कीं, आपण पुरुषांच्या बरो-

बरोबरीच्या आहों हें प्रस्थापित करावें. पुरुषाची जात कित्येक युगेंपर्यंत स्त्रियांना सांगत आली आहे कीं, स्त्रियांचें शहाणपण एकंदरींत बेताचेंच आहे, त्यांना सृष्टीनेंच दुबळें बनविलें आहे, त्यांच्या शक्ति फार मर्यादित आहेत. स्त्रियांच्या वांट्याला सौम्य आणि सात्विक गुण व भावना आलेल्या आहेत; आणि जें जें कांहीं उग्र आहे, आक्रमशील आहे, बुद्धीच्या प्रखरपणाचें आहे, तें तें पुरुषाच्या वांट्याला आलेलें आहे! सृष्टीनें केलेल्या गुणांच्या वांटणीचा हा सारा वेदान्त स्त्रियांच्या मनांत खोटा ठरवावयाचा आहे. स्त्रियांच्या प्रस्तुतच्या युगमानाचें हेंच मुख्य लक्षण आहे. तुम्ही म्हणतां तसा कांहींएक प्रकार नाहीं; कांहीं असलाच तर तो अगदीं शेवटच्या शेवटच्या स्तबकांत आणि जीविताच्या एकदोन शाखांत खरा असेल; पण बाकी प्रत्येक ठिकाणीं, प्रत्येक शाखेंत, आणि व्यवसायांत आम्ही तुमच्या बरोबरीच्या आहोंत, असें आम्ही तुम्हांस दाखवून देऊं—या आकांक्षेनें आधुनिक स्त्रीच्या मनाचा कबजा पूर्णपणें घेतलेला आहे, आणि म्हणून ती प्रत्येक ठिकाणीं आपला रिघाव करून घेत आहे.

ती राजकारणाच्या आखाड्यांत शिरते; ती सभा गाजविते; ती तुरुंगांत जाते; ती वारल्यांत जाऊन त्यांना बंडखोरी शिकविते; ती नाटकांत शिरते; कॉलेजमध्यें प्राध्यापकत्वाचें काम मोठ्या नीटसपणानें करते; संशोधकाची भूमिका पत्करते आणि रेडिअमचा शोध लावते; ती सर्कशींत शिरते आणि सिंहाच्या पाठीवर जाऊन बसते; झगा घालून ती न्यायमंदिरांत जाऊन उभी राहते आणि पुरुषवकिलाला लाजवील असें फर्डे वक्तृत्व करते; देशोदेशींचें श्रेष्ठ मुत्सद्दी आणि कर्ते लोक एकत्र जमले असतां त्यांच्यापुढें धिटाईनें उभी राहून आपल्या देशाची बाजू मोठ्या कौशल्यानें आणि वक्तृत्वानें मांडते आणि प्रतिपक्षाचा पराभव करून आपल्या मस्तकावर अभिनंदनांचा वर्षाव करून घेते; ती संस्कृतांत बाक्षिसें मिळविते; गणित विषय घेऊन पहिल्या श्रेणींत पहिली येते—अशा प्रकारें जेथें जेथें तुम्ही

जाल, तेथें तेथें तिनें आपला संचार केलेला आहे आणि ज्या वरिष्ठ स्थानांवर उभें राहण्याची संवय तुम्हांला आजवर होती, त्या स्थानांवर स्त्री आरूढ झालेली आहे, असा देखावा तुम्हांला दिसेल. या सर्व स्थित्यंतराच्या बुडाशीं एकच महान् विचार आहे. केवळ दास्यविमोचन झाल्यानें संतुष्ट होणारी स्त्री मागेंच अंतर्धान पावली आहे. तुमच्याशीं स्पर्धा करणारी स्त्री या युगांत उत्पन्न झालेली आहे. म्हणून वर म्हटलें कीं, स्त्रीजातीच्या सध्यांच्या युगमानाचें लक्षण पुरुषजातीशीं स्पर्धा हें आहे.

जाणूनबुजून किंवा अजाणतां स्त्रीचें मन याच दिशेनें भ्रमण करीत असतें; आणि म्हणून गैरसोयीच्या वाटण्यासारख्या अनेक गोष्टी तिच्या हातून होत असतात. ज्यांना संस्कृतिविषयक जपणूक महत्त्वाची वाटते त्यांनीं हा विचार ध्यानांत व्यावयास हवा कीं, त्यांच्या स्वतःच्या मनाचें मुख्य लक्षण जपणूक हें आहे, आणि आधुनिक स्त्रीच्या मनाचें मुख्य लक्षण स्पर्धा हें आहे. या स्पर्धेच्या पर्वांतून स्त्री एकदां बाहेर पडली म्हणजे तिलासुद्धां जपणुकीचा विचार प्राधान्येंकरून पटूं लागेल. आजच्या घटकेलासुद्धां स्त्रियांनीं हा विचार टाकला आहे, असें समजणें चूक आहे. पण विशेषत्वेंकरून त्यांच्या मनावर या स्पर्धेचाच अंमल चालू असतो; आणि या दृष्टीनेंच स्त्रियांचें निराळें कॉलेज काढण्याच्याविरुद्ध त्यांनीं दिलेल्या मताचा अर्थ आपण बसविला पाहिजे. असो.

कॉलेजांत वाढत चाललेली मुलींची संख्या लक्षांत घेऊन त्या संख्येची वाढ केव्हां होते आणि ही संख्या उताराला केव्हां लागते, तसेंच संख्या मोठी झाल्यामुळें स्वतंत्र कॉलेजचा प्रश्न कसा निघाला व त्याला यश कां आलें नाहीं इ. प्रश्नांची चर्चा करून शेवटी स्त्रियांच्या मनाचें या युगमानांतील मुख्य लक्षण कोणतें याचा विचार त्याच मुद्याच्या अनुरोधानें या लेखांत केलेला आहे. प्रौढ मुलें आणि मुली एकत्र नांदल्यानें कोणचे कोणचे सामाजिक प्रश्न उत्पन्न होतात, याची चर्चा आतां करावयास हवी.

---

# मुलांमुलींचें लग्नाचें वय व त्यांचें संमिश्र जीवन ६

कॉलेजांत येणाऱ्या मुलींची संख्या वाढत चालली आहे, यावरून मनांत येणारे कांहीं विचार मागें दिले आहेत. विद्यार्थी व विद्यार्थिनी यांचें जें सहशिक्षण चालू आहे, अथवा शिक्षणासाठीं त्यांचें जें संमिश्र जीवन सध्यां सुरू आहे, त्याविषयीं कांहीं विचार आतां सांगतों. कै. आगरकर आणि त्यांच्याच पद्धतीनें विचार करणारे इतर सुधारक यांनीं, लग्नाच्या वेळीं मुलींचें वय काय असावें, यासबंधानें पुष्कळच चर्चा केली. मुलींना शिक्षणाचा लाभ झाला पाहिजे, असाहि आग्रह त्यांनीं धरिला. या त्यांच्या प्रतिपादनाचा योग्य तो परिणाम सुशिक्षित समाजाच्या मनावर खचितच झाला. या परिणामाची छाननी मात्र करावयास हवी. एखादा नवा प्रघात पाडावयास तत्त्वविचाराची संमति असावी लागते. अडचणींत सांपडून समाज एखादा नवीन प्रघात पाडतोही. पण त्याच्या मनाला थोडी मळमळ राहते. जर या प्रघाताला तात्त्विक अधिष्ठान प्राप्त झालेलें असलें तर मात्र समाजाला समाधान लाभतें, आणि बुद्धिदृष्ट्या समाज निर्भय बनतो. केवळ तत्त्वविचाराच्या मान्यतेनें किंवा प्रोत्साहनानें एखादी कल्पना फोफावते असें मात्र म्हणतां येत नाहीं. ती यशस्वी होण्यास परिस्थितीची अनुकूलताही असावी लागते. स्त्रीशिक्षण आणि प्रौढ विवाह यांना तत्त्वविचाराची मान्यता आणि प्रोत्साहन हीं मिळालीं खरी; पण, जर परिस्थिती अनुकूल नसती तर या चळवळी इतक्या वाढीस लागल्या असत्या, असें वाटत नाहीं. विद्या शिकणाऱ्या समाजाची गृहस्थिति बदलूं लागली; ज्याचें त्याला मिळूं लागलें पाहिजे, हा विचार दृढ होत चालला; बापाची कमाई फार झालें तर मुलाच्या शिक्षणाला पुरेल, पण त्याचें शिक्षण आणि त्याचा

आरंभींआरंभींचा प्रपंच या दोहोंनाही ती पुरी पडण्यासारखी नसते, हें दोनही पिढ्यांच्या ध्यानीं आलें; आणि मुलांचें वय वाढूं लागलें. शिक्षण संपल्याशिवाय लग्न करणें चूक आहे, असें वडील व मुलगा या दोघांनाही कळूं लागलें. मुलांचें लग्नाचें वय जर वाढलें तर मुलींचीं लग्नें लवकर करून टाकण्याचा त्यांच्या वडिलांचा हट्ट मुळींच चालण्यासारखा नव्हता. अर्थात् मुलींचेही वय वाढूं लागलें व त्या शिकूंही लागल्या. पण तें वाढूं लागलें तरी पालकांना त्यांत कांहीं गैर वाटेनासें झालें. कारण, चांगल्याचांगल्या सुधारकांनीं याला तात्त्विक संमति दिलेलीच होती. प्रौढविवाह रूढ होण्याचें असें हें अगदीं साधें कारण आहे!

लवकरच यांत आणखी एक भर पडली. सांपत्तिक पेंच इतका वाढत चालला कीं जर कांहीं मिळवितां आलें तर बरें, असें मुलींनासुद्धां वाटावयास लागलें. मुलानें मिळवावें आणि मगच लग्न करावें हें बरें, असें बापाला वाटतां वाटतां, आपण जिच्याशीं लग्न करणार तिलाही कांहीं मिळवितां येत असलें तर बरें, असें नवरदेवांनाही वाटूं लागलें. हा दुसरा टप्पा कुटुंबस्वास्थ्याच्या दृष्टीनें विचार करण्यासारखा आहे. पण पांढरपेशा-समाजांतील दारिद्र्य इतक्या सपाट्यानें वाढत चाललें कीं, हा टप्पा गांठा-वयास त्याला फारसा वेळ लागलाच नाहीं. याच्याच पोटांत एक नवा अंकुर उत्पन्न झाला. आपली पत्नी कांहीं तरी मिळविणारी असावी, असें तरुण माणसाला जर वाटूं लागलें तर, हें कांहीं तरी मिळवूं लागलेल्या मुलींच्या मनांत एक नवाच कौटुंबिक विचार उत्पन्न झाला. घरांतील मुलगा जसा अवश्य तितकें शिकतो, आणि कदाचित् थकत चाललेल्या आपल्या आईबापांना पोसतो किंवा पोरक्या झालेल्या आपल्या भावंडांचीं जबाबदारी उचलतो तशी ती आपणही कां उचलूं नये, हा कौटुंबिक विचार अनेक मुलींच्या मनांत उत्पन्न होऊं लागला, आणि त्या दृष्टीनें त्या जास्त जास्त शिकूं लागल्या. स्त्रियांच्या शिक्षणाकडे जे लोक थोड्या शंकेखोर-

पणानें अजूनही पाहतात, त्यांनीं आतांच सांगितलेल्या मुलींच्या मनाचें हें औदार्याचें चलनवलन अवश्य ध्यानांत घ्यावें. दादा जी जबाबदारी उचलतो ती थोडीफार मीसुद्धां उचलावी, असें त्या ताईला वाटूं लागलें आहे हे कशाचें द्योतक आहे बरें ? आपल्या स्त्रियांच्या स्वार्थत्यागबुद्धीची आपल्याला अजून जाणीव नाहीं. मला अशीं कितीतरी उदाहरणें माहीत आहेत कीं, मुलींनीं पदवीधर व्हावें आणि आपल्या धाकट्या भावंडांचें शिक्षण व्हावें म्हणून स्वतः अविवाहितच राहावें. कुटुंबाच्या संबंधाच्या आत्मीयतेचा केवढा जिव्हाळा या मुलींच्या मनांत नांदत असतो तो पहा. देहधर्म अर्थात् कुणालाच चुकत नाहींत. पण एवढी गोष्ट खरी कीं या मिळवत्या मुली लग्न करून दुसऱ्या घराण्यांत गेल्या तरी मागें घरीं राहिलेल्या आपल्या भावंडांच्याकडे त्यांचा जीव सारखा ओढत असतो. पण आपला प्रस्तुतचा मुद्दा हा आहे कीं, आपणही काहीं मिळवावयास हवें हा विचार मुलींच्या मनांत स्थिर होत चाललेला आहे, आणि अगतिक बनलेल्या अनेक आईबापांना हा त्यांचा विचार मान्य करावा लागत आहे.

मुलांच्या लग्नाची वयोमर्यादा वाढत चालली म्हणून, आणि आपल्यालाच कांहीं मिळविणें अवश्य आहे हें मुलींना दिसूं लागलें म्हणून, जसें मुलींचें शिक्षण आणि मुलांच्या लग्नाचें वयोमान हें पुढें चाललें, तसें हें दोनही पेंच ज्यांना बाधत नाहींत अशा श्रीमंतांच्या मुलीही याच प्रणालींत सांपडूं लागल्या. एक तर त्यांना आपणही शिकावें अशी हौस उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. आणि दुसरें म्हणजे आपल्या बरोबरीच्या इतक्या मुली अविवाहित दिसत असतांना आपणच अगदीं लहानपणीं लग्न करून बसणें ही गोष्ट त्यांना चमत्कारिक वाटूं लागली. सगळ्यांत मौजेची गोष्ट म्हणजे, पांढरपेशा समाजांतील श्रीमंतांच्या मुलांनीं आपलींही लग्नें पुढें ढकलावीं, ही होय. त्यांना कसलीच अडचण नसते. परंतु, बरोबरीची बहुतेक सारी प्रजा, म्हणजे ओळखीचे चटसारे स्नेही सोबती, अविवाहित दिसत असतांना

आपणच कोंवळ्या वयांत गृहस्थ बनावे याचें त्यांनाही कसेंसेंच वाटतें आणि म्हणून दरिद्री तरुण मुलांच्या बरोबर श्रीमंत तरुण मुलेंही लग्नें लवकर करीनाशीं झालीं. याप्रमाणें सबंध समाजांत लग्नीय मुलें व मुली चांगलीं प्रौढ बनलीं.

कॉलेजांत जमा होणाऱ्या मुलामुलींच्या मानसिक हालचालींकडे मी बारकाईनेंच लक्ष देत असें. माझ्या ध्यानांत येऊन चुकलें आहे कीं, जर परिस्थितीनें शक्य झालें तर इंटरमीजीएटच्या वर्गांतील मुलें लग्नाला खुषीनें तयार होतील आणि कॉलेजमध्यें आलेल्या, फार काय सांगावें पण इंग्रजी सातवींत असलेल्याही मुली, लग्नाला नकार देणार नाहींत. आपल्या शिक्षणाची मुदतच जर कमी झाली, म्हणजे सरासरी वीस वर्षांच्या वयाला जर मुलांना धनोत्पादन करतां आलें, तर लग्न करावयास तीं एका पायावर तयार होतील. त्यांच्या मनाचें चलनवलन काय आहे, तीं काय बोलतात, त्यांना काय आवडतें, त्यांचें मन कशावर गुंजारव करीत बसतें, तीं कुणाचें ध्यान करतात, हें सर्व जबाबदार माणसांनीं बारकाईनें पहावें, आणि मी म्हणतों हें खरें कीं खोटें, हें मोकळ्या मनानें सांगावें. मुलांच्या मनाचे हे व्यापार चालू असतात, असें म्हणणें म्हणजे, आपण त्यांची निंदा करतों किंवा त्यांचें कांहीं बिंग म्हणजे व्यंग बाहेर काढतों, असें नाहीं.. आपण केवळ वस्तुस्थितीचें अवलोकन व वर्णन करतों इतकेंच. मी म्हणतों ही गोष्ट मुलेंसुद्धां मान्य करतील; फक्त आपण त्यांचा विश्वास संपादन केला पाहिजे. जी गोष्ट मुलांची तीच मुलींची. त्यांच्यासंबंधानें कांहीं निराळें सांगावयास नको.

सध्यां असें होत आहे कीं, लग्नाची इच्छा असूनही मुलांना तरी फार दिवस खोळंबून रहावें लागत आहे. याचा जो विपरीत परिणाम व्हावयाचा तो होतोच होतो. मुलें शरीरतः नीतिमान् राहतात यांत मला कसलीही शंका नाहीं. ज्या समाजकोशांत तीं जन्मलीं आणि वाढलीं

आहेत, त्यांतील परंपराच अशी आहे कीं प्रमादाकडे झुकतांना माणसाला ओशाळगत वाटावी. पण हें तुरग–ब्रह्मचर्य कंठीत राहणें मुलांना भाग पडावें, याचें फार वाईट वाटतें. कांहींचीं शिक्षणें तर अठ्ठावीस तीस वर्षांपर्यंत संपत नाहींत. यानंतर या मुलांचीं लग्नें होतात. आणि त्यांच्या डोक्यांत जर 'पोरबंदी'चें वेड शिरलेलें नसलें, तर यापुढें नवीन पिढी जन्मास येऊं लागते. पण येथें एक नवीन विचार मनांत येतो. तीस वर्षांच्या वयाला गृहस्थ बनलेल्या या माणसाला गार्हस्थ्याचा आनंदकारक सुखानुभव पराकाष्ठा वीस वर्षेंपर्यंत भोगतां येतो. कारण, आपल्यांतील बहुतेक लोक पन्नास वर्षांच्या वयाला खरोखरच थकूं लागतात. दांत पडणें, केस पिकणें, डोळे मिचामिचे होणें, या वार्धक्याच्या खुणा बहुतेकांच्या ठिकाणीं पन्नाशीच्या सुमारासच दिसूं लागतात. आणि, आपण केले सवरलेले आणि थकले भागलेले गृहस्थ आहों, असें त्यांना वाटूं लागतें. उभ्या जीवितांत गार्हस्थ्याचा उल्हासप्रद अनुभव माणसाला वीसच वर्षें लाभावा हें कांहीं बरें नव्हे. म्हणून मुलांच्या लग्नाची वयोमर्यादा वीस ते बावीसापर्यंतच आणून ठेवली पाहिजे.

मुलांची वयें इतकीं वाढल्यामुळें आणि बहुतेक मुली विशीच्या सुमारांतच असल्यामुळें पुष्कळदां या वधूवरांच्या वयांत दहा दहा वर्षांचें अंतर राहतें. आणि हें राहूं नये म्हणून मुलींचीं लग्नें जर पुढें ढकललीं, तर त्यांचे मूळचें सौंदर्य कमी होत आहे आणि त्या रुक्ष आणि वठल्यासारख्या दिसत आहेत, हें चाणाक्षांच्या ध्यानांत येतें. या सर्वांला उपाय म्हणजे, वीस बावीस वर्षांच्या वयाला मुलांचें शिक्षण परिपूर्ण व्हावें, हा आहे. पण तें कसें परिपूर्ण करावें याचें विवेचन मी येथें करीत बसलों तर तर माझा संकल्पिलेला दुसरा विषय बाजूला राहील. म्हणून त्याचें विवेचन स्वतंत्रपणें करावयाचें ठरवून आपण मुलांमुलींच्या संमिश्र जीवनाकडेच त्वरेनें परत वळावयास हवें.

परस्परांच्या सहवासांत या दोघांनाही एक प्रकारची सूक्ष्म सुखोत्पत्ति होते, हें नाकारण्यांत मतलब नाहीं. ज्या वर्गांत मुली मुळींच नाहींत, त्या वर्गांत जर आपलें नांव पडलें तर पुष्कळ मुलांना मनांतून चैन पडत नाहीं. या बाबतींत मीं मुलींना विचारून पाहिलें नाहीं. पण कांहीं मुलींच्या तरी मनांत हीच निराशेची हुरहूर उत्पन्न होईल, असा माझा अन्दाज आहे. आणि यांतूनच एका निराळ्या सामाजिक प्रघाताला हळू-हळू सुरवात झाली आहे व तो प्रघात स्वाभाविकपणेंच बलवत्तर होत जाईल असें दिसतें. आजपर्यंत झालेल्या प्रीतिविवाहांची संख्या फार कमी असेल हें खरें. परंतु सुशिक्षित समाज हा तदुन्मुख बनत चालला आहे, हें मान्यच करावें लागेल. मुलें आणि मुली वयानें प्रौढ झाल्यानंतर, आणि त्याहीपेक्षां म्हणजे दिवसाचा इतका वेळ त्यांनीं एकमेकांच्या संगतींत घालवल्यानंतर, त्यांना परस्परांचें आकर्षण वाटूं नये किंवा या आकर्षणास अनुसरून त्यांच्या मनांत गूढस्थ चलबिचल सुरू होऊं नये, अशी अपेक्षा करणें अगदीं चूक आहे. मुलें काय किंवा मुली काय, अमुक एका समाज-कोशांत जन्मलेलीं आणि वाढलेलीं असल्यामुळें त्यांच्या मनावरचे संस्कार एकदमच लटपटत नाहींत. आणि हेंही ठीकच आहे. परंतु परंपरेनें प्राप्त झालेल्या संस्कारांची अवश्य तेवढी बूज राखून यांचीं मतें इष्ट दिशेकडे ओढूं लागावीं, हें अतिशय स्वाभाविक आहे. याठिकाणीं आपण एका मोठ्या विषयापाशीं येऊन टेपतों, असें मला वाटतें.

समाजांत पडत चाललेले फरक कधीं अचानक पडत नाहींत. ते हळूहळू पडत जातात. पण ते पडूं लागले आहेत, याकडे मात्र सर्वांनींच अवधान ठेवलें पाहिजे. आपण जर आपलीं मुलें प्रौढ वयाचीं असतांना-सुद्धां शिक्षणसंस्थांत एकत्र ठेवितों, तर आतां त्यांच्या मनांत काय चम-त्कार चालू होतील आणि त्याबद्दल कोणची तरतूद आपण स्वतः ठेवा-वयास हवी, याचा विचार आईबापांनींच करावयास नको काय ? मुलांच्या

मनांत, पण त्यांतल्या त्यांत विशेषतः मुलींच्या मनांत, जी चलबिचल चालू झाली असेल, ती व्यक्त करण्याचें त्यांना भयच वाटूं लागतें. आपल्या हातून कांहींतरी प्रमाद घडत आहे कीं काय, असें त्यांचें मन त्यांना खाऊं लागतें. ही गोष्ट कोणापाशीं बोलावी, हें त्यांना नेमकें कळत नाहीं. आणि नित्याच्या सहवासांतल्या मैत्रिणींनीं त्याचा गंमतीनें उल्लेख केला तरी, तें तसें नाहीं, असें म्हणण्यांतच त्यांना सुरक्षितपणा वाटतो ! याही कुचंबणेंतून कांहीं मुलें किंवा मुली मार्ग काढीत असतील. परंतु एकंदरीनें पाहतां परस्पर–ओढीचें हें प्राथमिक स्तबक थोडें जिकीरीचें बनतें यांत कांहीं शंका नाहीं. याच वेळीं आईबापांनीं आपल्या मुलांच्या साहाय्याला आलें पाहिजे, अथवा मुलांमुलींना आपल्या वडील माणसांचें साहाय्य घेतां आलें पाहिजे.

माझें लिहिणें वाचून आईबापांना राग येईल. पण या बाबतींतील आपलें कर्तव्य ते नीट बजावतात असें मला वाटत नाहीं. आईबाप म्हणजे कोणीतरी धाक दाखविणारे, रागें भरणारे, आणि प्रत्येक कामांत आपल्याला मोडता घालणारे असे लोक आहेत, ही भावना मुलामुलींच्या मनांत कायम झालेली असते. हें खरें कीं खोटें, हें आईबापांनींच तपासून पहावें. आपल्या मनांत आलेली गोष्ट फार हळुवार ममत्वानें आणि गूढ विश्वासानें आईपाशीं बोलून दाखवावी, किंवा निदान बहिणीच्या किंवा भावाच्या द्वारां गुप्तपणें बापाच्या कानावर घालावी, म्हणजे आई किंवा बाप त्या गोष्टीचा विचार फार ममत्वानें आणि काळजीनें करतील असा विश्वास मुलांच्या मनांत उत्पन्न व्हावयास हवा. आईबापांनीं आपलें वर्तन, नव्या काळाला अनुसरून जलदीनें बदलावयास हवें. वर्तन याचा अर्थ मनाची ठेवण असा धरावयास हवा. आपलीं मुलें म्हणजे केवळ वचकांत ठेवावयाच्या वस्तू आहेत आणि त्यांच्या भावी जीविताची व्यवस्था लावण्याचें काम सर्वथा आपल्याकडेच राहिलें पाहिजे असा हेका आईबाप धरतात. या हेक्यानें दोघांचेंही नुकसानच

होणार आहे. मुलांनीं कोणचे विषय अभ्यासावे आणि कोणच्या व्यवसायांत पडावें, याचा विचार करतांना आईबाप पुष्कळच औदार्य दाखवितात! तुम्हांला जें येईल तें शिका, असें ते म्हणतात; जें करतां येईल तें करा, अशी परवानगी देतात. याचा अर्थ असा कीं, त्यांची प्रवृत्ति विचारांत घेण्यासारखी आहे, आणि आपणच आपला हट्ट चालवितां कामा नये, हें आईबाप चांगलें उमगतात. या कामांत त्यांनीं दाखविलेलें हें औदार्य मुलांच्या जीविताच्या दुसऱ्याही शाखांत त्यांनीं दाखविलें पाहिजे. विवाहाच्या बाबतींत आपल्या म्हणण्याचा विचार आईबाप फार काळजीनें, ममत्वानें, आणि हुशारीनें करतील, अशी मुलांच्या मनाचीं खात्री होऊन चुकली पाहिजे. धुडकावून लावणारे किंवा "या मूर्खांना काय कळतें!", असें म्हणून आपली अवहेलना करणारे हे नसून आपल्या म्हणण्याचा हे फार सहृदयतेनें विचार करतील, अशी एक मित्रभावाची जाणीव मुलांच्या मनांत आईबापांविषयीं उत्पन्न व्हावी. असें जर झालें तर किती तरी ठिकाणीं प्रीतिविवाहाचें काम सोपें होईल. पण मुलांना म्हणजे मुलामुलींना आईबापांची भीतीच वाटत असते. स्वतःच्यासंबंधींची ही भीतीची जाणीव मुलांच्या मनांतून नाहींशीं करणें हें सध्यां आईबापाचें प्रमुख कर्तव्य आहे.

मला स्वतःला चारपांच ठिकाणीं अशा प्रकरणांत मन घालणें प्राप्त झालें. नवल असें कीं, ज्या मुलांमुलींनीं आपलें मनोगत मला मोकळेपणानें सांगितलें, त्यांना तेंच मनोगत आईबापांना सांगण्याची भीति वाटत होती. आणि ही भीति यथार्थ होती हें माझ्या पुढें ध्यानांत आलें. अगदीं पहिल्या तऱ्हेची लग्नपद्धतीही सध्यां रूढ नाहीं आणि उघड उघड, स्वच्छंद नव्हे पण स्वेच्छेप्रमाणें, मोकळ्या मनानें घडून येणारा आणि मुलांमुलींनीं आपल्या पसंतीनें कायम केलेला असा विवाहही सध्यां चालू नाहीं. प्रीतिविवाहाकडे समाज वळलेला आहे ही गोष्ट खोटी नाहीं. परंतु, त्याच्या प्रास्ताविक स्तबकांत तो कांहींसा कुचंबून राहिलेला आहे. आईबापांनीं

ही कुचंबणा नष्ट केली पाहिजे. मी जेव्हां या मुलांच्या मनोगताविषयीं त्यांच्या वडिल माणसांशीं बोललों, तेव्हां ती आईबापें रागानें अगदीं बेफाम होऊन गेलीं ! " आम्हांला न विचारतां यांनीं हें एकमेकांत कां ठरवावें!" हा त्यांचा सवाल होता. वास्तविक पाहतां, जातगोत, शिक्षण, व्यवसाय यांपैकीं कोणच्याही दृष्टीनें या मुलांच्यांत परस्परांना विसदृश असें कांहींही नव्हतें. त्यांनीं फक्त एवढेंच केलें होतें कीं, आपली परस्परांवर प्रीति आहे हें त्यांनीं एकमेकांस सांगितलेलें होतें आणि, आतां पुढें काय करावें, या पेचांत तीं मुलें होतीं. आईबापांना सांगावें तर ते काय म्हणतील याची जाणीव त्यांना होतीच होती. पण न सांगूनही भागण्यासारखें नव्हतें; म्हणून विशेष विश्वासानें त्यांनीं माझ्याजवळच ही गोष्ट काढली.

जातां जातां येथें एक बारकासा विचार सांगावयास हरकत नाहीं. घरांतील वडील माणसें, म्हणजे मुख्यतः पुरुष, मुलांच्याशीं फार तुसडेपणानें वागतात. त्यांच्याशीं पुष्कळ चर्चा करणें, निरनिराळ्या विषयांवर बोलणें, बऱ्यावाईटाची शहानिशा करणें हें प्रकार फारसे कोणी करीतच नाहीं. उलट, ज्या ठिकाणीं वर्ग विशेष लहान असतील आणि अभ्यासाचे तास पुष्कळ असतील, त्या ठिकाणीं आपल्या प्राध्यापकासंबंधानें—जर तो पात्र असला तर उभय—विद्यार्थ्यांच्या मनांत विलक्षण आत्मभाव उत्पन्न होतात. नाना प्रकारच्या विषयांवर तो त्यांच्यापुढें वर्षानुवर्ष बोलत राहतो, आणि विचार व भावना यांची मोठी गमतीची देवघेव त्यांच्यांत अव्याहत चालू राहते. स्वाभाविकपणेंच आपल्या आईबापांच्याविषयीं प्रीति आणि आदर हीं कायम ठेवूनसुद्धां आपल्या प्राध्यापकांविषयीं आदर, प्रीति, आणि विश्वास या सर्वांची संमिश्र भावना विद्यार्थ्यांच्या मनांत उत्पन्न होते. याचा प्रत्यय मला कितीदां तरी आलेला आहे, आणि इतर अनेक प्राध्यापकांना तो येत असेल यांत कांहीं शंका नाहीं.

या संमिश्र भावनेला वश होऊन, वर सांगितलेल्या मुलांनीं आपलें मनोगत माझ्यापाशीं बोलून दाखविलें; आणि मी यांत कांहीं तरी पुढाकार

घ्यावा अशी नाजुक इच्छा त्यांनीं प्रगट केली. पण आतांच सांगितल्या-प्रमाणें या गोष्टीची वाच्यता करतांच आईबापें केवळ फुरंगटूनच बसलीं. त्यांचा मुख्य दावा हा कीं, आम्हांला न विचारतां यांनीं हा उद्योग कां केला? आणि वर तिऱ्हाईताच्या हस्तें आमचींच मुलें या गोष्टी आमच्या-कडे कां आणतात? माझ्या अंगांतील सर्व संभाषणकौशल्य खर्ची घालून मी त्यांची समजूत पाडली. "तुमचीं मुलें उमेट नाहींत, दुर्वृत्त नाहींत, तुमच्यासंबंधानें तीं अवहेलना बाळगीत नाहींत, फक्त घरांतल्या पूर्वींच्या पीठिकेला अनुसरून तुमच्या संबंधानें तीं मनांत भीति मात्र बाळगीत आहेत", हेंही मीं त्यांना स्पष्ट करून सांगितलें. "प्रौढ वयाचीं हीं मुलें जर आपण संमिश्र शिक्षणाच्या ठिकाणीं उघड्या डोळ्यांनीं धाडतों, तर त्यांच्या मनांत अशा प्रकारच्या भावना जागृत झाल्यास तुम्ही बिचक-ण्याचें कारण नाहीं. किंबहुना तुम्हीच ही संधि त्यांना अप्रत्यक्षपणें दिली आहे, आणि म्हणून ही तुमचीच जबाबदारी आहे" असेंही मला त्यांना सांगावें लागलें. आनंदाची गोष्ट ही कीं, या समजाविशीचा योग्य तो परिणाम झाला. कांहीं झालें तरी ते त्या मुलांचे आईबापच होते. माझ्या-पेक्षांही त्यांना या मुलांच्या बद्दलची प्रीति आणि काळजी जास्त वाटणा-रच. यथाकाल त्यांचीं मनें वळलीं आणि हे विवाह घडून येऊन हीं नवीं जोडपीं आपले संसार सध्यां मोठ्या सुखानें करीत आहेत.

या ठिकाणीं, मी काय केलें हें मला सांगावयाचें नाहीं, हें रसिक वाचक ओळखतीलच. मला काय करावें लागलें आणि तें कां करावें लागलें, एवढेंच मला सांगावयाचें होतें. नव्या काळाला अनुसरून म्हणजे आपलीं प्रौढ मुलें एकत्र येत आहेत या गोष्टीकडे लक्ष देऊन आईबापांनीं आपल्या मनाची बैठकच बदलणें आणि स्वतःच्यासंबंधीं त्यांच्या मनांत प्रेमळ विश्वासाची आणि सलगीच्या मैत्रीची भावना उत्पन्न करणें, हें अत्यंत अवश्य आहे. वर जें प्राथमिक स्तबक सांगितलें त्यांतील कुचंबणेचा परिहार कसा करावा, याचें दिग्दर्शन येथें केलें आहे.

# विद्यार्थी-विद्यार्थिनींचं आरोग्य ७

कॉलेजांतील विद्यार्थ्यांची शरीरप्रकृति कशी काय असते, असा प्रश्न सहज कुणालाही केला तर बहुधा असें उत्तर येईल कीं, अलीकडील विद्यार्थी शरीरप्रकृतीच्या दृष्टीनें अगदीं कमी दर्जाचे असतात. वास्तविक पाहतां पूर्वीच्या विद्यार्थ्यांची शारीरिक तपासणी कधीं होतच नसे. कॉलेजांतील विद्यार्थ्यांची अशी तपासणी करावी ही पद्धतीच मुळीं अगदीं अलीकडे रूढ झालेली आहे. यामुळें प्रत्यक्ष कागदावर नोंदलेल्या आखबंद माहितीवरून या प्रश्नाचें तौलनिक उत्तर कोणाला देतां येण्यासारखें नाहीं. सरासरी मानानें सर्वच आधुनिक गोष्टींसंबंधानें जी थोडीशी अवहेलना लोकांच्या मनांत वागत असते, तिला अनुसरून सध्यांच्या विद्यार्थ्यांच्या प्रकृतिमानासंबंधानें लोक कांहींसे उपेक्षेनें बोलत असावे असें वाटतें. एक गोष्ट ध्यानांत हवी कीं, कॉलेजांतील पूर्वीचे विद्यार्थी सध्यांच्या विद्यार्थ्यांपेक्षां वयानें निःसंशयच मोठे असत. स्वाभाविकपणेंच ते कांहींसे कणखरही दिसत. सध्यांचीं कॉलेजांतील मुलें अगदीं कोंवळ्या वयाचीं असतात; आणि वीस एकवीस वर्षांच्या आंत पदवीधर बनून कॉलेज सोडून जाणाऱ्यांची संख्यासुद्धां पुष्कळ मोठी असते. त्या मानानें या मुलांची शरीरयष्टि कांहींशी कोंवळीच असते. भरदारपणा, पीळ, आणि कणखरपणा हे गुण त्यांच्या यष्टींत अजून यावयाचे असतात. यामुळेंही कदाचित् सध्यांची मुलें प्रकृतीनें कमी दर्जाचीं असतात, असें कोणास वाटण्याचा संभव आहे. अलीकडे फिजिकल ट्रेनिंगची सक्ती सुरू झालेली आहे आणि ती पहिल्या दोन वर्षांतील विद्यार्थ्यांना लागू असते. वास्तविक पाहतां चारही वर्षांतील विद्यार्थ्यांना ही सक्ति लागू करावयास हवी. जर हा फरक पडला तर त्याचे अनुकूल परिणाम कॉलेजच्या एकूणएक विद्यार्थ्यांना खास दिसूं

लागतील. सध्यांचें मुलांचें प्रकृतिमान तुलनेनें कसें असतें हें जरी सांगतां आलें नाहीं तरी सापेक्षता बाजूला ठेवून असें म्हणतां येईल कीं, मुलें असावीं तितकीं बळकट असत नाहींत. मुलींच्या संबंधानें मी पुढें स्वतंत्रपणें लिहितों. पण मुलांविषयीं बोलावयाचें झालें तर असें खास म्हणतां येईल कीं, मुलें असावीं तितकीं सुदृढ खाचीतच नसतात.

दोनदोनशें मुलांचें वर्ग समोर बसलेले असतांना, यांत खरी तेजस्वी मुलें किती आहेत, या दृष्टीनें त्यांच्याकडे आपण पाहूं लागलों, तर खरोखर निराशाच वाटते. अंगांत असलेली शक्ति आणि रग हीं चेहऱ्यावर आणि हालचालींत प्रतिबिंबित झाल्याशिवाय कधींही रहात नाहींत. ही एक खूणच आहे. परंतु ही खूण फार थोड्या विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं दृग्गोचर होते. शरीरबलानें येणारा तेजस्वीपणा क्वचित् कोणाच्या तरी अंगीं दिसतो. बरें, हीं मुलें नीटनेटकेपणानें आणि पोशाखानें चांगलीं दिसतील म्हणावें, तर त्याचा विचार आपण मागें केलाच आहे. प्रत्येक कॉलेजांत एक एक तालीमखाना असतो. पण या तालीमखान्यांत जाणारीं मुलें शेंकडा पांचसुद्धां असतील असें वाटत नाहीं. मुलें व्यायाम करीत असतील; पण या व्यायामानें अन्नपचनाची सोय होत असेल इतकेंच. अंगीं धडधाकटपणा, रग, मस्ती हीं यावयास हवीं असलीं तर मुलांनीं तालीमखान्यांचाच आश्रय केला पाहिजे. केवळ उघड्या हवेवरचा व्यायाम करणारीं मुलें व तालमींत जाऊन जोर बैठका काढणारीं मुलें याची तुलना करून पाहिली, तर तालीम करणारीं मुलें निःसंशय अधिक दांडगीं दिसतात आणि मस्ती करण्याकडे त्याची प्रवृत्ति जास्त असते. ही तालमीची प्रथा अगदीं बुडाल्यामुळें वर सांगितलेली मुखावरची कांती विद्यार्थीवर्गांत फारशी आढळून येत नाहीं.

शहरांत अनेक तऱ्हांचीं दळें निघालेलीं असतात, आणि कोणी या दळांत, तर कोणी त्या दळांत, अशी बऱ्याच मुलांची वाटणी झालेली असते. या दळांचा एक अतिशय उत्तम उपयोग झालेला दिसतो. तो

म्हणजे त्या विद्यार्थ्यांनीं मनांत आणलें तर त्यांना शिस्तीनें वागतां येतें; आणि अनेक कामें सहकार्यानें करतां येतात. पण आपला प्रस्तुतचा विषय लक्षांत घेतां या दलांना एवढें श्रेय देतां येतें कीं, त्यांच्यामुळें मुलांना उघड्या हवेवरचा व्यायाम बराच घडतो. तथापि या व्यायामानें किंवा थोड्याबहुत माहीत झालेल्या संचलनानें मुलांच्या अंगीं रग उत्पन्न होणें कठीण आहे. एकेक दळ समूहरूपानें उभें असेल तर मुलांच्या ठिकाणीं रग दिसेल. पण प्रत्येक मुलाच्या ठिकाणीं ती येण्याला निरनिराळ्या दळांतून मिळणारा व्यायाम आणि कवायत हीं पुरेशीं नाहींत. त्याला तालमीच्या आखाड्यांतच उतरावयास हवें. तालमींत शिरून पीळदार बनलेला मुलगा हा स्वतःच्या बळावर जास्त विश्वास टाकतो; आणि जर असे अनेक मुलगे एकत्र झाले, तर शत्रूला भय उत्पन्न करील असाच मेळ तयार होतो. उघड्या हवेवरचा व्यायाम आणि कवायत यांनीं चलाखपणा आणि निरोगी-पणा हीं प्राप्त होतात. पण तालीमबाजाचा कणखरपणा या मुलांच्या अंगीं येत नाहीं. आणि सगळ्यांत मोजेची गोष्ट ही कीं, हें सांगितलें तरी त्यांना पटत नाहीं.

पुणें शहराचेंच उदाहरण घ्या. पूर्वीं पेठांपेठांतून तालमीचे किती तरी आखाडे असत आणि प्रत्येक आखाड्यांत शेंपाऊणशें मुलें मेहनतीला सहज जमत असत. मेहनत आटपून ही मंडळी एकदां बाहेर पडली म्हणजे आजू-बाजूंनीं जाणाऱ्या माणसांच्या पोटांत थोडें भयच उत्पन्न होई. हे तरुण लोक म्हणजे त्या त्या आळीचें खरें खरें भांडवल होतें. यांच्याकडे बघून आळीकरांना एक तऱ्हेचा निर्धास्तपणा वाटत असे. अवश्य तेवढें मनोबळ जर असलें तर शरीरबलासारखा दुसरा चांगला मित्र नसतो. परंतु आपली ती तालमीची पद्धति गेल्या वीसपंचवीस वर्षांत अजिबात बुडाली आणि सुधारक बनून, ‘ ह्यांत काय आहे आणि त्यांत काय आहे ’ असें आपण करूं लागल्यामुळें घरांतली नमस्काराची पद्धतीहि बुडाली. तालीमखाने

सोडून मुलें क्रिकेटच्या किंवा हुतुतूच्या मैदानावर आलीं, यांत कांहीं चुकलें असें मला मुळींच म्हणावयाचें नाहीं. अंधाऱ्या तालमींत तासतास घुमत बसणारे लोक बथ्थड आणि अवजड होतात; आणि वर्गात बसून वेळीं-अवेळीं पेंगत रहातात हें मी हजारदां पाहिलें आहे. यांना मोकळ्या हवे-वरचे व्यायाम अवश्यच हवेत; तरच ते चलाख रहातात. पण आपली चूक झाली आहे ती ही कीं, चलाखी आणणारे व्यायाम आपण जवळ केले आणि बलिष्ठपणा प्राप्त करून देणारा व्यायाम अजिबात सोडला ! दोहींचा संयोग जर करतां आला तर फार बरें होईल. शरीरानें बलिष्ठ दिसणारीं मुलें आपल्या घरांत आहेत, असें जर वडीलधाऱ्या माणसांना दिसत असलें तर त्यांना एक तऱ्हेचा विश्वास उत्पन्न होतो. विशेषतः स्त्रिया आणि मुलें हीं घरांतील बलदंड पुरुषाकडे बघून मनानें नेहमीं निर्भय असतात. ज्या घरांत असे पुरुष आहेत त्या घरांतल्या स्त्रियांची मान-खंडना करावयास कोणी धजणार नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शक्तीचें वसतिस्थान असलेली पुरुषाची छाती आणि त्याचे पीळदार बाहू हे प्रपंचांतील लोकांना मिळालेलें एक आश्वासनपत्रच होय. या दृष्टीनें पहातां कॉलेजांतील सध्यांचे विद्यार्थी जीविताच्या कसोटीस उतरणार नाहींत असा धाक वाटतो.

अलीकडे पतिपत्नींनीं फिरावयास जाण्याची चाल पडली आहे ती खरोखर स्पृहणीयच आहे. ही चाल तरुण लोकांनीं अवश्य कायम ठेवावी. स्त्रियांच्या बाबतींतील पुरुषांच्या जबाबदारीची जाणीव या पद्धतीनें तरुण लोकांच्या मनांत अधिकाधिक उत्पन्न होत जाईल; आणि परस्परांच्या मनाचा मिलाफ होण्याला व्यायामानें प्राप्त होणाऱ्या उल्हासाची आणि खेळकरपणाची मदतच होईल. फिरावयास जाण्याच्या चालीसंबंधानें मला आणखी कांहीं लिहावयाचें आहे. तें प्रेमविवाहाविषयीं लिहितांना मी लिहीन. पण प्रस्तुत व्यायाम आणि शरीरप्रकृति यांचा विचार करतांना या

नऱ्या पडलेल्या प्रघातासंबंधानें एवढें सांगावयास हवें कीं मनोमिलाफाच्या दृष्टीनें ही चाल अतिशय सुयुक्त असली तरी, तरुण लोकांनीं या कामांतील आपली जबाबदारी मात्र नीट ओळखली पाहिजे. फिरावयास जाणारीं जोडपीं हा आपल्या जीविताचा अलंकारच होय. पण या जोडप्यांतील पुरुष अंगानें किरकोळ किंवा किडकिडीत असले तर मात्र सामाजिक दृष्टया त्यांना नवी इशारत देण्याची वेळ आली आहे असें वाटूं लागतें. परस्परांचें सुखकर सान्निध्य, घरगुती विषयांचीं कूजितें, हवेचा मादकपणा, आणि रुधिराभिसरणानें त्वचेवर आलेला तांबूसपणा या साऱ्या गोष्टी हृद्य आहेत यांत कांहींच शंका नाहीं. पण या तरुण पुरुषांच्या ठिकाणीं जें शरीरसामर्थ्य असावयास हवें तें जर कमी आहे असें दिसलें, तर सामाजिक दृष्टीनें विचार करणाऱ्यांच्या मनांत थोडासा धाकच उत्पन्न होतो. जीविताचा फुलोरा मनोरम आणि सुगंधित असतो; पण जीविताचें आसन बळकट असलें तरच या फुलोऱ्याला किंमत आहे. म्हणून कॉलेजचें शिक्षण चालूं असतां, कीं ज्यांतून बाहेर पडल्याबरोबर किंवा जें चालूं असतांनाच वरील साहचर्यसुखाचा लाभ पुष्कळ तरुण लोक घेतात, त्यांनीं ध्यानांत ठेवावयास हवें कीं, आपली या कामांतील जबाबदारी फार मोठी आहे. कालमानांत पडत चाललेला फरक विद्यार्थ्यांनीं अवश्य ध्यानांत ठेवावयास हवा. जीविताला प्राप्त झालेला बिनघोरपणा साफ नष्ट होत चालला आहे. अशा वेळीं शरीरप्रकृति केवळ निकोप ठेवील एवढ्याच व्यायामानें किंवा खेळ–कवायतीनें आतां भागण्यासारखें नाहीं. मस्ती आणि काटकपणा हीं अंगांत असलीं तरच जीविताच्या धकाधकींत निभाव लागेल. नाहीं तर पुढें फजिती वाढून ठेवलेली आहे.

•

एका उत्तेजक गोष्टीचा उल्लेख या ठिकाणीं करणें अवश्य आहे. सिंधपासून कर्नाटकपर्यंत निरनिराळ्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांची शारीर परीक्षा करणाऱ्या डॉक्टरांनीं जीं प्रतिवृत्तें योग्य त्या अधिकाऱ्यांकडे वेळो-

वेळीं घाडलीं आहेत, तीं वाचलेले लोक असें सांगतात कीं, महाराष्ट्रांतील विद्यार्थ्यांच्या संबंधानें या परीक्षकांनीं फार चांगले अभिप्राय व्यक्त केलेले आहेत. इतर ठिकाणच्या कॉलेजकर मुलांच्यापेक्षां महाराष्ट्रांतील मुलें शरीरानें किरकोळ दिसतात हें खरें; परंतु, वाईट प्रकारच्या रोगांपासून हीं मुलें सर्वथा आलिप्त असतात, असें या डॉक्टरांचें मत आहे. मुलें शरीरानें किरकोळ कां असतात, याची मीमांसा मीं आतांपर्यंत केलीच आहे. आणि तीं अशा रोगांपासून मुक्त असतात हें डॉक्टरांचें शिफारसपत्र त्यांना कां मिळूं शकतें, याचें कारण तर अगदीं स्पष्ट आहे. ज्या समाजकोशांत हीं मुलें जन्मलीं आणि वाढलीं त्यांत वर्तणुकीला विशेष प्रकारची आदब आहे; दुर्गुणाबद्दलचा तिटकारा आहे, आणि पापाचा धाक आहे. प्रमादांतून कोणचाही समाज सर्वथा मुक्त नसतो; पण समाजासमाजांत फरक असतो व तो प्रमाणरूपानें व्यक्त होतो. आणि म्हणून आपल्या इकडील विद्यार्थ्यांत अशा रोगांचे प्रमाण अत्यल्प असेल तर ती गोष्ट त्या समाजकोशाला आणि त्या विद्यार्थ्यांना खचित भूषणावह आहे.

विद्यार्थी–वर्गात सिगारेट ओढण्याचें व्यसन सध्यां फैलावत आहे असें अनेकांना वाटतें. पण परवां एक प्रोफेसर मला सांगत होते कीं गेल्या दोनतीन वर्षांपर्यंत वाटत असलेला हा धाक आतां निश्चयानें कमी होऊं लागला आहे. पण मला या विषयासंबंधानें विशेष माहितगारीनें बोलतां येईल असें वाटत नाहीं. दुसऱ्या एका गोष्टीचाही उल्लेख येथेंच करावयास हवा. यु. टी. सी. निघाल्यापासून प्रतिवर्षीं कॉलेजांतील विद्यार्थ्यांची मोठमोठीं शिबिरें पडत असतात, हें आपल्याला माहीत आहे. अशा शिबिरांत विद्यार्थ्यांना काय किंवा कोणाला काय, तेथें अन्नखाने किंवा पेयखाने चालविणाऱ्या कंत्राटदारांना शराब पुरविण्याची सक्त मनाई असते. परंतु दुर्दैव असें कीं मागें जेव्हां कॉंग्रेस सरकार एकदां अधिकारा-

वर आलें होतें तेव्हां डॉ. गिल्डर यांच्याकडे मला या विषयाच्या संबंधानें तक्रार करावी लागली होती. कांहीं चांगले शहाणेसुरते प्राध्यापक लोकसुद्धां या कामांत गलथानपणा करतात, आणि त्यांचें पाहूनतरुण मुलें याच अनाचाराला प्रवृत्त होतात. लष्करी शिक्षण घेऊन तलवार मारण्याचा योग केव्हां येईल तेव्हां येवो, पण हें निशा करण्याचें व्यसन मात्र अनेक विद्यार्थ्यांना लागून जातें, याकडे पालकांनीं सक्त लक्ष ठेवलें पाहिजे. अनेक श्रीमंत हॉटेलवाले लोक अशाच प्रकारच्या पेयांची व्यवस्था आपल्या हॉटेलच्या जागेंत कोठें तरी गुप्तपणानें करीत असतात आणि तरुण विद्यार्थी या गुप्त संस्थेंत पुष्कळदां दाखल होतात असा बोभाटा मीं कितीदां तरी ऐकलेला आहे. परन्तु अशा विद्यार्थ्यांचें प्रमाणही लोकांना वाटतें तितकें अजून तरी वाढलेलें नाहीं.

विद्यार्थिनींच्या आरोग्याविषयीं आतां लिहावयास हवें. सरसकट विद्यार्थिनी अमुक एक व्यायाम रोज निश्चयानें करतात असें बिलकूल म्हणतां यावयाचें नाहीं. शाळेंत जाणाऱ्या मुली जितका व्यायाम करतात, तितकासुद्धां कॉलेजांत जाणाऱ्या मुली करीत नाहींत. कॉलेजांत आल्यावर आपण वयानें थोड्या 'मोठ्या' झालों आहोंत असें त्यांना आपोआपच वाटूं लागतें, आणि त्या 'मोठ्या' झालेल्या असतात हें खरेंही आहे. या त्यांच्या वयाला व शरीराच्या ठेवणीला अनुसरून त्यांनीं कोणचे व्यायाम करावे याची शास्त्रशुद्ध चिकित्सा आणि मांडणी कोणी आस्थेवाईक लोकांनीं खरोखरच करावयास हवी. झिम्मा, कोंबडा, फुगडी, पिंगा, सुपारी इ. खेळांचा पुनरुद्धार आतां होणें शक्य नाहीं. कांहीं तरी निराळे खेळ विद्यार्थिनींच्या करतां काढलेच पाहिजेत आणि निरनिराळ्या वयाच्या विद्यार्थिनींना कोणचे निरनिराळे खेळ मानवतात हें चौकशीनें ठरविलें पाहिजे. कांहीं मुली बॅडमिंटन, टेनिस, टेबलटेनिस असे खेळ खेळतात. पण एकंदरीनें पाहतां फिरावयास जाण्याचा तडाखा फार. पण हें फिरणें म्हणजेसुद्धां एक कोमळ

मिरवणूकच असते. पायाला व्यायाम होण्याच्या ऐवजीं या मिरवणुकींत जिभेलाच जोराचा व्यायाम घडत असतो आणि त्यामुळें पावलांची गति अधिकच मंद होत जाते. असल्या फिरण्याला कोणीहि व्यायाम म्हणणार नाहीं. पालक आणि संस्थांचे अधिकारी यांनीं या बाबीकडे अधिक लक्ष द्यावयास हवें. मुलींना अभ्यासाचा बोजा मुलांच्या इतकाच पडतो. परंतु मुलांच्या मानानें मुली व्यायाम मात्र थोडासुद्धां करीत नाहींत हें सर्वांनाच मान्य करावें लागेल. सशक्तपणामुळें शरीराला रसरशीतपणा येणें आणि वयानुरूप प्राप्त झालेली अंगकांति या रसरशीतपणामुळें अधिक झळकूं लागणें, हा प्रकार फारच थोड्या विद्यार्थिनींत दिसून येतो. कोमलपणा, नाजुकपणा, आणि रसरशीतपणा यांच्यांत थोडा थोडा फरक आहे हें मुलींच्याही ध्यानांत यावयास हवें. पण एकीकडे पुरुषाशीं स्पर्धा करूं इच्छिणाऱ्या आपल्या या हौशी मुली अजून नाजुकपणा आणि कोमलता ही सौंदर्याची खरी सीमा आहे असें समजतात. हे दोनही गुण त्यांनीं अवश्य संभाळावे; पण त्यांच्या जोडीला रसरशीतपणा आणण्याची तरतूद त्यांनीं अवश्य करावी. ही तरतूद म्हणजे पी. टी.हून जास्त व्यायाम करणें ही होय. त्यांच्या प्रकृतीला कोणचे व्यायाम मानवतील हें मला सांगतां येण्यासारखें नाहीं. पण अशा व्यायामांची आवश्यकता मात्र फार आहे.

दुसऱ्या एका नाजुक बाबीसंबंधानें येथें थोडेंसें लिहिलें पाहिजे. शिवावयाचें नसणें, बाहेरचें बसणें इ. शब्दसंहती हळूहळू लुप्त होत चाललेल्या आहेत. अजून घरच्या राहणींत या शब्दसंहतींचा अंमल बहुधा सर्वत्र चालू असतो. परंतु बाहेरच्या जीवितांत यांना कसलाही अर्थ उरलेला नाहीं. सध्यां मी विद्यार्थिनींच्या आरोग्याविषयींचें लिहीत आहें म्हणून या विषयांच्या इतर बाजूंविषयीं येथें लिहीत नाहीं. आरोग्यासंबंधानें लिहितांना मात्र हा विषय विचारांतून सोडतां येत नाहीं. या तीनचार दिवसांच्या काळांत बहुतेक सर्व तरुण स्त्रियांना विश्रांतीची आवश्यकता असतेच

असते. पूर्वी शिवावयाचेंच नसल्यामुळें ही विश्रांती स्त्रियांना आपोआपच मिळे. पण आपण सध्यां सुधारक झालों असल्यामुळें एक सुधारणा करतां करतां आपल्याला आवश्यक गोष्टींचाही विसर पडत चालला आहे. नवीन मुलींना तर या काळांत विश्रांति मिळणें फारच अवश्य आहे असें वाटतें. मला थोडें सूक्ष्मपणानें लिहावें लागत आहे खरें. पण विषयाच्या पूर्तीसाठीं तें लिहिलें पाहिजे. थोडीही निरीक्षणशक्ति ज्याच्या अंगीं आहे, त्या प्राध्यापकाच्या हें ध्यानांत येत असेल कीं एरवीं चांगल्या रसरशीत दिसत असलेल्या मुली कांहीं दिवस थकलेल्या, ओढलेल्या आणि दुर्लक्षाकडे झुकलेल्या दिसून येतात. खरें म्हटलें म्हणजे त्यांना विश्रांतीची जरूरी असते. पण आपण अजून या गोष्टीचा विचार करावा तितका संथपणानें केलेला नाहीं. वर्गांत उपस्थित असणें हें अवश्यच असते. एक वर्गाची शिस्त म्हणून, आणि दुसरें अभ्यास बुडेल म्हणून. पण कितीतरी मुलींना या काळांत वेदना सोसाव्या लागतात आणि जेव्हां त्या अगदींच दुःसह होतील तेव्हां त्या अनुपस्थित राहतात. पण हीही शरीराची हयगयच होय. मुलींच्या शरीराला लवकर प्राप्त होणारा प्रौढपणा आणि त्यांच्यावर पडणारा हा अभ्यासाचा बोजा यांचा थोडातरी सूक्ष्मपणें अन्वय बसावयास हवा. असो. मीं जरी थोडें लिहिलें आहे तरी तें पुष्कळपणें समजावून घेणें जबाबदार वाचकांना खचितच शक्य होईल.

आणखी एका चमत्कारिक पद्धतीचा उल्लेख याच प्रकरणीं करावयास हवा. पण ही बाब थोडीबहुत मौजेची आणि रसिकपणाची आहे. मुलींच्या वेषांत पडत चाललेला फरक हा सर्वांच्याच परिचयाचा आहे. मंडईत भाजी विकावयास बसणाऱ्या स्त्रिया कोंपराच्या पुढेंपर्यंत चोळी घालतात आणि या प्रघाताचें कारण एका माळिणबाईनेंच मला सांगितलें होतें. ज्या स्त्रिया घरांतल्या घरांतच वागतात, पण ज्यांना अनेक प्रकारचीं कामें करावीं लागतात त्यांना अर्थातच चोळीच्या बाह्या, ऱ्हस्व ठेवाव्या

लागतात. परंतु, होतांहोतां काम नसलें तरी बाह्यांची लांबी तेवढीच राहून गेली. पुढें नवा काळ आला. युरोपियन लोकांच्या चालीरीती विशेष मोहक वाटूं लागल्या आणि ही अस्तान्यांची लांबी अगदींच घटत चालली. मी सध्यां आरोग्यासंबंधानें बोलत आहें म्हणून सौंदर्यसाधनाचा इलाज या नात्यानें पोषाखाच्या या पद्धतीविषयीं सध्यां मला बोलतां यावयाचें नाहीं. आरोग्य संभाळण्याच्या कामीं मात्र या पद्धतींतील वेडेपणा स्पष्टपणें निदर्शनास आणला पाहिजे. थंडीचा कडाका पडलेला असतो आणि वर्गांत बघावें तों मुलींच्या पोलक्याच्या बाह्या अगदींच ऱ्हस्व झालेल्या दिसतात. अर्थात् मुली कुडकुडत असतात. त्यांनीं एकदम धैर्य धरून तेवढ्या थंडीच्या दिवसांपुरती तरी ही फॅशन पार फेकून द्यावी आणि मनगटापर्यंत अस्तन्या असलेली अंगडीं घालून वर्गांत बसावें. पण आपल्याला रूढीचा इतका धाक असतो कीं, एकीकडे पूर्वजांना रूढिप्रिय म्हणून मूर्ख ठरवीत असतांना दुसरीकडे तसलीच एखादी मूर्ख रूढी संभाळण्याचा आटोकाट प्रयत्न आपण करीत असतों. मुलींना कुडकुडतांना पाहून मी वर्गांत एकदां उपरोधानें म्हणालों, 'स्त्रीशिक्षणाचे परिणाम स्त्रियांवर फारच चांगले होऊं लागले आहेत.' मुली अर्थातच माझ्याकडे विशेष लक्ष देऊन पाहूं लागल्या. मी पुढें म्हणालों, 'शिक्षणामुळें स्त्रियांची प्रकृति अतिशय सुधारते असें दिसतें.' या ठिकाणीं मुलींना थोडी शंका आली. 'हेंच पहा कीं इतकी थंडी पडली असतांनासुद्धां अंगभर पोलकें घालण्याची आवश्यकतासुद्धां मुलींना वाटेनाशी झाली आहे!' अर्थात् या उपरोधानें मुली थोड्या लाजल्या हें खरें. पण रूढीचा चाप त्यांच्यावर अजूनहि कायमच आहे. असो. शेवटीं एका गंभीर प्रश्नाचा उल्लेख करून हा विषय संपवितों.

मागल्या एका लेखांत मी म्हटलें होतें कीं वय वाढत जाईल तसतशा कॉलेजांतील मुली निस्तेज आणि वठल्यासारख्या दिसूं लागतात.

वयाचीं कांहीं एक वर्षे अशीं असावीं असें वाटतें कीं, जेव्हां मुलींचें सौंदर्य विशेष प्रकारें झळकून दिसतें. तेवढीं तीं वर्षे ओलांडलीं आणि जीवितांच्या ज्या स्तबकांत त्यांनीं प्रवेश करावयास हवा त्यांत त्या शिरल्या नाहींत, तर त्यांची अंगकांति आणि मुखश्री हीं कांहींशी सुकल्यासारखी होते. पण ही हानी शाश्वतची असते असें मात्र नाहीं. तथापि या हानीचा उल्लेख एवढ्यासाठींच केला कीं या मुलींचीं लग्नें ठरवितांना ज्यांचें या गोष्टीकडे बारकाईनें लक्ष जात नाहीं, ते लोक मुली कायमच्याच निस्तेज आणि बठलेल्या आहेत असें चुकीनें समजूं लागतात !

# मुलांमुलींचे प्रीतिविवाह व पालकांची कर्तव्यें ८

जे लोक आपल्या मुलामुलींना महाविद्यालयांत धाडतात त्यांनीं हें बिनतक्रार मान्य करावयास हवें कीं सुधारकांनीं प्रतिपादन केलें म्हणूनच नव्हे, तर आपण आपलीं प्रौढ मुलें आणि मुली शिक्षणासाठीं एकाच स्थळीं ठेवतों यामुळेंही, प्रीतिविवाह ही संस्था पांढरपेशा समाजांत हळूहळू वाढत चाललेली आहे. शेंकडो पालक असे आहेत कीं, आपल्या मुलामुलींना महाविद्यालयीन शिक्षण प्राप्त व्हावें, पण त्यांतून उत्पन्न होणारी ही जी अभिनव संस्था ती मात्र उत्पन्न होऊं नये आणि झाली तरी तिचा स्पर्श आपल्या मुलामुलींना होऊं नये, असें त्यांना वाटतें. पण या पालकांचें हें वाटणें, वस्तुस्थितीकडे लक्ष देतां चुकीचें आहे आणि एखाद्या वेळीं तें त्यांना दगा दिल्याशिवाय रहाणार नाहीं असें वाटतें. कॉलेजांतील ओळखीमुळें प्रीतिविवाह झाल्याची उदाहरणें थोडीं आहेत हें खरें; पण त्यांची संख्या वाढत चालली आहे हें मात्र नाकारतां यावयाचें नाहीं. ज्यांच्या मुलामुलींनीं असा आपला विवाह जुळवून आणला, ते अशाच भ्रमांत होते कीं, सगळें कांहीं आपल्याला हवें आहे तसेंच होत राहिलें आहे; आपलीं मुलें असें करणार नाहींत; व तीं आपल्या आज्ञेच्या आणि इच्छेच्या बाहेर जाणार नाहींत. पण एखाद्या दिवशीं पुण्यांतील त्यांच्या स्नेह्याची तार अकल्पितपणें आली असेल किंवा कोणाचें पत्र आलें असेल, आणि येथें असा असा प्रकार आहे याकडे तुमचें लक्ष आहे ना, अशी वर्दी त्यांना मिळाली असेल ! मग त्यांची झोंपमोड होऊन आपण कोणच्या भ्रमांत होतों हें त्यांच्या ध्यानांत चरचरून भरलें असेल. कांहीं कांहीं वेळां तर असेंही झालेलें असणें अगदीं शक्य आहे कीं, आम्ही असें असें ठरविलेलें

आहे आणि म्हणून तुम्ही आतां पुढल्या उद्योगाला लागा, असें कांहीं पालकांच्या अपत्यांनींच त्यांना कळविलें असेल. केव्हां केव्हां या पालकांनीं स्वतंत्रपणें आपल्या मुलांचीं लग्नें ठरविलीं असतील आणि आयत्या वेळीं अपत्यांनीं स्वच्छ कळविलें असेल कीं, आम्हांला मुळीं लग्नच करावयाचें नाहीं; आणि शेवटीं थोडी कुरबूर झाल्यानंतर त्यांना कळून चुकलें असेल कीं, यांनीं आधींच कोठें तरी ठरविलेलें आहे. क्वचित्प्रसंगीं तर शिका‧वयास म्हणून राहिलेलीं आपलीं मुलें अचानक कोठें तरी निघून गेलीं आहेत असें संस्थेच्या चालकांकडून त्यांना तांतडीनें कळविण्यांत आलें असेल आणि मग जें कानांनीं ऐकावयासमुद्धां त्यांना नकोसें वाटतें तें त्यांना पत्करावें लागलें असेल. या प्रत्येक पर्यायाचीं उदाहरणें पुष्कळ झालीं आहेत असें नव्हे; पण तीं झालीं आहेत आणि त्यांची संख्या वाढत आहे हें मात्र निःसंशय खरें आहे. आणि याचें कारण तरी इतकेंच आहे कीं प्रौढ वयाचीं मुलें आणि मुली शिक्षणासाठीं आपण एकमेकांच्या संगतींत आणून ठेवतों. सहशिक्षण हवें पण त्याचे हे परिणाम मात्र नकोत, ही अपेक्षा अगदीं अनाठायीं आहे. ज्यांना हे परिणाम नको असतील त्यांनीं या सहशिक्षणाचा लाभ आपल्या मुलामुलींना घेऊं देतां कामा नये. सध्यां शेंकडों पालकांच्या मनाची स्थिति अतिशय दुग्धाची आहे आणि तो दुग्धा ह्याच मुद्यावर उपस्थित झालेला आहे.

कांहीं नवें करावयास आपण निघालों तर दूरदर्शीपणानें आपण त्याचे परिणामही ओळखले पाहिजेत आणि ते पत्करावयास आपल्या मनाला बळकटी आणली पाहिजे. जर शिक्षणाचा लाभ व्हावयास हवाच तर मुलामुलींच्या या मानसिक चलनवलनाकडे थोडासा कानाडोळा करणें हें अवश्य आहे. आम्हांला विचारल्याशिवाय या पोरांनीं असें कां करावें असें म्हणणारे किती तरी पालक असतात. त्यांच्या या हटवादासंबंधानें मीं इतरत्र सविस्तर विवेचन केलेलें आहे. त्या विवेचनाचा सारांश हा

कीं, पालकांनीं आपल्या प्रौढ मुलामुलींच्या मनांत आपल्यासंबंधानें वागत असलेली भीतीची कल्पना समूळ नष्ट करावी; आईबाप म्हणजे आपल्याला कोणी रागें भरणारे लोक आहेत असें मुळींच नाहीं, तर आपल्या आवडीनिवडीकडे ममत्वानें, मायाळू मनानें, आणि क्षमेनेंसुद्धां पहाणारीं माणसें आहेत, असा विश्वास मुलांच्या मनांत उत्पन्न करावा. आतां पुष्कळदां असेंही होतें कीं, प्रीतिविवाहाला जरी आईबापांची संमती असली तरी त्या विवाहांतील जीं आणखी कांहीं पोटकलमें असतात, त्यांच्याकडे मात्र त्यांना काणाडोळा करतां येत नाहीं. मुलें वयानें मोठीं झालीं आहेत, शिकून शहाणीं झालीं आहेत, तर त्यांच्या आवडीनिवडीला आणि प्रीतिभावनेला मान द्यावा, येथपर्यंत वडील माणसें आलेलीं असतात. परंतु या प्रीतिविवाहाच्या बाबतींत जर आपल्याला प्रिय असलेल्या आणि अवश्य वाटणाऱ्या आणखी कांहीं समजुतींना दंश होत असला तर मात्र तो त्यांना बिलकूल खपत नाहीं. किंवा निदान कांहीं अप्रिय शब्द पुटपुटूनच ते हा दंश गिळून टाकतात. मुलानें किंवा मुलीनें पसंती करावी याला त्यांचा विरोध नसतो. पण ती पसंती जर कसली तरी असली तर त्यांना मोठें वाईट वाटतें; आणि, आपण यांना शिकलेले व म्हणून शहाणे समजत होतों, पण यांना पसंतीची अक्कल बेताचीच आहे, असें ते आपल्या ठिकाणीं पुटपुटतात; आणि शेवटीं "त्यांचें त्यांना पसंत आहे, आतां आपल्याला बोलून काय करावयाचें आहे, आपण नसता वाईटपणा कशाला घ्या !" असें घरांतून सांगणें झाल्यावर बाप आपला हट्ट सोडून देतो. वास्तविक पहातां अशा ठिकाणीं या गृहस्थाचा आक्षेप बरोबर असतो. त्याची अपेक्षा अशी असते कीं, आपलें अपत्य जर अमुकएक दर्जाचें व संस्कृतीचें आहे, त्याचें रूप जर असें आहे, वर्ण जर इतका चांगला आहे तर त्याला साजेशीच निवड त्यानें करावी. परंतु पुष्कळदां असें घडतें कीं सहवासामुळें स्त्रीपुरुषभावाचा उत्कटपणा मुलांच्या ठिकाणीं एकदमच पुष्कळ वाढतो, आणि मग बाकीच्या गोष्टी-

कडे त्यांचें लक्ष जात नाहीं. यांत तिऱ्हाईतानें बोलण्याचें काय कारण आहे असें कोणी म्हणेल; परंतु हें म्हणणें बऱ्यावाईटाची चर्चा करतांना टिका-वयाचें नाहीं. चांगल्याचा संयोग चांगल्याशीं व्हावा आणि ‘ समसमां संयोग कीं जाहला ’ असें ठरावें, ही अपेक्षा सर्वांच्याच मनांत वागते. अगदीं तिऱ्हाईत लोकसुद्धां अशा प्रकारच्या विषम मीलनाला नाकें मुरडतात, मग आईबाप अगदीं खट्टू होऊन जातील यांत नवल तें काय ?

सांपत्तिक दृष्टि हीही पुष्कळदां आड येते. संपत्ति मिळविण्याचे कष्ट ज्यांना माहीत असतात, त्यांना गरीब माणसेंसुद्धां संपत्ति मिळवूं शकतात हें पटलेलें असतें; आणि म्हणून मुलीनें पसन्त केलेला मुलगा गरीब असला, पण तो जर तरतरीत आणि हुशार असला तर बाप या पसन्तीला हरकत घेत नाहीं. कारण गुणांच्या सामर्थ्यावर हा गरीबींतून बाहेर पडेल, हें त्याला सहज पटतें. पण ज्यांना संपत्ति मिळविण्याचे कष्टच पडले नाहींत, जे गर्भश्रीमंत आहेत आणि नाक, डोळे, हात, पाय हे जसे सहज आहेत तशी श्रीमंतीही सहजच आहे असें ज्यांना वाटतें, त्यांना मुलीनें पसंत केलेला चुणचुणीत, हुशार पण गरीब मुलगा बिलकूल आवडत नाहीं. या ठिकाणीं माझ्या मतानें पालकांच्याकडेच दोष येतो. पैसा मिळविण्याची शक्तिगर्भता मुलाच्या ठिकाणीं आहे एवढें दिसलें म्हणजे त्यांनीं संतुष्ट असावें. परन्तु, त्यांच्या बाजूनें एवढेंच बोलतां येण्यासारखें असतें कीं, श्रीमंतीमुळें प्राप्त झालेला जो सामाजिक दर्जा असतो, नातेवाईकांची जी अमुक एक उंची ठरलेली असते, तिच्या खालीं जाणें त्यांना अतिशय विषादकारक वाटतें. कारण आपल्या मुलीला, आपण कितीहि तत्त्वाच्या गोष्टी बोललों तरी, इतर लोक कमी लेखूं लागतील या जाणिवेनें त्यांना दुःख होतें. तथापि याबाबतींत, पुढें प्राप्त होत असलेला काळ लक्षांत घेतां फारसें रहस्य उरणार नाहीं असें वाटतें. कसलेंहि वैषम्य असलें तरी प्रीतीचा महिमा गाऊन कवि, नाटकवाले आणि चित्रपट विण-

णारे हे अशा ठिकाणीं आईबापांना मूर्ख ठरवितील, यांत कांहींच शंका नाहीं. पण आपण सध्यां पृथक्करण, परीक्षण, आणि सारासार विवेक यांना प्रवृत्त झालों असल्यामुळें वाङ्मयाचें कौतुक उत्पन्न करणाऱ्या लोकांकडे लक्ष देण्याचें आपल्याला कांहींच कारण नाहीं.

पालकांच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचे मुद्दे म्हणजे धर्म आणि जात हे होत. प्रीति करून बसलेलीं माणसें फक्त एकच विचार जागतात हें सर्वांना माहीत आहे. आपलें जीवित केवळ एका प्रीतीवर चाललेलें आहे असें मात्र नव्हे हें त्यांचें त्यांनासुद्धां एरवींच्या वेळीं पटण्यासारखें असतें. पण वर एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें एकत्र सहवासामुळें त्यांच्यांतील स्त्रीपुरुषभावनेला अचानक उत्कटता प्राप्त होते, व तीं मनानें बद्ध होऊन बसतात. हा धर्माचा प्रश्न प्रीतीच्या बाबतींत आड येऊं देतां उपयोगाचा नाहीं, असें पुष्कळ दर्शनी सुधारक आपल्याला सांगतात; आणि धर्म-विचाराची किंमत कितपत धरावी यावर एखादें प्रवचनही झोडतात. त्यांच्या या बोलण्यांत विशेष कांहीं अलौकिक असतें असें मुळींच नाहीं. त्यांना फक्त प्रीतीची कड घ्यावयाची असते इतकेंच काय तें ! स्वतः ते त्या धर्माच्या आणि त्या त्या समाजाच्या पोटांतच वागतात; आणि त्यापासून पाझरणारीं सर्व सुखें तें अहर्निश भोगतात. परंतु, त्यांना प्रसंगविशेषीं एका हीन औदार्याची निशा चढते. ज्यांनीं कोणी अत्यंन्त विसदृश विषमधर्मीय विवाहाचे प्रयोग करून पाहिले आहेत, त्यांनीं जर आपल्यापुढील जीवितविषयीं खरें खरें बोलावयाचें ठरविलें तर या उदार बुद्धीच्या लोकांना कांहीं भलतेंच ऐकावें लागेल; आणि आपल्या औदार्याचें उड्डाण कोठेंतरी झालें होतें असें वाटूं लागेल. विद्याभिलाष, मोकळी राहणी, हरतऱ्हेचें स्वातंत्र्य, मित्रपरिवाराची ये जा, आहारविहारांतील शुचित्व इत्यादींतून एखादी मुलगी उठली आणि अत्यंत विसदृश्य अशा परि-स्थितींत जाऊन पडली आणि शेवटीं कदाचित् बुरख्यांतही लपली तर

तिच्या हातून स्वतःच्याच विरुद्ध मोठा गुन्हा घडला असें म्हणावयास लोकांनीं भीति बाळगतां कामा नये. परंतु आपण लटकें औदार्य पत्करतों आणि झालेल्या गोष्टींचे परिणाम त्या मुलीलामुध्दां किती बाधक आहेत हें कळलेलें असतांना, आपण तिच्या लटक्या धैर्याची तारीफ करतों किंवा निदान गप्प तरी बसतों. हें सामाजिक भित्रेपणाचें लक्षण आहे. जे लोक स्तुति करण्याला प्रवृत्त होतात त्यांच्याच घरांत जर का असा प्रसंग घडला तर त्यांच्यांतले नव्याण्णव टक्के लोक दुःखानें व्याकुळ होतील. परंतु परोपदेशाच्या वेळीं मात्र पांडित्य करावयास ते कधींही चुकावयाचे नाहींत.

असल्या गोष्टी ज्यांना घडावयास नको असतील त्यांनीं मागें एका लेखांत सुचविल्याप्रमाणें गृहशिक्षण या संस्थेची स्थापना पुनः करावयास सिद्ध झालें पाहिजे. लोक असें विनाकारणच समजून चालतात कीं घरांत आपण कसलेहि संस्कार केले नाहींत तरी मुलें व मुली अमुक एका पद्धतीनेंच वागतील. पण हा त्यांचा भ्रम आहे. पूर्वजांनीं ठेवलेल्या धनापैकीं थोडें कांहीं किडुकमिडुक शिल्लक राहिलें आहे. येवढ्यावर आतां भागण्यासारखें नाहीं. आपल्या ज्या गोष्टी घरांत टिकून रहाव्या असें वाटतें, त्या टिकवून धरण्यासाटीं कांहीं कष्ट करणें अवश्य आहे. आणि या कष्टांनाच गृहशिक्षण हें नांव देतां येण्यासारखें आहे. अमुक गोष्ट चांगली आहे, अमुक गोष्ट वाईट आहे, ती अशासाटीं चांगली आहे आणि तशासाटीं वाईट आहे, याचें विवेचन प्रत्येक पालकानें आपल्या घरांत निर्भयपणें केलें पाहिजे आणि मुलांच्या मनावर त्या वस्तूंचें बरेवाईटपण ठसवून बसविलें पाहिजे. त्यांच्या बुद्धींत कांहीं आग्रहच उत्पन्न केले पाहिजेत. ज्या लोकांच्या जीवितांत कसलेहि आग्रह नाहींत, त्यांच्या जीवितांची धूळधाण झाल्याशिवाय रहाणार नाहीं, हें प्रत्येक पालकानें ध्यानांत ठेवावयास हवें. पण, सध्यां जे लोक साठीच्या आणि चाळीशीच्या घरांत आहेत, त्यांनीं ही गृहशिक्षण संस्था साफ मारलेली आहे. आपलीं मुलें वर्तमानपत्रांतून कांहीं

आग्रह शिकतात; परन्तु, आग्रह शिकविण्यास खरे खरे पात्र असलेले पत्रकर्ते तुम्हांला क्वचितच भेटतील. म्हणून आपल्या मुलांच्या मनाची ठेवण अमुक एक तऱ्हेची बनली पाहिजे असें ज्यांना ज्यांना वाटत असेल त्यांनीं त्यांनीं ती बनविण्याची खटपट सख्तपणानें केली पाहिजे.

घराच्या बाहेरचें जीवित हें केवळ बकाल आहे. बकाल म्हणजे निरनिराळ्या संस्कृतींच्या संकराचें बनलेलें आहे. कांहीं लोक असे असूं शकतील कीं, ज्यांना हा संकर किंवा हें मिश्रणच मान्य आहे. मतस्वातंत्र्याच्या दृष्टीनें पाहतां त्यांच्याशीं कोणी हुजत घालण्याचें कारण नाहीं. पण विषादाची गोष्ट ही कीं, केवळ दुर्लक्षानें, हयगयीनें, चालढकलीनें, आणि उपेक्षेनें माणसें या संकराच्या विचारांत सांपडतात आणि आपण मोठे उदार आहों असें स्वतःला लटकेंच भासवून घेतात. अशा लोकांना स्वच्छ सांगितलें पाहिजे कीं, तुम्ही फसत आहां आणि म्हणूनच गृहशिक्षण या संस्थेची स्थापना तुम्हीं पुनः करावयास हवी. जितके पत्रकर्ते, वक्ते, आणि लेखक याबाबतींत ऐसपैस औदार्य दाखवितात, त्यांतले एक शतांश लोकसुध्दां मूळ मुद्याच्या वेळीं आपल्या ठराविक चाकोरीच्या बाहेर जात नाहींत. परंतु 'वचने किं दरिद्रता' या न्यायाचा आश्रय करून सभा गाजवितांना किंवा आपली लेखणी चालवितांना ते अत्यंत बेजबाबदारपणानें व अप्रामाणिकपणानें वागतात. म्हणून प्रत्येक पालकानें आपल्याला जी गोष्ट मोलाची वाटत असेल ती तशी आहे, असें आपल्या मुलांना सांगावें आणि जर तीं आतां एवढीं सुशिक्षित बनत आहेत तर तें त्यांना बुद्धिवादानें पटवून द्यावें. नुसताच आग्रह धरून चालावयाचें नाहीं आणि चालूं नये. आपण जो आग्रह धरतों तो कोणच्या कारणास्तव युक्त आहे याचें विवेचन त्यांनीं आपल्या मुलांपुढें केलें पाहिजे आणि जर आपल्याला करतां आलें नाहीं तर तें जाणत्या माणसांच्याकडून करविलें पाहिजे. हें जर त्यांनीं वेळींच केलें नाहीं तर त्यांची स्पष्ट फजिती होणार आहे.

कॉलेजांतील मुलांमुलींचा प्रश्न चालू असतांना मी या विषयांत बराच दूर गेलों आहे असें कोणास वाटण्याचा संभव आहे. परंतु तसें झालेलें नाहीं. आपल्या भावी सामुदायिक जीवितांत जे फरक पडणार आहेत, त्यांची उगमस्थानें म्हणजे आपलीं विद्यामंदिरें होत. येथेंच मुला-मुलींचें भवितव्य अप्रत्यक्ष रीत्या ठरावयाचें असतें. सार्वजनिक जीविताची तऱ्हा जवळपास ठरल्यासारखी झाली आहे. आणि कशाला बरें म्हणावयाचें किंवा वाईट म्हणावयाचें, याचे कांहीं औदार्यसंकेत सिध्द होऊन बसलेले आहेत. या संकेतांना पुष्कळ पालक भितात आणि आपलेंच कांहीं चुकत आहे असें त्यांना वाटतें. पण त्यांनीं निर्भय बनावें आणि आपल्याला प्रिय किंवा अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी, प्रिय किंवा अप्रिय या नात्यानें मुलांच्या मनावर स्वच्छ उपपत्तीनें ठसविण्यास त्यांनी बिलकूल भिऊं नये. हें करावयाचें म्हणजेच गृहशिक्षण या संस्थेचा पुनरुद्धार करावयाचा असें समजावें. मुलांनीं कांहीं निराळें केलें म्हणजे या हयगयखोर पालकांच्या मनाची जळफळ होते. पण त्यांत मुलांच्याकडे कांहींच दोष नसतो किंवा असला तर थोडा असतो. कारण तसें वागूं नये हें त्यांना कोणीं कोठें शिकविलें होते ? पालकांनीं ही व्यवस्था केली होती काय ? ते प्रामाणिक असतील तर त्यांना जबाब द्यावा लागेल कीं, आपल्या मुलांच्या मनावर योग्य ते संस्कार करण्याची कसलीही व्यवस्था आपण केली नव्हती ! मग असें जर आहे तर बी न पेरतां फलाची वांच्छा त्यांनीं कां करावी ? तथापि यासंबंधानें आणखी ऊहापोह करावयास हवा.

---

# विवाहविषयक वादळें

१

चांगले चांगले कादंबरीकार लोक आपल्या कथानकाचें नायिकापण कॉलेजकुमारींना अर्पण करतात आणि या कादंबऱ्या वाचकलोक बिनतक्रार वाचतात; यावरून तरी कॉलेजांत जाणाऱ्या मुली लग्नाच्या वयाच्या खचितच झालेल्या असतात हें मत, शिक्षणाचें माप स्त्रियांच्या पदरांत पुरेंपुरें पडलें पाहिजे असा आग्रह धरणारे जुन्या पिढींतील सुधारक लोकसुद्धां मान्य करतील. परन्तु, इतकें वळण घेण्याचीसुद्धां जरूरी नाहीं. झालेल्या प्रीतिविवाहांची संख्या जरी थोडी असली तरी, ज्या मुलामुलींनीं ते केले तीं कॉलेजांत असतांनाच ते झालेले आहेत किंवा निदान त्या वेळेला ठरलेले असून पुढें केव्हां तरी झाले आहेत, हें त्यांच्या मित्रपरिवारांतील माणसांना खास माहीत असतें. इतके स्त्रीपुरुष विद्यार्थी एकत्र वागत असतां प्रीतिविवाह एखादा एखादाच होतो याचें कारण या विद्यार्थ्यांचें वय लग्नाचें झालेलें नसतें असें नसून, विवाह हा विषय आपल्या हातचा नाहीं, वडील माणसें काय करावयाचें तें करतील, या विचाराची छाप त्यांच्या मनावर अजूनही बहुतांशीं कायम असते, हें आहे. जर उद्यां पालकवर्गानें आपल्या सर्व पाल्ल्यांना असें सांगून टाकलें कीं 'आमची कसल्याहि तऱ्हेची हरकत नाहीं, तुम्हांला ज्यांच्याशीं विवाह करावेसे वाटतील त्यांच्याशीं करा, शिक्षण चालू असतांनाच ते झाले तरी आमची हरकत नाहीं,' तर प्रीतिविवाहाची संख्या भराभर वाढत जाईल असा माझा अंदाज आहे. कोणीहि मुलें असें म्हणणार नाहींत कीं आमचें लग्नाचें वय नाहीं! सांगण्याचें तात्पर्य असें कीं कॉलेजांत जाणारीं मुलें हीं लग्नाच्या वयाचीं झालेलीं असतातच असतात; आणि त्यांच्या मनांत स्त्रीपुरुषभाव उदित झालेला असतो, इतकेंच नव्हे तर तो चांगला प्रबळ

होत चाललेला असतो. हा स्त्रीपुरुषभाव पुष्ट होण्याला आणखीही एक कारण घडतें.

इतर व्यवसायांत तरुण स्त्रीपुरुष जरी सान्निध आले तरी त्यांच्या मनांत हा भाव उदित होण्याला किंवा पोसावयाला त्या व्यवसायाची मदत होत नाहीं. परंतु, शिक्षणक्रमांत ज्याला Cultural education म्हणजे सांस्कृतिक शिक्षण म्हणून म्हणतात तें विद्यार्थ्यांना देण्यासाठीं ज्या साहित्याची योजना केलेली असते, तें हा भाव उदित करण्यास कितीतरी कारणीभूत होतें. वाङ्मयाचा अभ्यास हा जवळजवळ सक्तीचाच असतो आणि वाङ्मय म्हटलें म्हणजे तें बव्हंशीं स्त्रीपुरुषभावावरच रचलेलें असतें. आपल्या जीविताला आणखी कांहीं निराळ्या शाखा आहेत याची जाणीव फारच थोड्या लेखकांना असते. आपण 'जुने लेखक जुने लेखक' म्हणून कांहीं लेखकांचा मोठा गौरव करतों. परंतु त्यांच्या विचारांचें किंवा भावनांचें क्षेत्रसुद्धां अगदीं मर्यादित असते. अगदीं एखादा लेखक क्वचित् एखाद्या प्रसंगीं या स्त्रीपुरुषभावाच्या पलीकडे फिरकतांना दिसतो; आणि जर वाङ्मयाचाच अभ्यास करावयाचा तर त्यांचें हें वाङ्मय शिकविणें, म्हणजे त्यांतील रसाच्या छायोपछाया बारकाईनें समजावून देणें, हें ओघानेंच येतें. कित्येक वेळां तर असा प्रकार होतो कीं कांहीं कांहीं शेलकीं शेलकीं ठिकाणें वगळूनच पुढें जावें लागतें! वगळल्यामुळें तीं विद्यार्थ्यांना जास्तच प्रिय होतात; तीं काय आहेत हें बारकाईनें पहाण्याकडे त्यांचें लक्ष जास्तच जातें. आणि ज्यांना त्यांतील मर्म कळलेलें असतें ते विद्यार्थी अर्धस्मित करीत एकमेकांकडे खुणा करून पाहूं लागतात, आणि सभ्यपणाचा आव आणून विद्यार्थिनींच्या समूहांत कोणची चलबिचल चालू आहे याचा सूक्ष्म कटाक्षांनीं अंदाज घेतात. कोणाकोणाचें असें मत आहे कीं एवीतेवी विद्यार्थ्यांना हें सारें समजतेंच, मग प्राध्यापकानें सरळपणानें खोलांत शिरून त्याचें विवेचनच कां करूं नये? पण एक तर प्राध्याप-

काला ही गोष्ट जड जाते; आणि दुसरें असें कीं ती वस्तू ओलांडून पुढें गेल्यानें तिचा जेवढा आविष्कार विद्यार्थ्यांपुढें होतो त्याच्या शतपट आविष्कार तिचा उलगडा केल्यानें होतो. कै. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्यासारख्या एखाद्याच प्राध्यापकाला ही गोष्ट साधण्यासारखी असते. पण सांगण्याचा मुद्दा हा कीं स्त्रीपुरुषभावाचें चलनवलन संमिश्र विद्यार्थी-समूहांत जोरानें चालू व्हावें असे कितीतरी प्रसंग या वाङ्मयाच्या शिक्षणांत भेटतात. म्हणजे जें काम त्यांनीं हातीं घेतलेलें असतें त्या कामानेंच स्वभावसिद्ध चलनवलनाला अधिक जोराची चालना मिळते.

हाच संमिश्र विद्यार्थीसमूह सूत काढीत बसला आहे, माग चालवीत आहे, किंवा रसायनविद्येतील कांहीं प्रयोग करीत आहे, अशी कल्पना केली तर यौवनसुलभ असें जें चलनवलन केवळ सान्निध्यामुळें उत्पन्न होईल, तेवढेंच काय तें त्यांच्या बाबतींत जमेस धरावें लागेल. हातांत घेतलेल्या व्यवसायानें त्यांत भर पडणार नाहीं. परंतु जर चित्रकलेचें, गाण्याचें, अभिनयाचें संमिश्र शिक्षण चालू असलें तर त्या ठिकाणीं स्त्रीपुरुषभाव हा जास्तच प्रबल बनेल, इतकेंच नव्हे तर क्वचित् प्रसंगीं बेकाळतसुद्धां जाईल, असा अंदाज करावयास कांहींच हरकत नाहीं. शिक्षणाच्या बाबतींत त्याला एवढें भडक रूप जरी प्राप्त झालें नाहीं तरी तो पोसत राहतो यांत कसलाहि संदेह नाहीं. परंतु याला कोणाचाच इलाज नाहीं. जीविताची वांटणी स्त्री–पुरुष या मुद्यावर कांटेकोरपणानें या टोंकापासून त्या टोंकापर्यंत अखंड करतां येईल अथवा ती करणें इष्ट आहे, असें मला बिलकूल वाटत नाहीं. आपलें खरें वैभव हेंच होय कीं संमिश्र समूहानें प्राप्त होणारे जे कोणचे लाभ होण्यासारखे असतात तें करून घेऊन त्यापासून होणारी हानी मात्र न होईल असे इलाज योजावे. आपलें सगळें जीवित, या हानीच्या भयानें जर आपण अलिप्तपणानें वेष्टून टाकलें, तर आपल्यासारखे नादान आपणच, असें म्हणावें लागेल.

असो. वयामुळें या संमिश्रसमूहांत जें एक तऱ्हेचें आकर्षण उत्पन्न होतें तें प्रबल बनावयास हातीं घेतलेला व्यवसायही कारण होतो एवढेंच या ठिकाणीं सांगावयाचें आहे.

जर अशी स्थिति आहे तर प्रीतिविवाहाची ऊर्मि मुलामुलींच्या मनांत उत्पन्न होणें अटळ आहे. मुलें बेताल झालीं आहेत असें म्हणणारांनीं तीं खरोखरी बेताल झालेलीं नाहींत हें ध्यानांत ठेवून समाधानच मानलें पाहिजे. वयानें प्रौढ झालेलीं व प्रापंचिक बनलेलीं माणसेंसुद्धां, समाजांत रूढ झालेल्या स्वातंत्र्याचा अनुभव मिळाल्याबरोबर, केवढाल्या चुका करतात हें या लोकांनीं अवश्य ध्यानांत घेतलें पाहिजे. जे प्रापंचिक नात्यांनीं बद्ध झालेले आहेत तेसुद्धां या कामीं कित्येकदां फसत आले आहेत, आणि मग त्यांनीं आपल्या आचारविषयक गफलतीला विवाहाची जोड देऊन आपली अब्रू संभाळून घेतली आहे. अनेक ठिकाणीं हें दिसून आलेलें आहे. ही जर चांगल्या सुबुद्ध आणि प्रौढ माणसांची स्थिति तर वैवाहिक बंधनांच्या खेळकर आणि मधुर प्रांगणांत ज्यांना अजून शिरावयाचेंच आहे, त्यांच्या मनोव्यापारांत आणि मग त्याला अनुसरून त्यांच्या चालचलणुकींत कांहीं निराळा प्रकार दिसूं लागला तर त्यांत भिचकण्यासारखें कांहीं आहे असें मला वाटत नाहीं. स्वाभाविक काय आहे त्याचेंच विवेचन मी करीत आहें. परिस्थितिप्राप्त काय असतें तेवढेंच मी पहात आहें. बऱ्यावाईटाचा विचार अजून मी यांत आणलेला नाहीं. भूमिका इतकी तयार असूनसुद्धां पालकांना कदाचित् अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी इतक्या कमी घडतात याचेंच त्यांना आश्चर्यच वाटावयास हवें. आपल्या मुलांच्या मनावर स्वभावतःच झालेले किंवा पूर्वार्जित संस्कार इतके बलवत्तर आहेत कीं मर्यादेचा त्याग मुलांनीं अजून योग्य मानलेला नाहीं.

कोणाला असें वाटण्याचा संभव आहे कीं मी मुलामुलींची तरफदारी करीत आहें. परंतु जे कोणी या संमिश्र विद्यार्थीसमूहांत मोकळेपणानें आणि

सौहार्दानें वागलेले नाहींत त्यांनाच असें वाटण्याचा संभव आहे. जे प्राध्यापक किंवा इतर कोणी कार्यकर्ते विशेष ममत्वानें या समूहांत वावरलेले आहेत त्यांना मी म्हणतों ही गोष्ट खचितच पटेल. मुलांच्यांत प्रत्यक्ष वागून पहावें म्हणजे सामान्यपणें सरसकट लोकांना वाटतो तितका बेतालपणा विद्यार्थ्यांत नाहीं असें आढळून येईल. ज्या लोकांना या बाबतींत मोठी चिंता वाटते, त्यांना ही माझी जबानी परिहारकच ठरेल. कशाला काय नांव द्यावयाचें हेंच माणसांना पुष्कळदां कळत नाहीं. बरोबरीनें शिकलेलीं, मनांत एकच प्रकारच्या कल्पना वागवीत असलेलीं, हास्य, विनोद, करुणा, शृंगार अशांसारख्या विविध रसांच्या त्या त्याच कल्पनांचा परिचय झालेलीं, आणि त्यांतहि समवयस्क असलेलीं माणसें एकत्र बसलीं, तर त्यांच्या बोलण्याचालण्यांत आणि हास्यविनोदांत एक तऱ्हेचा मोकळेपणा रहावा हें साहजिकच आहे. आपल्या जीविताला व्यापून राहिलेला तो पूर्वीचा अलिप्तपणा म्हणजेच नीतीची खरी मर्यादा होय, असें ज्यांचें मत आहे ते जीविताच्या नव्या कक्षेंत उतरावयास मनानें अजून पात्र झाले नाहींत, असेंच म्हटलें पाहिजे. आतांच सांगितलेला जो मोकळेपणा तो म्हणजे अनीति नव्हे, हें, मुलांच्यांत वागल्यानें त्यांना कळूं लागेल. आपला प्रस्तुतचा मुद्दा मात्र याच्यापुढचा आहे. कारण या मोकळेपणांतूनच प्रीतिविवाहाचा जन्म होतो; किंवा प्राप्त झालेल्या आकर्षणाला बळ प्राप्त होतें.

क्षणभर अशी कल्पना करावी कीं सर्व समाजभर स्त्रीशिक्षणाचा फैलाव झालेला आहे; आणि सर्व जातींतील मुली कॉलेजांत येऊन दाखल होत आहेत. असें जर झालें तर याच प्रश्नाला हळूहळू निराळें व डोळस रूप प्राप्त होत जाईल. सध्यां पांढरपेशा ब्राह्मण, प्रभु इ० समाजांच्या मनालाच या प्रश्नानें एक तऱ्हेची व्यग्रता प्राप्त झालेली आहे. पण जर सर्व जातींतील मुली कॉलेजांत भरसंख्येनें येऊं लागल्या तर या व्यग्रतेचा वांटा इतर जातींतील पालकांनाहीं उचलावा लागेल. प्रीतिविवाहाची चर्चा इतरत्र करतांना

धर्म व जात यांचा उल्लेख मीं केलेला आहे. या दोनही संस्थांवरील लोकांची श्रद्धा उडालेली आहे असें समजणें हें अगदीं चूक आहे. धर्मावरची श्रद्धा कोणाचीच उडालेली नाहीं; आणि जातीवरची श्रध्दा क्वाचित् एखाद्याचीच उडालेली असतें. जातीनिर्बंधाविरुध्द पुष्कळच लोक लिहितात किंवा बोलतात. परन्तु मुख्य मुद्याला गोष्ट आली म्हणजे तेच लोक बेणा देतांना दृष्टीस पडतात. नामनिर्देश करून उदाहरणें देणें हें शिष्टाचाराला धरून होणार नाहीं. परन्तु अशीं उदाहरणें भराभर वेंचून काढतां येतील कीं, जेथें पालकांनीं जातींच्याविरूध्द मोठाच बकवा केलेला होता, परन्तु स्वतःच्या अपत्यांनीं थोडें स्वातंत्र्य दाखविल्याबरोबर जे संतापानें आणि दुःखानें केवळ हिरवेनिळे होऊन गेले. निरनिराळ्या जातींतील पालकांचे आग्रह आणि अभिमान निरनिराळ्या प्रकारचे असतात आणि आधुनिक कालांत हिंदुसमाजाच्या सर्वच जातींत स्वाभिमानाची ज्योत प्रगट झालेली असल्यामुळें या अभिमानाच्या आणि आग्रहाच्या पंक्तीला दुजाभाव आणि तिरस्कार हे सुध्दां येऊन बसलेले आहेत. जी स्थिति आहे ती लपविण्यांत कांहींच मतलब नाहीं. सिध्द असलेल्या परिस्थितीचें यथामति अवलोकन करणें हा या लेखमालेचा मुख्य हेतु असल्यामुळें अनेकांना अप्रिय वाटणाऱ्या अनेक गोष्टी या अवलोकनांत कदाचित् येऊन जातील. परन्तु त्याला नाइलाज आहे. समाजांत जागृत झालेली निरनिराळीं मतें तपासून पहावीं म्हणजे हिंदुसमाजांतील निरनिराळ्या जाती परस्परांच्या संबंधानें कोणची भावना बाळगतात याचा उलगडा ज्याला त्याला आपोआप होईल. जात ही वस्तू अशी आहे कीं, तिच्यासंबंधानें विधायक आणि कार्यसाधक अशी जरी चर्चा केली तरी तिचा निर्देश झाल्याबरोबर त्या त्या जातीचे लोक कावरेबावरे होतात आणि विषयाचें प्रतिपादन बाजूला राहून, म्हणजे निरुपयोगी ठरून, जातीच्या मुद्द्यावरच भांडणांना सुरवात होते. तुम्ही कितीही सचोटीनें आणि निरहंकार बुद्धीनें चर्चा करा, आणि एकमेकांच्या प्रगतीला सहाय्यक होईल असें विवेचन करा, त्यांतील विधायकपणाचा

गुण मागें राहून या विवेचनांत अपकारकत्वच आहे असा बोभाटा सुरू होतो असा अनुभव लोकांना आजवर कितीतरी आलेला आहे. म्हणून जातींचा उल्लेख न करतां मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं या बाबतींत सर्वच बेटीबंद जातींचे लोक मनानें अत्यंत हळवे असतात; आणि सध्यां तर फारच झालेले आहेत. अर्थात् आपल्या मनाविरुद्ध मुलांचें कांहीं वर्तन झालेलें आहे असें दिसलें आणि त्याचा संबंध पोट–जात्यंतराशीं नव्हे तर वर्णजात्यन्तराशीं असला तर या मुलांच्या घरांत आणि त्यांच्या सुशिक्षित पालकांच्याही मनांत घनदाट अस्वास्थ्य भरून रहातें. याचीं अनेक उदाहरणें देतां येण्यासारखी आहेत. पण जर या प्रश्नाला कांहींएक गति उत्पन्न व्हावी असें कोणाला वाटत असेल तर ती, वर सांगितल्याप्रमाणें अनेक जातींच्या मुली कॉलेजशिक्षणांत प्रविष्ट झाल्या म्हणजेच प्राप्त होईल. कारण मग हर्षविषादांचा वांटा सर्वांनाच निरनिराळ्या तऱ्हांनीं मिळूं लागेल, आणि सध्यांचें पांढरपेशा समाजांतील लोकांच्या मनाचें अस्वास्थ्य कांहीसें कमी होण्याचा संभव आहे. सर्वच जातींच्या मुली जोंपर्यंत या शिक्षणाच्या प्रांगणांत शिरलेल्या नाहींत तोंपर्यंत पांढरपेशा लोकांचा हा या बाबतींतील नकार टिकून राहील असा माझा अंदाज आहे.

आणखीही एक विचार या बाबतींत ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. जोंपर्यंत डोक्यावरचें राज्यशासनछत्र डळमळीत आहे असें लोकांना वाटत राहील आणि जोंपर्यंत संधिसमानत्वाचा सार्वत्रिक प्रसार होऊन निरानिराळ्या जातींची नेमकी कुवत काय आहे याचा प्रत्यक्ष प्रयोगानें निकाल लागलेला नसेल तोंपर्यंत जातिसंस्था टिकून राहील. आणि जोंपर्यंत ती टिकून राहील तोंपर्यंत संभवणाऱ्या आंतर–जाति विवाहांनीं लक्षांत भरण्यासारखी विषमता जर दिसून आली तर निरनिराळ्या जातींत प्रसंगविशेषीं अस्वास्थ्य दिसल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु सध्या तरी मनुष्यमात्राच्या अंगीं असलेल्या सामर्थ्याच्या अंकुरांचा पोष व्हावा, त्याच्या अंगच्या सर्व

गुणांचा प्रकर्ष व्हावा अशी संधि सर्वांनाच देण्याकडे आपणा सर्वांचा कल असावा. ही संधि सर्वांना मिळत राहिली आणि माणसामाणसांची खरी किंमत काय आहे याचा निकाल एकदां जातिशः लागला म्हणजे हा प्रश्न जलदीनें चालीस लागेल. आणि ज्यांना तो अप्रिय वाटतो त्यांनाही त्याचें रूप फार सौम्य बनलेलें आहे असें वाटूं लागेल. परंतु हें स्तबक (Stage) येऊन पोंचावयास अजून थोडासा अवकाश आहे. जुनें सुटत चाललें आहे आणि नवीन येऊन ठेपलेलें नाहीं, अशा संधिकाळांत आपण सध्यां आहों. आणि म्हणून विचाराला निर्णय-रूप (Finality) जरी सर्वांनाच हवेसें वाटत असलें तरी ते या संधिकालांत आग्रहानें प्रकट करणें म्हणजे वैचारिक प्रमादच होय. मागल्या एकदोन लेखांत प्रीतिविवाहाच्या संबंधानें पालकांनीं कोणचें धोरण पत्करावें या संबंधानें मी जें विवेचन केलें आहे ते आजच्या घटकेला जास्त महत्त्वाचें आहे आणि आतांच ज्या विषयाची चर्चा मीं संपविली आहे तो विषय पालकांच्या विचारकक्षेंत अजून घसघशीतपणें येऊन पोंचावयाचा आहे.

कॉलेजांतील स्त्रीशिक्षणाचा प्रसार मनानें पहात असतांना कोणाही चिंतनशील माणसाच्या मनांत अनेक प्रकारच्या कल्पना उद्भवतात. समाजापैकीं केवळ मागें राहिलेला स्त्री नांवाचा समाजाचा बरोबर अर्धाविभाग भराभर पुरुषांच्या गांठीला येत आहे हें पाहून ज्या माणसाला आनंद उत्पन्न होत नाहीं तो खरोखर दुर्दैवीच समजला पाहिजे. ज्यांना आपण मनानें दुबळ्या आणि बुध्दीनें मंद अशा समजत होतों त्यांच्या मनाला प्राप्त झालेलें हें बल आणि बुध्दीला प्राप्त झालेली ही तरतरी प्रत्यक्ष पाहून ज्याच्या चित्तांत यत्किंचितही अपत्यप्रेम आहे त्याला आनंदाचें भरतें आल्यावांचून रहाणार नाहीं. आपल्या मुली आपल्या मुलांच्या बरोबरीच्या होत आहेत हें पाहून प्रत्येक पित्याला आनंदच वाटेल; आपल्या बहिणी बुध्दिदृष्ट्या आपली बरोबरी करूं शकतात हें पाहून आपलें घर खरेंखरें समृध्द

झालें आहे असेंच प्रत्येक भावाला वाटेल; आणि ज्यांच्या संगतींत आपल्याला भावी काळांत प्रपंच करावयाचा आहे त्या केवळ चूल आणि मूल करणाऱ्या न रहातां आपल्या जीवितांतील बरोबरीच्या वांटेकरणी होणार आहेत हें पाहून प्रत्येक तरुण माणसाला प्रपंचाविषयींचें उत्तेजनच वाटेल. परंतु, याहीपेक्षां विशेषपणानें ध्यानांत येण्यासारखा आणखी एक विचार आहे. कॉलेजच्या वातावरणांत वागत असतांना माझ्या मनांत तरी हा विषय पुष्कळदां भरून राही. या मुली पूर्वीच्या काळच्या अनेक जाचांतून मुक्त होत आहेत हें पाहून खरोखर फार समाधान वाटतें. पूर्वीच्या मुलींचें जिणें भारीच कोंडल्यासारखें, बिमिस्त आणि सर्वथा परावलंबी असे. त्यांच्या मनांत उत्पन्न होणाऱ्या विचारांचा आणि भावनांचा आविष्कार मोकळेपणानें होत नसे. याला आपण विनय असं समजत होतों. पण एकंदरीनें पाहतां कोंडलेल्या विचारांचे आणि भावनांचें रूपांतर कुढेपणा हेंच होत असलें पाहिजे. सध्यां मुली मोकळेपणानें हंसतात, बोलतात, शंका विचारतात, संभाषणांत एक तऱ्हेची स्पर्धा प्रगट करतात आणि अशा रीतीनें त्यांच्या बुद्धिगुणांचा आणि मनोगुणांचा प्रकर्षच होत जातो. याचा अर्थ असा कीं त्यांच्या अंगांतील मनुष्यपण जास्त जास्त विकसित होत जात आहे आणि हीच खरोखरी आनंदाची गोष्ट आहे. स्त्रीजात ही पूर्णपणें विकसित झाली म्हणजे जगताचें अपक्व राहिलेलें अर्धांग पक्व झालें असें होईल आणि त्या त्या मानानें मानवी जीवितांत एवढ्या सामर्थ्याची भर पडल्यामुळें तें झपाट्यानें प्रगत होत जाईल. हाही अतिशय उत्तेजक विचार आहे.

सुशिक्षित मुलींच्या समूहाकडे पहात असतांना यांचें जीवित पुढें पूर्वीच्या मुलींच्यापेक्षां जास्त सुखासमाधानाचें होईल हा विचार मनांत येऊन फार बरें वाटतें. सुशिक्षित मुलींचा जाच करणें सासवांना सहसा साधावयाचें नाहीं आणि जर कोणी सासवा तो हिय्याच करूं म्हणतील तर

त्यांना पस्तावा वाटूं लागेल. कारण सुशिक्षित मुली उगाच कसलें तरी बोलणें, केवळ अधिकाराचें म्हणून, मान्य करणार नाहींत. सासूची लाथ लागली तरी सुनेनेंच नमस्कार केला पाहिजे हा जुन्या संसारनीतींतील विचार मुली याच्यापुढें मानणार नाहींत आणि तें त्यांचें करणें बरोबरच होईल. कारण शिक्षणानें न्यायान्याय पहाण्याची त्यांची बुद्धि जागृत होईल व ती त्या प्रकट केल्यावांचून रहाणार नाहींत. सासुरवास या शब्दानें व्यक्त होणारी नीतिविचारांतील एक उग्र संस्था अजिबात बंद पडेल. कै. आगरकर यांनीं सासवांना दिलेली नोटीस पूर्णपणें बजावली जाण्याचा योग आतां खास आला आहे. आपल्या स्वतःच्या प्रपंचाची मालकी पूर्णपणें आपल्या ताब्यांत आली पाहिजे, हा आग्रह त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होईल. आणि त्यामुळें दुसऱ्या घराण्यांत गेलेल्या नणंदादिकांचा, स्वतंत्र प्रपंच असलेल्या जावादिकांचा, आणि मागल्या पिढींतील सासवादिकांचा अंमल त्या आपल्या प्रपंचावर चालूं देणार नाहींत आणि त्यामुळें एकंदरीनें आपापल्या अधिकाराच्या मर्यादा कळूं लागून सर्वांनाच सुख उत्पन्न होईल.

पुष्कळ लोक असें म्हणतात कीं या नव्या पोरींना एकत्र राहावयास नको. नव्या पोरी जर असें म्हणत असल्या तर त्यांच्या तक्रारींचें रहस्य जुन्या माणसांनीं ध्यानांत घेणें अवश्य आहे. दुसऱ्याच्या प्रपंचावर आक्रमण करणें हा आपल्या गृहव्यवस्थेंतील एक मोठाच दोष आहे. वहिनीच्या प्रपंचावर आपली हुकमत किती चालवावी याचा अंदाज 'वन्सं'ना करतां येत नाहीं. त्या फक्त दादाकडे पहातात आणि तो आपल्याशीं संगनमत करील असें त्या धरून चालतात. वहिनींच्या संसारावर हें त्यांचें आक्रमणच असतें. परंतु, आपल्या प्रापंचिक हक्काची जाणीव सुशिक्षित वहिनींना आतां उत्तम होत असल्यामुळें वन्संचें सूक्ष्म आक्रमण त्या आतां मुळींच मानणार नाहींत. आणि हेंच त्यांचें करणें बरोबर होईल. कारण वन्संना स्वतःचा निराळा संसार असतोच. आणि म्हणून त्यांनीं भावजयीच्या संसारावर कसलेंही

आक्रमण करतां कामा नये. हीच गोष्ट मागील पिढीच्या संबंधानेंसुद्धां खरी आहे. वडीलमातुश्रींनीं पुढल्या पिढीच्या प्रपंचावर किती आक्रमण करावयाचें आणि हुकमत चालवावयाची याच्या मर्यादा सुशिक्षित सूनच ठरवून देईल असें वाटतें. आपण जितके दिवस जिवंत आहों तितके दिवस आपल्या आवडीनिवडी, रागलोभ, पुढील पिढीनें आदरणीयच मानले पाहिजेत, असा हट्ट मागली पिढी धरून बसते. वास्तविक पाहतां जर आपला प्रपंच उलगडलेला आहे आणि घरांत नवीन प्रपंच उभा राहिलेला आहे तर आपण प्रपंचांतून हळूहळू अंग काढून घेणें आणि मुलाला आणि सुनेला त्यांच्या मर्जीप्रमाणें वागूं देणें यांतच मागील पिढीला भूषण आहे. पण दिसून येतें तें हें कीं त्या पिढीच्या प्रपंचाचाहि कबजा बारीकनिरीक गोष्टींसुद्धां आपल्याकडेच राहिला पाहिजे, असा हट्ट सासवा धरतातच धरतात. आतांपर्यंतच्या सुना मुग्धपणानें हें सारें सहन करीत. आतांची सुशिक्षित सून उर्मटपणानें नव्हे, पण शिक्षणाचा उपयोग करून घेऊन "आपण हें आक्रमण मागें घेतलें पाहिजे" असें त्यांना सौजन्यानें खचितच दाखवून देईल. नवीन पतिपत्नींना घरांत मोकळेपणानें वावरतां येणें हें किती अवश्य आहे! तें करतां येत नसल्यामुळें लग्न झाले रे झालें कीं तरुण पतिपत्नी बाहेर फिरावयास जाण्याचा प्रघात सुरू करतात. वडील माणसांना याचा मोठा राग येतो. आणि ते याला थिल्लरपणा म्हणतात. परंतु हें त्यांच्या ध्यानांत यावयास हवें कीं तरुण पतिपत्नींनीं एकदम फिरावयास जाऊं लागावें, या संस्थेचा जन्म आपल्या प्रापंचिक कोंझेपणांतच झालेला आहे. घरचें वातावरण जर अगदीं घळघळीतपणें मोकळें असेल तर या नव्या संस्थेचा आश्रय तरुण माणसें केवळ मौज म्हणून करतील, आवश्यकता म्हणून करणार नाहींत.

---

# सुशिक्षित मुलींना कांहीं सूचना १०

मागल्या लेखाच्या शेवटीं शेवटीं, नवीनच लग्न झालेल्या नवरा–बायकोंचें फिरावयास जाणें या संस्थेविषयीं मी लिहीत होतों. ही फिरावयास जाण्याची नवी चाल अगदीं अपरिहार्य आहे; आणि ती आपल्या जुन्या चालीरीतींतून आणि राहणींतून उत्पन्न झालेली आहे. सामान्यतः पाहतां, आपल्या प्रापंचिकांना लहान लहान घरांत रहावें लागतें; आणि त्यामुळें नवीन लग्न झालेल्या जोडप्याला मोकळेपणानें बोलतां–चालतां येणें अशा छोट्या घरांत अवघड बनतें. त्यांनीं बोलूंच नये असें म्हणणें हें शुध्द वेडेपणाचें लक्षण आहे. पूर्वींच्या काळीं नवरा–बायको हीं इतकीं लहान असत कीं, आपण परस्परांशीं बोलावें ही इच्छाच त्यांना उत्पन्न होत नसे. नवरा–बायको म्हणून गांठ पडल्यानंतर मग तीं चोरूनमारून एकमेकांशीं बोलूं लागत ! परंतु तो न्याय आतां लागू करणें अगदीं चूक आहे. वधू–वरें चांगलीं प्रौढ झालेलीं असतात आणि एकमेकांशीं बोलावें असें त्यांना मनापासून वाटतें; आणि तेंच बरोबर आहे. या इष्ट गोष्टीच्या आड जुनी विनयाची कल्पना आणणें अगदीं अप्रशस्त आहे. शिवाय लग्न झाल्यानंतर थोड्याच दिवसांत त्यांना दुसरीकडे कोठें तरी जाण्याचा प्रसंग येणार हें जवळजवळ ठरलेलेंच असल्यामुळें त्यासंबंधानें बोलणेंही अवश्यच असतें. परंतु घरच्या जुन्या चालीच्या वडील माणसांना ही त्यांची शब्दभेट अगदीं कशीशी वाटते. अर्थातच लग्न झाल्याबरोबर हीं तरुण माणसें ' फिरावयास जाणें ' या संस्थेचा आश्रय करतात. ही नवी चाल म्हणजे जुन्या लोकांच्या विनयकल्पनेवर एक मुग्ध टीकाच आहे. कोणी धसमुसळीं तरुण माणसें घरांतच बेधडक बोलूं लागलीं तर जुनीं माणसें काय करतील ? अर्थात् त्यांना कांहींच करतां येण्यासारखें नाहीं. पण तरीसुध्दां त्यांच्या भावनांना मान देऊन हीं तरुण माणसें आपणच

कांहीं काळपर्यंत घरांतून परागंदा होतात, हें त्यांच्या स्वतःच्या विनय-वृत्तीचेंच लक्षण आहे ! परंतु नवीन काळाशीं यत्किंचितही जमवून घेण्याची पात्रता ज्या जुन्या लोकांच्या अंगीं नाहीं, त्यांना तरुण लोकांचें हें कृत्यही स्वतःला अपमानास्पद वाटतें. परंतु ही किंमत त्यांना आतां द्यावी लागणार आहे. हा विचार मीं अशासाठीं सांगितला कीं अजूनही कॉलेजांतच असलेल्या पण लग्न झालेल्या मुलींना नवऱ्याबरोबर 'फिरावयास जाणें' या संस्थेचा आश्रय करण्यांत कांहीं संकोच वाटूं नये. गृहस्थिति बदलत चाललेली आहे याकडे जे समाज बिलकूल लक्ष देत नाहींत ते आपण होऊनच नव्या गैरसोयी उत्पन्न करतात आणि दुःख पावतात. म्हणून या कामीं तरुण माणसांनीं थोडें धैर्य धरून एकादी नवी चाल काढली तर त्यांत कांहीं गैर नाहीं.

कॉलेजांतील मुलींच्यापुढें आणखी एक मोठा बिकट प्रश्न येऊन पडतो. प्रीतिविवाह केला म्हणून किंवा चांगलेसें स्थळ मिळालें व वडील माणसांनींच लग्न करून दिलें म्हणून, लग्न झाल्यानंतर मुलींना असें दिसून येतें कीं आपण ज्या घरीं पडलों आहों त्या घरांत माणसें बरींच आहेत; दीर आणि जावा यांची संख्या मोठी आहे; आणि घरांत निरनिराळ्या तऱ्हेच्या सासवा आणि कांहीं नणंदाही आहेत. एकाद्या ठिकाणीं एकादा आखाडसासराही असतो ! हीं सगळींच माणसें शिकलेलीं असतात असें मुळींच नाहीं. ज्याच्यावर प्रीति बसली म्हणून लग्न केलें किंवा वडिलांनीं ठरविलें म्हणून ज्याच्याशीं लग्न लाविलें तो एक चांगला सुशिक्षित असतो, आणि शहरांत राहिलेला असल्यामुळें त्याच्या चालीरीतीला नागर वळण लागलेलें असतें; आणि रूपाला कृत्रिम कां होईना, पण थोडी झिलई आलेली असते. परंतु घरांतील बाकीचीं माणसें पुष्कळदां अगदीं मागसलेलीं आणि चालचलणुकींत अगदीं ओंगळ असतात. घरांत सोंवळ्या ओंवळ्याचा जाच अतोनात असतो आणि शिकलेल्या स्त्रीच्यासंबंधानें

या लोकांच्या मनांत अविश्वासाचा आणि अवहेलनेचा किंतु वागत असतो. अशा प्रसंगीं प्रपंचांत सुखोत्पत्ति करून घेणें हें सुशिक्षित मुलीच्या बुध्दीच्या ऐपतीवर अवलंबून आहे. कांहीं गोष्टी मनासारख्या झाल्या तरी कांहीं गोष्टी मनाविरुध्द घडणार हा विचार तिनें पचनीं पाडला पाहिजे. तिनें असें केलें तरच तिला सुख लागेल. वरील परिच्छेदांत आईबापांनीं जुळवून घेतलें पाहिजे अशी जी अपेक्षा दर्शविलेली आहे तीच अपेक्षा मुलीच्या बाबतींत या प्रकरणीं कोणीही ठेवील. परंतु या कामीं सुशिक्षित नवऱ्यानेंच जागृत असलें पाहिजे; आणि ‘ आपण सुशिक्षित झालों किंवा प्रीतिविवाह करून चुकलों ’ असा विचार मुलीच्या मनांत न येऊं देण्याची दक्षता त्यानें ठेविली पाहिजे.

कॉलेजांतील सुशिक्षित मुलींना मी आणखी एक विचार अवश्य सांगूं इच्छितों. प्रीतिविवाह करतांना किंवा वडील माणसांनीं ठरविलेलें स्थळ पत्करतांना त्यांनीं चांगलें डोळसपणानें वागलें पाहिजे. प्रीतिविवाह हा प्रीतीपुरता बरोबर आहे. पण त्यावेळीं आपण ज्या गोष्टींकडे लक्ष द्यावयास हवें होतें त्या गोष्टींकडे प्रीतीच्या उन्मादांत आपण काणाडोळा केला, असें पुढें न वाटेल इतपत दक्षता सुशिक्षित मुलींनीं ठेविलीच पाहिजे. मुलाची गृहस्थिति कशी आहे, त्याचे नातेवाईक कोण आहेत, सामाजिक परिणतीच्या कोणच्या स्तबकांत ते आहेत, एकत्र कुटुंबपध्दति आणि विभक्त कुटुंबपध्दति या संबंधानें त्याच्या घरचे विचार काय आहेत, या साऱ्या गोष्टींची चर्चा, ज्याच्यावर आपली प्रीति बसलेली आहे त्या तरुणाशीं त्यांनीं केलीच पाहिजे. ‘ प्रेम आंधळें असतें ’ हा न्याय कवींनीं आणि नाटककरांनीं घोळघोळून किती जरी रम्य बनविलेला असला तरी तो फक्त काव्यांत आणि नाटकांतच शोभतो, हें मुलींनीं विसरतां कामा नये. आपली गृहस्थिति एकंदरीनें ठीकच आहे आणि आपल्या भावी स्वास्थ्याच्या आड ती सहसा येण्यासारखी नाहीं असें त्यांच्या प्रीतीस पात्र झालेला

पुरुष खचितच भासवील. अशा कामीं कोणी लबाडी करतो किंवा कोणी मूर्ख असतें असें मला सुचवावयाचें नाहीं. दोन्हीही घाईत असतात, इतकेंच काय तें ! म्हणून हा जागृतीचा टचका, विशेषतः मुलींच्या मनाला देऊन ठेवणें मला अवश्य दिसतें. कारण लग्न झाल्यानंतर, मुलगी कितीही सुशिक्षित असली तरी, मुलगा बाहेरच्या जगांतच वावरत राहून मुलीला मात्र घरच्या परिस्थितीचा सर्व जाच सोसावा लागतो, हे अक्षरशः खरें आहे.

अजून कॉलेजांतील बहुतेक सर्व मुलींचीं लग्नें त्यांचीं वडील माणसेंच ठरवितात. प्रीतिविवाह क्वचित् एकादा एकादा घडतो. या बाबतींत कॉलेजच्या मुलींनीं आपली आवड–निवड जागृत झालेली आहे हें दाखविण्यांत कांहीं चूक नाहीं. त्यांत वडील माणसांचा अवमान नाहीं आणि वडील माणसांनीं तो मानला तर त्याचें दायित्व त्यांच्यावरच आहे असें समजावें. अलीकडे पुष्कळ पालक आपल्या सुशिक्षित मुलींना, " अमुक मुलगा तुला पसंत आहे ना ?" असें चक्क विचारतात आणि ही फार संतोषाची गोष्ट आहे. हे पालक आपलें कर्तव्य बरोबर जाणतात. पण अजूनहि शेंकडो पालक असे आहेत कीं आपल्या सुशिक्षित मुलींना कांहीं मत असेल किंवा आवडनिवड असेल असें ते समजतच नाहींत. आपण यांचें लालनपालन केलें आहे, आपण यांचें शिक्षण केलें आहे, तर आपली पसंती त्यांनीं मान्य करावी, हा आपला हक्कच आहे असें ते समजतात. या ठिकाणीं सुशिक्षित मुलींनीं जागृतच असलें पाहिजे. सुशिक्षित असणें याचा अर्थ अमर्यादशील असणें असा जरी नसला तरी ' आपल्या अंगीं शहाणपण आलें आहे आणि आपल्याला बऱ्यावाईटाची कल्पना प्राप्त झालेली आहे असें दाखविण्याचें धैर्य' एवढा अर्थ तरी सुशिक्षित शब्दाला निःसंशय असला पाहिजे. हें धैर्य दाखविल्यामुळें घरांत थोडी अप्रीति उत्पन्न होईल हें खरें. पण वडील मंडळींनासुद्धां थोडासा दंश होऊन जागृति यावीच लागते, हें तितकेंच

खरें आहे. म्हणून एखादा मुलगा जर आपल्याला नापसंत असला तर तो नापसंत आहे हें वडील माणसांच्या कानावर घालावयास मुलींनीं यत्किंचित्‌ही भिऊं नये. ज्या वेळीं आवडनिवड उत्पन्नच झालेली नसे व मुली सर्वथा अगतिक असत तेव्हांचा न्याय आतांच्या मुलींना लागू करणें किंवा त्या मुलींनीं तो पत्करणें हें सर्वथा चूक आहे.

मुलींनीं जर हें धैर्य दाखविलें तर त्याचा एक अनुकूल परिणाम सुशिक्षित मुलांच्यावर भराभर होत राहील. अजूनही चांगलीं शहाणींसुर्तीं आणि सुशिक्षित झालेलीं मुलें डझनावारी मुली पहात सुटतात आणि 'ही अशी आहे' 'ती तशी आहे' अशी शेरे–मारी करण्यांत धन्यता मानतात. तुळशीबागेंतल्या बाहुल्या बघावयास जाणें आणि उपवर मुली पहावयास जाणें या दोन्ही गोष्टी त्यांना सारख्याच किंमतीच्या वाटतात. दर ठिकाणीं जाऊन मोठ्या आढ्यतेनें "मुलगी नापसंत आहे" असा शेरा कळविण्याचा आपला हक्कच आहे अशा डौलानें हीं मुलें वागतात. यांना शुद्धीवर आणण्यास एकच इलाज आहे आणि तो म्हणजे सुशिक्षित मुलींनींसुद्धां आपली आवडनिवड प्रकटपणानें सांगण्यांचें धैर्य दाखविणें हा होय. आपण मुली 'बघावयास' जातों तेव्हां आपण 'दिसावयासही' जात आहों हीही भीति मुलांच्या मनांत उत्पन्न केलीच पाहिजे. मुलींची परीक्षा करतांना आपलीही परीक्षा मुली तेथें करणार आहेत, ही जाणीव मुलांच्या मनांत उत्पन्न झालीच पाहिजे. असें झालें तर शेरे मारण्याचा मुलांचा उन्माद कमी होत जाईल आणि आपण कोण आहों, आपली चेहरेपट्टी कितपत आहे आणि आपल्या घरांत उद्यांची भ्रांत आहे काय; त्याप्रमाणेंच समोर बसलेली मुलगी आपल्याप्रमाणेंच सुशिक्षित आहे आणि तिलाही आवड-निवड आहे हे सर्व विकल्प त्याच्या मनांत उत्पन्न होऊं लागतील; व तो आपली किंमत तारतम्यानेंच ठरवूं लागेल. अमुक मुलाला चार ठिकाणीं नापसंत केलें आहे असा बोभाटा एकदां कां झाला कीं तो पांचव्या ठिकाणीं

थोडा बेतानेंच वागेल आणि मुलगी पसंत आहे असें म्हणण्याकडे त्याचा कल आपोआपच होईल. दहा ठिकाणीं नापसंत होणें या गोष्टींचा सुशिक्षित मुलींच्या मनावर किती विपरीत परिणाम होतो याची दखलगिरी आपल्या सुशिक्षित मुलांनीं बिलकूल ठेवूं नये याचें नवल वाटतें. म्हणून सुशिक्षित मुलांना माझें असें सांगणें आहे कीं अमुक ठिकाणीं मुलगी बघावयास चल असें वडील माणसांनीं म्हटल्याबरोबर, मला मुलगी पसंत असली तरी त्या मुलीनें माझ्यासंबंधींची पसंती दर्शविली तरच मी तिच्याशीं लग्न करीन असें त्यांनीं आपल्या वडील माणसांना स्वच्छ सांगावें. यांत कांहीं एक चूक नाहीं. कॉलेजांतील मुलामुलींच्यावर हे प्रसंग येतातच येतात. म्हणून या गोष्टीचा खुलासा थोड्याशा विस्तारानें केला आहे.

कॉलेजच्या वातावरणांत प्रीतिविवाहाची कल्पना जशी वाढत चालली आहे तशी आणखी एक असमाधानाची हीन प्रवृत्ती सुद्धां बळावत चालली आहे, हेंही या लेखमालेंत सांगितलें पाहिजे. कांहीं मुलींच्या संबंधानें कोणा मुलांच्या मनांत अभिलाष उत्पन्न होतो आणि त्याला यश येण्याचा संभव नाहीं असें पाहिल्यानंतर त्या मुलींना इजा पोंचविण्याची एक गूढ वासना त्यांच्या मनांत उत्पन्न होते. अशा मुलांची संख्या सध्यां थोडी आहे हें मला माहीत आहे. तथापि, हीं मुलें कॉलेजचें वातावरण आपल्या दुष्ट प्रवृत्तींनीं दूषित करतात यांत बिलकूल संदेह नाहीं. मुलींना नाना प्रकारचीं चारगटपणाचीं पत्रें धाडणें हें कांहीं थोड्या मुलांना एक प्रकारचें व्यसनच लागलेलें असतें. या मुलांच्या मनाची परीक्षा केली तर असें दिसेल कीं यांतलीं कांहीं केवळ वात्रट असतात. पण कांहीं मात्र वर सांगितल्याप्रमाणें असमाधान उत्पन्न झालेलीं किंवा त्या मुलींच्या प्रीतीस सर्वथा अपात्र असलेलीं पण रुष्ट बनलेलीं अशीं असतात. यांचें टपाल-खातें सारखें चालू असतें. पण तें फक्त एकांगीं असतें. उघडकीस येऊं नये म्हणून हीं भित्रीं मुलें निरनिराळीं हस्ताक्षरें

काढतात; किंवा आपल्या मनांतील भाव व्यक्त करणारे कोठले तरी छापील कपटे एकमेकांपुढें जोडतात. सही करावयाची नसल्यामुळें काय वाटेल तो टारगेपणाचा मजकूर हे विद्यार्थी आपल्या या पत्रांत लिहितात आणि सर्वांच्या निदर्शनास यावा म्हणून तो केवळ उघड्या कार्डावर लिहितात. कॉलेजांत पाऊल टाकल्यापासून तों पदवीधर होऊन कॉलेजांतून बाहेर पडेपर्यंत सतत चार वर्षें अशा पत्रांचा ससेमिरा मागें लागलेल्या मुलींचीं नांवें मला माहीत आहेत. परंतु अशा लोकांना गांठावें कसें हेंच कोणाच्या ध्यानांत येत नाहीं. असलीं प्रकरणें पोलीसांत न्यावीं तर त्यांचा गाजावाजा इतका होतो कीं 'भीक नको पण कुत्रें आवर' या म्हणी-प्रमाणें 'न्याय नको पण बोभाटा थांबीव' असें म्हणण्याची पाळी मुलींवर आणि पालकांवर येते. कारण, मुलींच्या संबंधानें समाजांत भलतेंच मत पसरतें आणि त्यांचें कायमचें अनहित होतें. असे कोणी दुरात्मे जर उघडकीस आले तर त्यांचे कोणी कोणी मित्र (!) त्यांची परस्परच खाशी हजेरी घेतात आणि मग त्यांचे हे चाळे बंद पडतात. पण एकंदरीनें पाहतां, उघडकीस येण्याचा प्रकार फार थोडा असतो; आणि मुलींची छळणूक सतत चालू असते. ज्या इंग्रजी शाळेंत मुलां–मुलींना घेण्याची वहिवाट आहे त्या शाळांतसुद्धां हा धूमधडाका चालू असतो आणि कित्येक शाळांचे व्यवस्थापक या बाबतींत अगदीं रंजीस येतात. वर सांगितल्या-प्रमाणें कॉलेजांत हा प्रकार अनिरुद्धपणें चालू असतो आणि तो कसा निकालांत काढावा याचा मार्ग अजून कोणालाही सांपडलेला नाहीं. आपली भावना फलित झाली नाहीं या एका विचारानें दुष्ट बनलेले जीवात्मे इतक्या लहान वयांत सर्वत्रच अशा तऱ्हेनें पिसाळून जातात कीं काय, हा प्रश्न तपासून पाहाण्यासारखा आहे.

आतांच सांगितलेले लोक मुलींना छळण्याचा आणखी एक मार्ग पत्करतात. त्यांचीं लग्नें कोठें जमत आहेत कीं काय या पाळतीवर ते

राहतात आणि नेमक्या वेळेला मुलाकडील माणसांना पोंचतील अशा तऱ्हेची निरर्गल मजकुराचीं पत्रें त्यांना धाडतात. या पत्रांतील वेडावाकडा मजकूर वाचून पालकांच्या मनांत भलभलते विकल्प उत्पन्न होतात आणि हीं पत्रें खोटीं आहेत असें जरी त्यांना कोणीं सांगितलें तरी 'विषाची परीक्षा कोणीं बघावी ?' ही संभावित ढाल पुढें करून जमलेलें लग्न तीं मोडून टाकतात. बरें, मुलींच्या पालकांना तक्रार करण्याची सोय नसते. हा विषय चारचौघांपुढें न्यायासाठीं मांडावा तर त्यांच्याच मुलींचा बोभाटा अधिक अधिक होत जातो आणि दुसरीकडे कोठें जमण्याचा संभव कमी होत जातो. या आपत्तींतून सुटण्यासाठीं ते गप्प बसतात. मुलींची अशी कुचंबणा समाजांतल्या चावट लोकांनीं करावी आणि त्यांचीं जीवितें कष्टमय बनवावीं हा दुष्टपणाचा केवळ कळसच होय. पण असें घडतें यात कांहींच शंका नाहीं. म्हणून सुशिक्षित मुलांना माझें असें सांगणें आहे कीं कॉलेजांतील एकंदर वातावरण जर त्यांच्या पूर्ण परिचयाचें असतें तर लग्न जमण्याच्या वेळीं अपशकुन करणाऱ्या असल्या पत्रांना त्यांनीं भीक घालूं नये. हे पत्रवाले जीं चित्रें रेखाटतात तीं लागू पडणाऱ्या मुली शंभरांत दोनसुद्धां सांपडणार नाहींत. स्वतःची असंतोषवृत्ति आणि चीड हीं व्यक्त करण्याचा एक दुष्ट मार्ग या पोरांनीं पत्करलेला असतो, इतकेंच.

मुलींना प्रतिकार करतां येत नाहीं या गोष्टीचा बेसुमार फायदा कॉलेजच्या जगांतील लोक या किंवा अन्य अनेक तऱ्हांनीं घेत असतात. पण एकाद्या वेळीं तरी हीं अपकृत्यें त्यांच्या अंगावर भिंब्याच्या फुल्यासारखीं उततात आणि मग त्यांच्या फजीतीला पारावार रहात नाहीं. छळणूक दुःसह झाल्यामुळें कांहीं कांहीं वेळां मुलींनीं मोठा तिखट प्रतिकार केल्याचीं उदाहरणें मला माहीत आहेत. एका मोठ्या सार्वजनिक रस्त्यावरून घरीं परत येतांना एका टारग्या विद्यार्थ्यानें तोंडांतून

कांहीं भलतें सलतें काढतांच सायकलवरून उतरून धीट विद्यार्थिनीनें पायांतल्या वहाणेनें भर सडकेवर त्याची पाद्यपूजा केली. अर्थात् एरवींच्या वेळीं त्याच्या वर्तनाचें कौतुक करणारे लोकसुद्धां या प्रसंगीं मुलीच्या बाजूचे झाले, हें सांगावयास नकोच. कॉलेजांतील मुली म्हणजे एक सार्वजनिक उपहासाचा आणि टिंगल करण्याचा विषय आहे असा समज गांवांतील आडमुठ्या लोकांचासुद्धां होऊन बसलेला आहे, आणि याला कारण आमचे विनोदी लेखक, नाटककार आणि सिनेमा-लेखकच होत. त्यांनीं कॉलेजच्या मुलींची येवढी दैना उडविलेली आहे कीं यांच्यांशीं धृष्टपणानें वागलें तर तें खपण्यासारखेंच आहे असा समज सरसकटपणें रूढ झालेला आहे. अशाच एका सायकलवाल्या माणसानें भर सडकेवर जातां जातां एका कॉलेजच्या मुलीला खांद्यानें धक्का दिला. त्याच्या दुर्दैवानें, तो एकदोन हात गेला नाहीं तोंच, पंक्चर झालें आणि त्याला उतरावें लागलें. एवढ्यांत त्या बहाद्दर मुलीनें पुढें होऊन वहाणेचे तीन फटकारे त्या माणसाच्या मुस्कटांत लगावले. भोंवतालच्या माणसांनीं, त्याचा तो चावटपणा पाहिलेला असल्यामुळें, मुलीची वाहवाच केली. आपला जीव जिच्या ठिकाणीं अडकलेला असेल तिची नालस्ती वाङ्मयांत करण्याचा प्रयत्न कोणीं कोणीं करून पाहिला. पण तो अंगाला इतका शेकला कीं असल्या फंदांत पुन्हा आपण पडतांच कामा नये असा या लोकांनीं कानाला खडा लावून घेतला. त्या मुलीनें आपलें ' सतीचें शस्त्र ' च बेसुमार चालविलें. असो. सांगण्याचा हेतू हा कीं कांहीं कांहीं वेळां मुलींच्या ठिकाणीं ही प्रतिकारची बुद्धि उत्पन्न होते, आणि ती सर्वथा समर्थनीय आहे. परंतु सर्वच मुलींना हें साधतें असें नाहीं. त्या केवळ चिणचिण करीत हा जाच सहन करीत असतात. त्या जर नुसत्या ओरडल्या, खेंकसल्या, किंवा तावदारून उठल्या तर या भेकड लोकांच्या हातांपायांतील शक्ति एकदम क्षीण होते; पण दुर्दैव असें कीं त्या निमूटपणें सहन करतात आणि मग हे नाठाळ लोक अधिकच चेका-

ळत जातात. म्हणून मुलींना माझें असें स्पष्ट सांगणें आहे, कीं त्यांनीं उघड प्रतिकाराची बुद्धि जागृत ठेवावी आणि असल्या चावट लोकांना वेळींच फजित करावें.

या कामीं कोल्हापूरचे माजी प्रिन्सिपॉल बाळासाहेब खर्डेकर यांनीं एकदां प्रसिद्धपणें कॉलेजच्या मुलांचा धिक्कार अत्यन्त जाज्वल्य शब्दांनीं केला होता, ही गोष्ट सर्व लोकांनीं ध्यानांत ठेवावयास हवी. मला अशीं कांहीं उदाहरणें माहीत आहेत कीं जेव्हां कॉलेजच्या जबाबदार अधिकाऱ्यांनीं काडकन् पुढें व्हावयास हवें होतें आणि टारग्या पोरांना जरब बसवावयास हवी होती. पण पुष्कळदां हे अधिकारी मेंगेपणानें वागतात आणि आपलें धोरण औदार्याचें आहे असा लटकाच डौल बाळगतात. जबाबदार अधिकाऱ्यांनीं जर सख्त नजर ठेविली आणि वेळच्या वेळीं वाह्यात पोरांना फटकारे देऊन शुद्धीवर आणलें तर कॉलेजचें वातावरण अशा दोषांपासून खरोखरच मुक्त होईल. याच तऱ्हेचे कांहीं सामान्य दोष या प्रसंगीं दाखविणें प्रस्तुताला धरूनच होईल. आपल्या पुढच्या उतरत्या टेबलांवर नाना प्रकारचा मजकूर लिहून ठेवणें, किंवा कांहीं कांहीं विशेष प्रकारचीं चित्रें काढणें व अशा रीतीनें मुलींची बदनामी करणें या उद्योगांतही कांहीं कांहीं विद्यार्थी गढलेले असतात. मुलींच्या बाकाच्या लगत मागें बसावें व त्यांना कांहीं सूक्ष्म उपद्रव द्यावा हा उद्योगही अनेक जण करतात. परंतु विद्यार्थ्यांची एकंदर संख्या लक्षांत घेतां असले बारिक सारिक प्रकार थोडे आणि उपेक्षणीय असतात, असेंच म्हटलें पाहिजे.

परंतु मुलांच्या संबंधानें हें सारें लिहित असतांना मुलींच्याकडे कांहींच दोष नसतो असें मात्र मी कधीं म्हणणार नाहीं. मुलें जास्त दोषी असतात हें खरें आहे; आणि त्यांची छळगूक कित्येकदां उग्र आणि मारक बनते हेंही खरें आहे. पण मुलींची टिंगल करण्याची थोडी जास्त खेळकर आणि बोंचक भावना त्यांच्या मनांत उत्पन्न होण्याला कांहीं कांहीं मुलीं-

चेंही वर्तन कारण होतें. कांहीं मुली फार थिल्लरपणानें वागतात, त्या आपल्या डोळ्यांची चकमक जरा जास्त झाडतात; आणि पुन्हां पुन्हां मागें वळून पाहण्याची खोड कांहीं मुलींना फार लागलेली असते. याचा परिणाम असा होतो कीं कांहीं मुलांची तरी मनें कावरींबावरीं होतात आणि या मुली म्हणजे एक लघळपणाचा विषय आहेत किंवा कसल्याही थट्टेचा विषय आहेत असें त्यांना वाटूं लागतें. मुलींच्या ठिकाणीं नटण्याची बुध्दि जरा जास्त असते हें खरें आहे; आणि हें नटणें पुष्कळ मुलींना शोभूनही दिसतें. पण नटून शोभा वाढविणें निराळें आणि नटून नखरेलपणा करणें निराळें, हें त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. नखरेलपणा हा केव्हांही आणि कोठेंही प्रतिजबाबाची वासना जागृत केल्याशिवाय रहात नाहीं. मानवी स्वभावाचा हा धर्मच आहे. त्यांतही अल्लड स्वभावाच्या मुलांच्या समूहांत हा नखरेलपणा मिरवूं लागला तर त्याला त्याच तऱ्हेचा प्रतिजबाब मिळणें हें ओघानेंच प्राप्त होतें. अशा मुलींची जर कोणी थट्टा–मस्करी केली तर त्याचा दोष बव्हंशीं आपल्याकडेच येतो हें मुलींनीं ओळखलें पाहिजे. अगदीं नैतिक कायद्याप्रमाणें पाहतां कोणी त्यांची अशी मस्करी करूं नये हें खरें असेल. पण मानवी स्वभावाची विशिष्ट परिस्थितींत होणारी चलविचल लक्षांत घेतां, या कामीं केवळ थट्टा करणाऱ्या मुलांनाच दोष देतां येत नाहीं. बरें, नखरेल मुलांची सुध्दां थट्टा मुली आपापल्यांत करीत नाहींत असें थोडेंच आहे? या त्यांच्या थट्टेचा थोडा कानोसा घेऊन पहा. म्हणजे मुली अगदीं इरसाल आणि मासलेवाईक थट्टा करतात असें दिसून येईल. फरक इतकाच कीं, नखरेल, छानछुक, आणि अक्कडबाज मुलांची थट्टा मुली आपापसांत करतात आणि याच जातीच्या मुलींची थट्टा मुलींच्या कानांवर जाईल किंवा दृष्टीस पडेल, अशा पध्दतीनें मुलें करतात. म्हणून ज्यांना मुलांच्या नाठाळपणाची बाधा व्हावयास नको असेल त्यांनीं आपली वेषभूषा, केशभूषा व इतर चालचलणूक हीं युक्त त्या मर्यादेंतच ठेविलीं पाहिजेत. असो.

---

# नैतिक आचरणाचें बीजारोपण ११

वर्गांत शेजारी बसणाऱ्या मुलींच्या रांगा आणि कॉलेजच्या आवारांत फिरणारे त्यांचे घोळके हीं साधारणतः समवयस्क असलेल्या मुलांना फारच मोठें आकर्षण उत्पन्न करतात, ही गोष्ट नाकारण्यांत मतलब नाहीं. ज्या विद्यार्थिवर्गाला या आकर्षणाची एकदां संवय झालेली आहे त्यांना मुलींच्या सहवासावांचून अगदीं चुकल्या–चुकल्यासारखें वाटतें. अर्थात् हा केवळ संवयीचा परिणाम आहे. आजवर जी गोष्ट कधीं घडलेलीच नव्हती, आणि जें आकर्षणाचें सूक्ष्म सुख भोगण्याची संधीच सांपडलेली नव्हती, ती गोष्ट घडली असतां आणि तें आकर्षणाचें सुख लाभूं लागलें असतां, तरुण विद्यार्थ्यांना कांहीं नवलाईचा अनुभव यावा आणि त्यांचीं चित्तें या अनुभवानें कांहींशीं चलित व्हावींत हें त्यांच्या वयाला धरूनच आहे. हा परिणाम केवळ पुरुष–विद्यार्थ्यांवरच होतो, असें मानणें ही चूक आहे. किंबहुना, स्त्री–विद्यार्थ्यांच्या मनांत व शरीरांत यौवनाची कळा लवकर फांकत असल्यामुळें त्यांच्या मनावर तर विद्यार्थ्यांच्या सहचर्यांचा परिणाम अधिकच बलवत्तर होत असला पाहिजे. परंतु झालेला परिणाम व्यक्त करण्याच्या कामीं विद्यार्थी थोडे जास्त अधीर बनतात, किंवा प्रसंगविशेषीं एकादा विद्यार्थी उच्छृंखलही बनतो. मुलींच्या प्रकृतींत जी शालीनता सृष्टीनेंच ठेविली आहे असें वाटतें, तिच्या छापेंत त्या वागत असल्यामुळें मनावर होणारा हा परिणाम त्या सहसा बाहेर दिसूं देत नाहींत.

वास्तविक पाहतां, जर आपलीं कॉलेजें हीं विद्या–मंदिरें आहेत तर त्या ठिकाणीं विद्यार्थ्यांचें मन किंवा विद्यार्थिनींचें मन असल्या

आकर्षणापासून आणि तद्विषयक चिंतनापासून सर्वथा मुक्तच असलें पाहिजे. ज्या कामासाठीं हे दोन्ही जातींचे विद्यार्थी विद्यामंदिरांत प्रवेश करितात, त्या कामांत या साहचर्यामुळें थोडासा तरी व्यत्यय येत असेल, हें सांगावयास कोणा मानसशास्त्रज्ञाची आवश्यकता नाहीं. परंतु या पेंचांतून बाहेर पडणें अवश्य आहे काय व अवश्य असलें तर तें कसें पडतां येईल, याचा निकाल चांगल्या चांगल्या बुद्धिमंतांनासुद्धां अजून करतां आलेला नाहीं. या परस्पर आकर्षणाचे दुष्परिणाम जर उभयतांच्या वर्तनावर, विशेषतः त्यांच्या अभ्यासांतील प्रगतीवर व शरीरावर होत आहेत असें कांहीं संशोधनानें दिसूं लागलें, तर मात्र हा प्रश्न सोडविण्याचा उपक्रम त्वरेनेंच करावा लागेल. परंतु सध्यां तरी अशा तऱ्हेचें संशोधन कोणी केलें आहे असें मला वाटत नाहीं. माझें स्वतःचें मत असें झालें आहे कीं अभ्यासावर किंवा शरीरावर वाईट परिणाम झाले नसावे आणि जर कोठें वर्तनावर झाले असले तर ते इतके अल्प आहेत कीं कॉलेजांत न येणाऱ्या याच वयाच्या मुलांमुलींच्या ठिकाणीं जो उच्छृंखलपणा दिसून येत असतो त्यापेक्षां जास्त या ठिकाणीं क्वचितच दिसून येत नाहीं. कॉलेजच्या मुलांच्या प्रकृतीविषयीं मीं मागें लिहिलेंच आहे; आणि अभ्यासाकडे पहावें तर परीक्षांचे निकाल पूर्वीच्याप्रमाणें आतांही चांगले लागत असतात असें दिसून येईल.

शिवाय, मला तर असें वाटतें कीं अभ्यासाच्या क्षेत्रांत मुलींशीं स्पर्धा उत्पन्न झाल्यामुळें स्वाभिमानाची एक सूक्ष्म जागृति मुलांच्या मनांत अभ्यासाच्या कामीं उत्पन्न होते. हाहि एक इष्ट असाच परिणाम आहे. मागें एका लेखांत सांगितल्याप्रमाणें पालकांनीं गृहशिक्षण ही संस्था जर आपापल्या घरांत पुनरुज्जीवित केली आणि आपल्याला पसंत असलेलीं मतें, आग्रह, आणि वर्तनाचे नियम हे जर लहानपणापासून मुलांमुलींच्या मनावर आरूढ करण्याची अवश्य ती तत्परता दाखविली, तर कॉलेजांत

जमणाऱ्या मुलांमुलींच्या साहचर्याचे परिणाम लोकांना वाटतें तितके विपरीत होणार नाहींत. पण जर पालक अगदीं बेफिकीर राहिले, "आतां हे मोठे झाले आहेत, त्यांना सर्व कळतच आहे" असला संभावित औदार्याचा विचार ते मनाशीं बाळगून बसले, तर मात्र या कामीं त्यांची फसगतच होईल यांत कांहीं शंका नाहीं. ही फसगत झाली तर त्याचा दोष मी मुलांमुलींच्याकडे कधींही देणार नाहीं. तो दोष पालकांचा आहे असेंच मी समजेन.

विशेषत: पुरुष–विद्यार्थ्यांच्या मनाची चलबिचल किती तीव्र होते हें ध्यानांत येण्याचे अनेक प्रसंग या विद्येच्या मंदिरांत घडून येतात. ते पाहिले म्हणजे वडिलधाऱ्या माणसांना आणि त्यांतल्या त्यांत समंजस विद्यार्थ्यांना मनापासून वाईट वाटतें. जी टवाळी, ज्या वल्गना एकेका विद्यार्थ्यानें केव्हांहि केल्या नसत्या, त्या विद्यार्थ्यांचे जमाव बेलाशक करतात असें दिसून येतें. कॉलेजच्या सभागृहांत एकादी मोटी सभा असली आणि आपल्या जागेवर येऊन बसण्यासाठीं विद्यार्थीनींचा एकादा मोठा ताफा सभागृहांत आला तर विद्यार्थी–समूहांतून कसला तरी उपहासाचा अथवा व्रात्यपणाचा घोष उठतो. जें प्रत्यक्ष घडून येतें तेंच मी सांगत आहें. एकादी विद्यार्थिनी वादविवाद सभेंत बोलावयास उठली तर तिची टर करण्याची प्रवृत्ति विद्यार्थी क्वचितच दाखवितात. विद्यार्थी जर दुसऱ्या मजल्यावर बसलेले असले आणि विद्यार्थिनी पहिल्या मजल्यावर बसलेल्या असल्या तर कागदाचे चिमण्या–कावळे करून विद्यार्थिनींच्या अंगावर फेकण्यांत ते कसलीहि शरम बाळगीत नाहींत. कागदाचे गोटे करून किंवा बारीकबारीक कपटे करून त्यांच्या अंगावर झोंकून देणें आणि सर्वांनीं मिळून फिदी फिदी हंसणें यांत विद्यार्थ्यांच्या कित्येक समूहांना कांहीं शरमेची गोष्ट आहे असें बिलकूल वाटत नाहीं. पुष्कळदां कॉलेजचे अधिकारी हे लोकप्रियतेच्या नादीं लागून या गोष्टींकडे काणाडोळा करतात; किंवा 'तरुण लोक आहेत, असें

चालायचेंच ' असा कांहीं लटक्या औदार्याचा आविष्कार कौतुकाच्या हास्यानें करून गप्प बसतात. परंतु आपला प्रस्तुतचा मुद्दा लक्षांत घेतां विद्यार्थ्यांच्या मनाची ही चलबिचल लक्षांत घेण्यासारखी असते यांत कांहींच शंका नाहीं. मात्र ही गोष्ट मला फार अगत्यपूर्वक सांगितली पाहिजे कीं, विद्यार्थ्यांचे कांहीं गट या उच्छृंखलपणाला कधींहि प्रवृत्त होत नाहींत, एवढेंच कीं, त्यांचें अस्तित्व जितकें भासमान होतें त्यापेक्षां दसपट त्यांच्या उच्छृंखल मित्रांचें होतें हेंहि सांगितलें पाहिजे.

विद्यार्थिनींचे खेळ सुरू झाले म्हणजे ते बघावयास विद्यार्थ्यांची गर्दी तुफान लोटते, हेंही ध्यानांत घेण्यासारखें आहे. पण खेळ जर उघड उघड पटांगणांत होत असतात तर ते बघावयास जाणें यांत विद्यार्थ्यांचें कांहींच चुकत नाहीं; आणि ते त्यांनीं पहावयास यावें अशी विद्यार्थिनींचीही इच्छा असते. परंतु खेळ चालू असतांना गर्दीच्या पोटांत प्रच्छन्न राहून तेथून शेलक्या मुलींची कुचाळी करण्याचा मोह अनेक विद्यार्थी दाखवितात, हेंही सर्वांना माहीत झालेलें आहे. खेळ पहावयास जाणें, कांहीं विशेष घडलें तर खेळणाऱ्या मुलींची वाहवा करणें यांत कांहींच गैर नाहीं. आणि हेंही ज्या मुलींना व पालकांना नको असेल त्या मुलींनीं कॉलेजांत येऊं नये व पालकांनीं त्यांना पाठवूं नये. परंतु वाहवा करणें निराळें आणि आतांच सांगितल्याप्रमाणें गुप्तपणानें कुचाळी करणें निराळें, हें सर्वांनींच ओळखलें पाहिजे. मी चलबिचल म्हणतों ती हीच होय.

संमेलनाच्या प्रसंगीं तर ही चलबिचल पराकाष्ठेला पोहोचते. संमेलन म्हणण्यापेक्षां तो एक हैदोसाचाच प्रसंग असतो असेंच वाटल्याशिवाय रहात नाहीं; आणि त्या प्रसंगीं कोणाचें कांहीं चालत नाहीं. मुलींनीं रंग-भूमीवर येऊन कांहीं कार्यक्रम केले तर ते चार लोकांप्रमाणें पहाणें आणि आपली पसंती किंवा नापसंती सौम्य किंवा भडक मार्गांनीं व्यक्त करणें यांतही कांहीं चुकेल असें वाटत नाहीं. परंतु केवळ मुलीच पुढें येऊन उभ्या

राहिल्या एवढ्यामुळेंच बेहोष होऊन हैदोस घालणारे विद्यार्थी किती तरी असतात. संमेलनाच्या प्रसंगीं अजून पुण्याकडे तरी मुलांमुलींचीं संमिश्र नाटकें होत नाहींत. मुलांचें नाटक निराळें होतें आणि मुलींचें नाटक निराळें होतें. पण मुलींच्या नाटकाच्या वेळीं विद्यार्थी जो हैदोस घालतात तो केवळ तिरस्करणीयच होय. या संमेलनाच्या प्रसंगींच 'फिश्पाँड' नांवाचा, मूळांत मनोरंजक टीकेचा व गमतीचा म्हणून योजलेला, एक प्रयोग असतो. परंतु सर्व कॉलेजांतील चालकांच्या हें ध्यानांत येऊन चुकलें असेल कीं हा प्रयोग आतां बंद करण्याच्याच लायकीचा उरला आहे. यांतील गंमत शब्दाचा अर्थ 'शाब्दिक स्वेच्छाचार' असा झाला आहे आणि मनरंजनाचा अर्थ 'खवचट टवाळी' असा बनला आहे. ज्या मानसिक चलबिचलीचें विवेचन मी करीत आहें, तिचाच हाही एक आविष्कार आहे.

परंतु या ठिकाणीं, कॉलेजांतील प्राध्यापकांच्या संबंधानें सुद्धां मला थोडें लिहिलें पाहिजे. मुलें तर काय बोलून-चालून मुलेंच असतात. त्यांना सगळाच प्रकार नवीन असल्यामुळें आणि त्यांच्या अंगांतील यौवनाची ऊर्मि अजून त्यांच्या स्वतःच्याच ओळखीची झालेली नसल्यामुळें त्यांच्या हातून कांही प्रमाद होतही असतील. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, वयानें आणि शिक्षणानें ज्यांना चांगला प्रौढपणा प्राप्त झालेला आहे, आणि तो झालेला नसला तरी आपल्या दर्जाची जाणीव ज्यांना उत्पन्न व्हावयास हवी, त्या प्राध्यापकांपैकीं कांहीं कांहीं लोक आपला दर्जा सोडून वागतात, असें म्हणणें भाग आहे. त्यांच्या बाबतींत हा मुलींच्या साहचर्याचा मोह कित्येकदां दुर्निवार ठरतो. मुलींच्या नाटकाच्यावेळीं रंगपटांत ज्या प्राध्यापकांचें कसलेंही काम नाहीं ते तेथें अनेकदां लुडबुड करतांना दिसतील! संभावितपणा, कोठेंही जाण्याचा आपला अधिकार, आणि लाव्हसटपण, यांचा एक चमत्कारिक काला यांच्या मनांत झालेला असतो आणि तो त्यांना झांकूनही ठेवतां येत नाहीं. विद्यार्थी झाले काय, किंवा

विद्यार्थिनी झाल्या काय, त्यांना हा सर्व प्रकार कळून चुकतो; आणि त्यांच्या मनांत दोन विकल्प उत्पन्न होतात. शिक्षकाचा पेशा चालविणाऱ्या लोकांनीं असें खालीं उतरावें हें त्यांना बिलकूल आवडत नाहीं. या लघळपणानें ते आपल्या दर्जाचा अवमान करतात असें मुलां–मुलींना वाटतें आणि मनांतून ते त्यांचा तिरस्कार करूं लागतात; आणि दुसरें म्हणजे तरुण लोकांच्या या कारभारांत या भलत्याच लोकांनीं शिरकाव करून घेण्याचा प्रयत्न कां करावा अशी एक तीव्र मत्सराची बारीक लकेर या दोनही प्रकारच्या विद्यार्थ्यांच्या मनांतून चमकून जाते. कॉलेजच्या जीवनाचें चित्रण मी करीत असल्यामुळें याही गोष्टीचा उल्लेख करणें ओघानेंच प्राप्त होतें.

स्त्री विद्यार्थ्यांना मला एक इशारत द्यावयाची आहे. ती मीं दिली म्हणून माझ्यावर कोणाचा त्रुस्सा झाला किंवा मला कोणी मागसलेला म्हटलें तर पूर्ण विचारान्तीं ते ते लोकच दोषी ठरतील, मी नव्हें. स्त्रियांना स्वातंत्र्य प्राप्त झालें आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे. परंतु या स्वतंत्र्यतेचा उपभोग कोठवर आणि कसकसा घ्यावयाचा याचा विचार मात्र तरुण मुलींनीं अवश्य करावयास हवा. जिकडे तिकडे सर्व स्थिरस्थावर आहे, सर्व माणसें उदार विचारांचीं आहेत, सुरक्षितता आणि सचोटी हीं सर्वत्र भरून राहिलीं आहेत, अशा कल्पनेनें बहुतेक सुशिक्षित मुली समाजांत वावरत असतात. त्यांनीं ध्यानांत ठेवावयास हवें कीं, हा त्यांचा केवळ भ्रम आहे. एका अंगाला केवळ लडिवाळपणा, निरागस वृत्ति, वात्सल्यजन्य उद्दामपणा आणि सामाजिक औदार्याची अपेक्षा यांचा व्यापार चालू असतां, दुसरीकडे अभिलाष, कामुकपणा, यौवनाची आक्रमकता इत्यादि गुणांचा व्यापार पुष्कळदां चालू असतो. मुलींना वाटतो तितका सुरक्षितपणा जगाच्या वहिवाटींत सध्यां तरी खास नाहीं. ज्यांनीं सार्वजनिक व्यवहारांतील हालचालींचें बारिक अवलोकन केलें असेल त्यांना मी काय म्हणतों याचें मर्म सहज कळून येईल.

विशेषतः बाजारांत स्वैरपणें हिंडणाऱ्या कॉलेजकर मुलींच्यासंबंधानें कानावर येणारे प्रलाप आणि त्यांच्याशीं दुकानादिकांत देण्याघेण्याचे व्यवहार चालू असतां त्या त्या ठिकाणच्या लोकांच्या ठिकाणीं दिसून येणारी बुद्धि हीं पाहिलीं म्हणजे, विद्यार्थिनींनीं आपली चालचालणूक अशा ठिकाणीं तरी फारच मर्यादेची आणि आटोपशीर ठेवावयास हवी, असें कोणालाही वाटेल. ज्या तुमच्या वर्तणुकीचा अर्थ केवळ मनमोकळेपणा असा तुम्ही करतां तिचा केवळ तोच अर्थ आहे आणि दुसरा कोणताही नाहीं हें उमगण्याची कुवत अखिल समाजाला आलेली आहे, असें समजणें अगदीं चूक आहे. कोणी कितीही वेदांत सांगितला तरी संस्कृतीच्या निरनिराळ्या परी आणि विकासाचीं वेगवेगळीं स्तबकें या समाजांत आहेत. सर्व समाजाला सरूपता प्राप्त झाली आहे, म्हणजे हा समाज केवळ एकस्वरूप बनलेला असें समजणें म्हणजे शुद्ध भ्रांतपणा आहे. निरनिराळ्या जातींतील सुशिक्षित आणि विचारी मुलींना तुम्ही हा प्रश्न विचारलांत तर त्या हेंच उत्तर देतील कीं एकरूपता धरून चालणें पुष्कळदां धोक्याचें ठरेल.

या कामांत पालकही दोषी असतात. आपल्या मुली शिकल्या आहेत, त्यांना स्वातंत्र्य लाभतें आहे, पूर्वीच्या काळांतील त्यांचें दास्य नाहींसें होऊन त्या मोकळपणानें हंसत खेळत आहेत हें पाहून कोणाही पित्याच्या मनांत वात्सल्यपर आनंदाची ऊर्मी उठल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु याची मर्यादा कोणची, आणि धोक्याची निशाणी कोठें आहे याकडे याच वात्सल्याच्या भरांत कोणीही दुर्लक्ष करतां कामा नये. हा विषय मला अधिक विस्तारानें सांगतां आला असता; परंतु परवांच एका श्रेष्ठ मित्रानें मला निरोप धाडला कीं, सध्यां खरें बोलण्याचे दिवस नाहींत. कोणच्या लिहिण्यावरून लोक कोणची तोहमत घेतील आणि लोक कशांत अवमान मानतील याचा धरबंधच उरलेला नाहीं. तो निरोप मला समयोचित वाटतो. नाहींतर ऋजुता, प्रेमळपणा, मनमोकळेपणा, अथवा प्रांजलपणा यांची निरनिराळ्या संगति

विशेषांत कशीं चमत्कारिक रूपांतरें होतात आणि मुलींच्या जीवनाला कसा धोका पोंचतो याचीं उदाहरणें मीं सहज दिलीं असतीं. परंतु थोडें बोललेलें असलें तरी पुष्कळ समजावें हा जो रसिकांच्या मनाचा मुख्य धर्म आहे त्याचाच अवलंब, वरील इशारत वाचतांना, निदान विद्यार्थिनींनीं तरी करावा असें त्यांना माझें सांगणें आहे.

कॉलेजांतील निरनिराळ्या संस्था चालविणें हें विद्यार्थ्यांचेंच काम असतें; आणि शिक्षणाच्या दृष्टीनें या बारक्या बारक्या संस्था त्यांनींच चालविल्या पाहिजेत. या चालविण्याच्या कामीं आपण दक्ष असतांहि प्राध्यापक लोक किंवा कॉलेजचा अधिकारी–वर्ग नाहीं त्या ठिकाणीं हस्तक्षेप करतो, असें विद्यार्थ्यांना नेहमींच वाटतें. परंतु आपण अजून शिक्षण घेत आहों, परिपूर्ण झालेले नव्हों, याकडे विद्यार्थ्यांचें लक्ष जात नाहीं. विद्यार्थ्यांची सर्व तऱ्हेची तयारी करून देणें याचेंच नांव जर 'शिक्षण' हें असेल आणि हें जर विद्यार्थ्यांना प्राप्त करून घ्यावयाचें आहे तर हा हस्तक्षेप त्यांनीं अवश्य म्हणून पत्करला पाहिजे. पण पुष्कळदां असें होतें कीं हस्तक्षेप व्हावा किंवा नाहीं या मुद्यावर तितकेंसें न फिसकटतां, तो करणाराच्या अरेरावीनें, उर्मटपणानें, किंवा दंडेलीनें काम जास्त बिनसतें असें दिसून येतें. विद्यार्थ्यांच्या मनाशीं आपल्या मनाचा मिलाफ करून घेणें ही एक अलौकिक कला आहे. अथवा ही एक कला असण्यापेक्षां हा एक मनाचा स्वाभाविक धर्म आहे. तो ज्याला लाभला असेल त्याच्याशीं विद्यार्थी वर्दळीवर येणें अशक्य आहे. विद्यार्थी बहुधा मनमोकळे असतात, विनोदी असतात; आणि त्यांचीं मनें उल्हासानें आणि जीविताचीं नवींनवीं अंगें प्रस्फुट होत चालल्याच्या आनंदानें भारलेलीं असतात. त्यांच्या संगतींत येणारा प्राध्यापक ममत्वबुद्धि बाळगणारा आणि समरस होणारा असला पाहिजे. विद्यार्थ्यांचे मनोधर्म जर त्याच्या ध्यानांत येत नसले तर त्याच्या हातून फार मोठाल्या चुका होतील. आपणच कोणी

'गोमाजी' आहों आणि या पोरांना आतां वापरून घ्यावयाचें आहे, अशा ऐटीनें जो कोणी बारीक बारीक संस्था चालविण्यासाठीं विद्यार्थ्यांच्या समित्यांत शिरेल, त्याची फजीती झाल्याशिवाय राहणार नाहीं. सह-कार्याला आणि सामरस्याच्या आनंदाला विद्यार्थी भुकेलेले असतात. म्हणून हस्तक्षेप करूनही, तो खरा खरा हस्तक्षेप नाहीं, असें प्राध्यापकानें आपल्या विद्यार्थ्यांना पटवून दिलें पाहिजे. विद्यार्थ्यांइतका शिकावयास उत्सुक, वागावयास सरळ आणि स्नेहसंबंधांत प्रेमळ असा माणूस सहसा आढळावयाचा नाहीं. परंतु या कामीं विद्यार्थ्यांच्या हातून एक फार चमत्कारिक चूक कित्येकदां होते. ती दाखवून देणें आणि ती न व्हावी म्हणून त्यांना इशारा देणें हें मी माझें कर्तव्यच समजतों.

हातांत पैसा आला असतां तो खाण्याची बुद्धि विद्यार्थ्यांमध्यें उत्पन्न होते, हें कॉलेजांतील विद्यार्थ्यांना कबूल करावें लागेल. प्रपंचांत पडलेले, गरीबीनें गांजलेले, व्यसनी बनलेले, किंवा नीतिविचाराला निगरगट्ट बनलेले, अशा लोकांनीं पैसे खाल्ले तर त्याचा आपल्या मनावर जो परिणाम होतो त्यापेक्षां अधिक दुःखद परिणाम विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं दिसून येणाऱ्या या प्रवृत्तीनें होतो. हातीं आलेले क्लबचे पैसे खाण्यांत कांहींच गुन्हा नाहीं आणि तेवढ्या सहामाहींत किंवा चौमाहींत एका सुंदरशा कोटाचा खर्च परस्पर भागविण्यांत एक कौतुकाचें भूषणच आहे, असें मानण्यापर्यंत अनेक विद्यार्थ्यांची मजल जाते! अगोदर पैसे खाणें हें वाईट आहे आणि त्यांत सूक्ष्म भूषण मानणें हें तर त्याहूनही वाईट आहे. पण हा प्रकार घडतो यांत कसलाही संदेह नाहीं. मात्र अशा विद्यार्थ्यांना एकदम दूर ढकलण्याला मी तयार नाहीं. त्यांना बदमाष म्हणून मनांत एक शिवी देऊन त्यांना कायमचें दूर लोटण्याचें पातक कोणाही प्राध्यापकानें करूं नये. हे विद्यार्थी कोंवळ्या मनाचे असतात, त्यांना अनुभव नसतो, मोहांची आणि त्यांची गांठ प्रथमच पडलेली असते, या गोष्टींकडे

प्राध्यापकांनीं आणि संस्थांच्या चालकांनीं लक्ष देणें अवश्य आहे. सर्व संस्कारांनीं, अनुभवांनीं आणि शिक्षणानें परिपूर्ण झालेल्या माणसाला जे न्याय आपण लावतों तेच न्याय या वयाच्या मुलांमुलींना लागू करणें अगदीं चूक आहे. त्यांचीं मनें अजून बनावाच्या स्थितींत असतात आणि म्हणून नीतिविचारांची जागृति आपण त्या ठिकाणीं उत्पन्न केली तर हीं मुलें या दुर्वर्तनापासून तटकन् मागें सरतील, अशी माझी खात्री आहे.

या कामीं जितकें लक्ष घालावयास हवें असतें तितकें जबाबदार अधिकारी घालीत नाहींत. खर्च-वेंचाचा तपशील पुन्हांपुन्हां पाहणें, मुलें सामानसुमान कोठून आणतात, दुकानदारांशीं ते कसल्या अटी ठरवितात, खेळाच्या कामीं खाद्य-पेयांची किती किंमतीची बरसात ते करतात, जेवणाच्या क्लबांसाठीं सामानाची खरेदी कोणाच्या हस्तें होते, स्वयंपाकी लोकांवर कोणी नजर ठेवतें कीं नाहीं, इतका माल घेतल्यामुळें घेणाराला जो वर्तावळा मिळतो तो कोठें जातो, याची चौकशी करणें आणि त्यावर सक्त नजर ठेवणें हें कॉलेजच्या अधिकाऱ्यांचें कामच आहे. " आम्ही विद्यार्थी प्रौढ झालों आहों तर आमच्या कामांत आतां तुम्ही कां लक्ष घालतां ? " असें विद्यार्थ्यांनीं म्हणतां कामा नये. हा प्रश्न हक्काचा नाहीं; तर संस्था चालविण्याचें शिक्षण विद्यार्थ्यांना देण्याचा आहे आणि हें शिक्षण चालू असतां आपल्या शिष्यांवर नजर ठेवावी हें प्राध्यापकांचें व अधिकाऱ्यांचें कामच आहे. विद्यार्थ्यांनीं ध्यानांत घ्यावयास हवें कीं, आपलें वय फसण्याचेंच असतें; आणि त्यांच्या पालकांचीही इच्छा निःसंशय अशीच असते कीं, मोह उत्पन्न होण्यासारख्या कामांत या वयांत आपल्या मुलांना कोणी घालूं नये. परंतु कॉलेज ही जर एक शिक्षणाची संस्था आहे तर अभ्यास, खेळ इत्यादींचें शिक्षण त्यांना जसें तेथें मिळतें तसेंच बारीक बारीक संस्था चालविण्याचें मिळालें पाहिजे. पण जर विद्यार्थी फसावयास नको असतील आणि पालकांच्या मनाला काळजी लागावयास

नको असेल, तर दायित्व संभाळणाऱ्या प्राध्यापकांनीं आणि अधिकाऱ्यांनीं विद्यार्थ्यांच्या या कामावर सहानुभूतिपूर्ण पण करडी नजर ठेविलीच पाहिजे.

नांवाचा उल्लेख करणें हें उचित दिसणार नाहीं, पण मला एका रेक्टरचें असें उदाहरण माहीत आहे कीं, ज्यानें जेवणाचे क्लब चालविण्याच्या कामीं स्वतः मन घातल्याबरोबर प्रत्येक मुलाचा मासिक अन्नखर्च जवळजवळ निम्यावर येऊन ठेपला ! क्लब चालविणाऱ्या मुलांना त्यांनीं दाखवून दिलें कीं, तुमच्या अंमलाखालीं चोरा–चोरी फार होते, हयगय फार होते, आणि क्वचित् प्रसंगीं तुम्ही स्वतःही सार्वजनिक पैशाचा अपहार करतां ! हेंच उदाहरण जर सतत आणि सर्व ठिकाणीं चालू राहिलें तर विद्यार्थ्यांची दानत बनविल्याचें श्रेय कॉलेजच्या रेक्टर लोकांना मिळत जाईल आणि, वयाच्या योग्य वेळीं आपल्या प्राध्यापकांनीं आपल्याला चांगली वाट दाखविली, असे उद्गार हेच विद्यार्थी मोठेपणीं काढतील. जे कोणी कॉलेजच्या आवारांत वागलेले नाहींत त्यांना कदाचित् असें वाटेल कीं, मी या गोष्टीला अवास्तव महत्व देत आहें. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. अनेक संस्था विद्यार्थ्यांना चालवाव्या लागतात आणि 'पैसा हबकणें' हें एक मोठें कौतुकाचें आणि कौशल्याचें काम आहे आणि यांत कसल्याही प्रकारची भ्रष्टता पदरीं येत नाहीं, अशी एक वेडी कल्पना अनेक विद्यार्थ्यांच्या मनांत वावरत असते. तिचा निचरा करणें आणि विद्यार्थ्यांचीं मनें नीतिदृष्ट्या खंबीर बनविणें हें अवश्य असल्यामुळें विद्यार्थी–जीवनाच्या चित्रणांत या विषयाला फार महत्त्व आहे असें मी समजतों.

---

# लष्करी शिक्षणांतील धोक्याची जागा  १२

कॉलेजांतील मुलांना सैनिकी शिक्षण द्यावें यासाठीं कॉलेजांचीं 'ट्रेनिंग कोर' काढलेलीं असतात. प्रत्येक 'कोर' मध्यें प्रत्येक कॉलेजचे दोन-अडीचशें विद्यार्थी तरी असतात. खरें म्हटलें म्हणजे, दोनदोन हजार विद्यार्थ्यांच्या कॉलेजमधून दोन अडीचशें विद्यार्थीच या सैनिकी तुकडींत शिरावे याचें नवल वाटतें. ज्या वेळेस सुशिक्षित लोकांना सरकार सैन्यांत घेत नव्हतें त्यावेळीं आपण त्या सरकारच्या विरुद्ध ओरड करीत होतों. परंतु दर कॉलेजांत आतां ती सोय झालेली असतांना सुद्धां इतक्या थोड्या लोकांनीं या सोयीचा उपयोग करून घ्यावा हें कांहींसें नाउमेदकारकच आहे. विद्यार्थ्यांची शरीरप्रकृति सुदृढ रहावी म्हणून सक्तीचा व्यायाम करून घेण्याची व्यवस्था युनिव्हर्सिटीनें केलेली आहे, परंतु केवळ व्यायामाच्या पलीकडे जाऊन सैनिकी शिक्षणाची व्यवस्था करणें हें अवश्य होतें, आणि आतां ती झालेलीहि आहे. पण व्यायामाची सक्ति केली म्हणून विद्यार्थी जर जळफळतात तर केवळ खुषीनें ज्या लष्करी तुकडींत शिरावयाचें तिचा उपयोग ते कितीसा करून घेतील हें दिसतच आहे. आतां स्वराज्य आलें आहे तर प्रसंगीं सर्वांनाच लष्करी शिक्षणाची सक्ति लागू होणार आहे. अर्थातच कॉलेजमधील सर्व तरुण लोकांना हें शिक्षण घ्यावें लागेल. कोणाला बरें वाटो, वाईट वाटो, प्रकृति धडधाकट होण्याला हा एक उत्कृष्ट इलाज ठरेल, यांत कांहींच शंका नाहीं. प्रत्यक्ष लढाईचा योग जेव्हां केव्हां यावयाचा असेल तेव्हां येईल, पण या सक्तीचा प्रकृतीवर होणारा अनुकूल परिणाम हा मात्र विद्यार्थ्यांच्या पदरांत कायमचा पडेल.

सध्यांचें खुशीचें लष्करी शिक्षण आणि पुढें येणारें सक्तीचें लष्करी शिक्षण यांच्या दरम्यान फार दिवस जातील, असें आजपर्यंत वाटत असे.

या कामीं कांहीं दिरंगाई होईल कीं काय, ही आजवर वाटणारी भीति आतां अजिबात नष्ट होत आहे. हलके हलके कॉलेजांतील सर्वच मुलांवर ही सक्ति सुरू होईल आणि सध्यां दोन अडीचशें मुलांची जी एकादी लहानशी तुकडी प्रत्येक कॉलेजांत दृष्टीस पडते तिच्या ऐवजीं, हजार हजार, दोनदोन हजार विद्यार्थ्यांची एक छोटीशी पलटणच दर कॉलेजांत उभी राहिली आहे, असें दिसूं लागेल. नव्या काळाला अनुसरून पडणारा हा फरक सर्व विद्यार्थ्यांनीं आणि पालकांनीं केवळ स्वागतार्हच समजला पाहिजे. आपलें संरक्षण लोकांनीं करावें, हा विचार प्रत्येकाला दुःसह वाटला पाहिजे; आणि शिवाय स्वदेशाच्या संरक्षणाची जबाबदारी आपण अंशतः तरी उचलली पाहिजे, ही वासना जर प्रत्येकाच्या मनांत असते तर ती तृप्त करण्याची पात्रता प्रत्येकाच्या अंगांत यावयास हवी. या दृष्टीनें पाहातां हें आवश्यक बनत असलेलें सैनिकी शिक्षण सर्व लोकांनीं बाहू उभारून पत्करलें पाहिजे.

या शिक्षणाचें स्वागत करतांना एका गोष्टीकडे आवर्जून लक्ष दिलें पाहिजे. मागल्या अनुभवाचा फायदा पुढें होण्यासारखा असतो म्हणून, कांहीं वर्षांपूर्वी घडून आलेल्या एका प्रकाराचा उच्चार मी या ठिकाणीं प्रकटपणें करतों. हा प्रकार घडला त्यावेळीं कॉंग्रेससरकार पहिल्यानेंच अधिकारावर आलेलें होतें आणि डॉ. गिल्डर हेच तेव्हांचेहि अबकारी खात्याचे मंत्री होते. शाळा कॉलेजांत मिळून माझ्या ओळखीचे विद्यार्थी फार; आणि त्यांच्यांतील अनेकांशीं माझा दृढ परिचय असे. मीं केलेल्या अनेक लहानमोठ्या सामाजिक चळवळींत आणि खटपटींत मला या विद्यार्थ्यांचेंच मोठें साह्य झालेलें आहे. त्यांच्यांतील शेंकडों लोक माझ्याशीं अगदीं मनमोकळेपणानें बोलतात; आणि त्यामुळें त्यांच्या जीवितांतील बारीकसारीक खांचाखोंचा मला बऱ्या प्रकारें माहीत झालेल्या असतात. त्यांच्यांतील कांहीं लोकांकडे पाहिलें, किंवा त्यांचीं हितगुजें ऐकलीं, म्हणजे

मला असें वाटे कीं ह्या लष्करी शिक्षण घ्यावयास गेलेल्या विद्यार्थ्यांत दारू पिण्याची संवय हळुहळू फैलावत आहे. व्यसनाचें एक गमतीचें लक्षण असें आहे कीं, सहजासहजीं केलेल्याची, संवय केव्हां बनते आणि संवयीचें व्यसन केव्हां होतें, याची दादच माणसाला लागत नाहीं ! आणि यांत कोणी कोणावर सक्ति करण्याचीहि जरूरी नसते ! शिष्टाचार म्हणून, वेळेला वाईट दिसेल म्हणून, अथवा अधिकाऱ्यांची मर्जी जाईल म्हणून, असले कांहीं कांहीं प्रकार नव्या माणसांना प्रथम करावे लागतात. चारचौघांत बसलें असतांना ' नाहीं ' म्हणणें वाईट दिसतें, अशी संकोचाची सबब किती तरी लोकांच्या तोंडून ऐकूं येते. आणि त्यांतहि या चारचौघांत आपलेच अधिकारी किंवा श्रेष्ठी बसलेले असले आणि तेहि त्या 'सामरस्यांत' सामील होत असले तर ' नाहीं ' म्हणण्याचा निर्भिडपणा फार थोड्या लोकांना दाखवितां येतो.

असें होतां होतां पहिले संस्कृतीचे पाश हळुहळू तुटूं लागतात, मनाचे चावे बंद पडतात; एके काळीं नवखा असल्यामुळें असल्या लोकांच्या संगतींत बुजऱ्यासारखा वागणारा हा पोरसवदा शिपाई लवकरच निगरगट्ट बनतो; आणि आपण करतों यांत विशेष कांहींच नाहीं असें तो मानूं लागतो. मी ज्या काळची ही हकिकत सांगत आहे त्याला फार दिवस झाले आहेत असें नाहीं. पण ' बियर ' हें सौम्य नांव धारण करून नवीन मुलांना व्यसनाकडे ओढीत नेणारें एक मादक पेय या लष्करी लोकांत चांगलें प्रिय झालेलें होतें. प्रत्यक्ष फौजेंत तर या पेयाला फार झालें तर पाण्याचीच किंमत मिळत असेल. जेथें प्रत्यक्ष शराब वाटेल तितकी ढोसून पुनः कांहींच झालें नाहीं असें म्हणणारे लोक असतात, तेथें या 'बियर'ची मातब्बरी किती ? पण नवथर पोरांना आणि कवळ्या शिपायांना ही बियर म्हणजे सुद्धां एक डाकिणीची बोलावणेंकरीणच असते. सचोटीचे आणि निर्मलत्वाचे ढंग दाखवून ती या मुलांना ओढीत ओढीत त्या माजऱ्या

पेयाकडे नेते, असा नेहमींचा अनुभव आहे. माझ्या ओळखीच्या विद्यार्थ्यांत या विषयासंबंधानें बरीच गुणगुण असे; आणि म्हणून मीं तिचा छडा लावण्याचें ठरविलें.

चांगल्या घराण्यांत जन्मलेल्या आणि वाढलेल्या पांच विद्यार्थ्यांनीं माझ्यापाशीं कबूली दिली कीं, आम्ही हा प्रकार केव्हां केव्हां केलेला आहे. आणि प्रसंगच आला तर केवळ या विषयाची परिस्फुटता व्हावी म्हणून, वाटेल त्या जबाबदार माणसापुढें या गोष्टीची वाच्यता आम्ही निर्भयपणें करूं. अभ्यासांत हुषार, आणि संभावित घराण्यांत वाढलेल्या मुलांच्याकडून एवढें आश्वासन मिळाल्यानंतर या विषयाचा पिच्छाच पुरविण्याचें मी ठरविलें. त्यांच्या माहितीप्रमाणें, हें व्यसन चरत चाललें होतें; आणि कांहीं अंशीं याला त्यांचे गुरूजनच जबाबदार असत. मग या दिशेनें बरीचशी चौकशी करून मी नामदार गिल्डर यांच्याकडे या बाबतींत सरळ सरळ तक्रार केली, आणि 'लष्करी शिक्षण मिळावें म्हणून मुलाला U. T. C. मध्यें घालावें आणि तेथें तो व्यसनी बनावा ही आपत्ति अनेक पालकांवर येत आहे, तर आपण याची चौकशी करावी व हा प्रकार बंद पाडावा' अशी विनंति त्यांस केली. एक महिनापर्यंत मला त्यांच्याकडून कांहींच कळलें नाहीं. पण एके दिवशीं आमच्या कॉलेजच्या प्रिन्सिपॉलसाहेबांकडून मला तांतडीनें बोलावणें आलें. मी ना० गिल्डर यांजकडे केलेल्या तक्रारीविषयींची माहिती त्यांनीं मला विचारली. अर्थात् बोलण्यावरून बोलणें निघालें आणि त्यांनींहि अनेक गोष्टी सांगितल्या. त्या ऐकल्यानंतर माझी खात्री होऊन चुकली कीं, आपण तक्रार केली हें फारच बरें झालें. त्यांनींही या कामीं माझें अभिनंदनच केलें. पण ज्या अर्थीं हें 'कोर' युनिव्हर्सिटीच्या द्वारां सुरू झालेलें आहे त्याअर्थीं ही तक्रार युनिव्हर्सिटीकडे व्हावयास हवी होती, असें त्यांचें म्हणणें पडलें. तथापि ना० गिल्डर हे अबकारी मंत्री असल्यामुळें चौकशीचें गिरमीट त्यांच्या-

कडून एकदम सुरू झालें; आणि तें येतां येतां पुण्याच्या कलेक्टरकडे आलें व तिकडून तें प्रिन्सिपालसाहेब यांच्याकडे आले. मग आमच्या सुशिक्षित वर्गांत या विषयाला आपोआपच थोडेंसें तोंड फुटलें.

दरम्यान कलेक्टरसाहेब यांच्याकडून तें प्रकरण अबकारी खात्याच्या प्रादेशिक इन्स्पेक्टरांकडे आलें: आणि हे इन्स्पेक्टर स्वतःच चौकशीसाठीं माझ्या घरीं आले! ते सरकारी अधिकारी असल्यामुळें संभाषणांत त्यांनीं प्रथम प्रथम माझ्याशीं अटीतटीचें बोलणें सुरू केलें, आणि कलेक्टरसाहेब यांचें-हि नांव त्यांनीं खर्चीं घातलें. " U. T. C. च्या तळावर दारू पुरविण्यांत येते किंवा मंडळी दारू पितात, असा आरोप तुम्ही केला आहे; तर तुमच्यापाशीं पुरावा काय आहे ?", असें हे इन्स्पेक्टरसाहेब मला विचारूं लागले. मी त्यांना सांगितलें कीं, " माझ्या कानावर अशी अशी माहिती आलेली आहे; माझी खात्री होईल इतपत पुरावा मला मिळालेला आहे; म्हणून ती गोष्ट मीं ना० गिल्डर यांच्या कानावर तक्काररूपानें घातली आहे. तुम्ही माझ्या-पाशीं पुरावा काय म्हणून मागतां ? प्रजेला तक्कार करण्याचा हक्क नाहीं कीं काय ? तुम्ही इन्स्पेक्टर आहां. तुम्ही चौकशी करा आणि, पुरावा बिलकूल सांपडत नसल्यास, माटे यांना लागलेली माहिती चुकीची आहे, असें ना० मंत्र्यांना कळवा. पण तुम्हांला पुरावा देण्याला मी मुळींच बांधलेला नाहीं." मी वर सांगितलेंच आहे कीं, घरंदाजांचीं पांच चांगलीं मुलें माझ्यासाठीं जबाब देण्याला तयार होतींच. पण त्यांचीं नांवें वाटेल त्या ठिकाणीं खर्चीं घालावयास मी तयार नव्हतों. शिवाय, त्या ठिकाणीं दारू देण्यांत येते कीं नाहीं हें, तेथील मक्तेदाराकडे थोडी बारीक चौकशी केली किंवा थोडीशी जरब दिली म्हणजे, इन्स्पेक्टर यांना सहज कळल्या-सारखें होतें. माझ्याकडून पुरावा मिळण्यासारखा नाहीं, पण मी तक्कार मात्र मागें घ्यावयास तयार नाहीं, हें पाहून अबकारीचे इन्स्पेक्टरसाहेब निघून गेले. आणि मग एक निराळाच प्रकार घडून आला.

दोनचार दिवसांनीं रात्रींच्या वेळीं एक चांगलासा पोषाख केलेला परसमाजांतील गोरापान गृहस्थ माझ्याकडे आला. आंत आल्यावर तो माझ्या पायां पडला. मी एकदमच मागें सरलों; कारण माणूस चांगला संभावित, श्रीमंत, आणि नीटनेटका दिसला. तो मला म्हणाला, " आपण अशा अशा कामांत कांहीं तक्रार केली आहे ना ? " हा त्याचा प्रश्न ऐकून हा कोण असावा याची कल्पना मला एकदमच आली. तो मला आर्जवानें म्हणूं लागला कीं, " आपण केलेली तक्रार परत घ्या; नाहीं तर या कामीं माझा नाश आहे. " केलेली तक्रार परत घेणें हें मला अर्थातच शक्य नव्हतें. तसें केलें असतें तर मीच खोटा ठरलों असतों. म्हणून मी त्याला स्वच्छ सांगितलें कीं, " आपण मला भलतीच गळ घालूं नये. मी स्वतःला समाजांतला एक जबाबदार माणूस समजतों. आणि म्हणून पूर्ण चौकशी करूनच जर मीं ही तक्रार केली आहे तर ती मीं काय म्हणून परत घ्यावी ? " हा गृहस्थ अगदीं रंजीस आला आणि म्हणाला, " पण आपण एवढें तरी करा कीं, पोलिसांनीं पुरावा मागितला तर तो तुम्ही देऊं नका. तुम्ही जर पुरावा दिलांत तर माझें मरण ओढवलें म्हणून समजा. " त्याचा हाहि मुद्दा मला पटेना. मी त्याला सांगितलें कीं, " मी आपण होऊन हा पुरावा कोणापुढें मांडणार नाहीं. पण पुराव्याच्या अभावीं तुमची तक्रारच खोटी आहे, आणि केवळ कंड्यांवर अवलंबून तुम्ही ही तक्रार केली आहे, असें जर मला मिनिस्टर म्हणूं लागले तर पांच चांगल्या घरंदाज मुलांच्या साक्षी दिल्याशिवाय मी रहाणार नाहीं. नाहीं तर माझ्यावरच ही खिलामत येईल. म्हणून तुमचें हेंहि म्हणणें मला मान्य करतां येत नाहीं. " आलेला गृहस्थ अगदीं गयवया करूं लागला तेव्हां मीं म्हटलें कीं, " तुमचा नाश व्हावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. पण आमचीं मुलें जर दारू पिऊं लागलीं तर मला त्यांना या आपत्तींतून सोडविलें पाहिजे. " तो म्हणाला, " आमचा कांहीं इलाज चालत नाहीं. सुशिक्षितांतलेच चांगले शहाणेसुरते लोक पितात आणि मग त्यांचें पाहून

तरणीं पोरेंहि पिऊं लागतात. मग आम्हांला कोणालाच 'नाहीं' म्हणतां येत नाहीं. वास्तविक पाहतां कायद्याप्रमाणें हें अगदीं चूक आहे. परंतु हा प्रकार घडतो हें मात्र खरें आहे." हा त्याचा कबुलीजबाब ऐकून आपली बाजू अगदीं बळकट आहे हें माझ्या ध्यानांत आलें. आणि त्याला थोडें चमकावून मी सांगितलें कीं, "माझी तक्रार खरी आहे हें तुमच्याच तोंडून सिद्ध झालेलें आहे." नाइलाज होऊन हा गृहस्थ निघून गेला.

पांच चार दिवस झाले; आणि बरोबर दहादहा, बाराबारा वर्षांचे दोन सुकुमार मुलगे घेऊन हा गृहस्थ पुनः माझ्या घरीं रात्रींच्या वेळींच आला. त्यानें हे मुलगे माझ्या पायावर घातल्यासारखे केले; आणि माझ्या वात्सल्यबुद्धीला आवाहन करून तो म्हणाला, "या मुलांकडे लक्ष देऊन तरी आपण मला वांचविलें पाहिजे. कारण, तुम्ही जर का पुरावा दिलांत तर हें प्रकरण माझ्या अंगांशीं येईल; आणि यांत माझें आणि माझ्या पोरांचें मरण आहे." माझ्या चित्ताला पाझर फोडण्याचा या गृहस्थानें योजलेला हा इलाज खरोखरच फार समर्पक होता. परंतु या त्याच्या इलाजाला वश होऊन आपला मुद्दा सोडणें मला धोक्याचें होतें. अतिशय कनवाळू-पणानें मी त्याला सांगितलें कीं, "तुम्ही असे गयवया करूं नका. माझा कटाक्ष तुमच्यावर नाहीं. तुमचीं हीं गोजिरवाणी मुलें नेहमीं सुखी आणि सुरक्षित राहावीं असें मला वाटतें. पण आमचीं मुलें दारुडीं होऊं नयेत असें मात्र माझें मत आहे. म्हणून मी तक्रार परत घेणार नाहीं. माझ्या-वरच संकट येऊं लागलें तर मात्र मला पुरावा देणें भाग पडेल. तुम्ही एवढें समजून राहा कीं, मी जरी हा पुरावा दिला तरी, मंत्रीसाहेबांनीं यापुढें ही आगळीक चालूं देऊं नये एवढीच विनंति मी त्यांना करीन. होत असलेली गोष्ट दंडनीय असली तरी ती करणाराला शिक्षा व्हावी असें म्हणण्यांत माझें कांहींच हित नाहीं. म्हणून यापुढें तरी हा प्रकार अजिबात बंद व्हावा एवढा आग्रह मी त्यांच्यापाशीं धरीन." या माझ्या बोलण्यानें

या गृहस्थाला थोडेंसें समाधान वाटलें. आणि मग एकमेकांना सलाम करून आम्ही आपली मुलाखत संपविली.

मला वाटतच होतें कीं, हें चौकशीचें चक्र आतां फिरत राहाणार आहे; आणि त्याप्रमाणें तें फिरत राहिलेंहि. फिरतां फिरतां तें खुद्द शिबिर-वाल्या मंडळींतहि जाऊन पोंचलें. आणि मग माझ्या नांवाचा पुष्कळच गवगवा झाला. परंतु हें प्रकरण तडीस जाण्याच्या आंतच आणि त्याचें लोण माझ्याकडे पुनः परत येण्याच्या पूर्वींच काँग्रेसचें मंत्रिमंडळ राज्य-कारभाराला कंटाळून अरण्यांत अथवा आडरानांत निघून गेलें; आणि हें 'सुरामारीचें' प्रकरण तेथेंच स्थगित झालें. इंग्रज सरकारचें राज्य बुडालें आहे आणि आतां तें शिबिर, ती तक्रार, तो मक्तेवाला, हे सारे प्रकार आपण विसरले पाहिजेत.

परंतु आतां लष्करी शिक्षणाची धुमश्चक्री जोरानें चालू व्हावयाची आहे. आणि निरनिराळ्या संस्कृतींचीं माणसें या सैन्यांत दाखल व्हाव-याचीं आहेत. गेल्या महायुद्धांत लष्करी पेशाला विशेष प्रकारची तेजी चढलेली आहे; आणि अनेक जातींचे, धर्मांचे, आणि संस्कृतींचे लोक एकत्र बसाउठावयास शिकले आहेत. लष्करची नोकरी किंवा लष्करी पेशा म्हणजे नेहमींच्या ठराविक यमनियमांना थोडा गुंगारा दिला तरी चालतो, किंबहुना सैन्यांतील लोकांचा तो हक्कच आहे, असें मानण्याची प्रवृत्ति लष्करच्या लोकांत बळावत चाललेली असते, हें चाणाक्ष निरीक्षकांच्या ध्यानांत आलेंच असेल. आपण इतर लोकांहून कांहीं निराळे आहों, आणि कदाचित् आपल्या हातून पुढेंमागें होणाऱ्या अघटित कृत्याची किंवा बलिदानाची परतफेड म्हणून समाजानें आपल्या बाबतींत बरीचशी साळ-ढाळ वृत्ति ठेवली पाहिजे, आणि आपल्या वर्तनाकडे त्यानें एवढ्या कांटे-कोरपणानें पाहतां कामा नये, अशी एक सूक्ष्म जाणीव अथवा अहंतासुद्धां या तरुण लोकांच्या मनांत उत्पन्न झालेली असते. हीच अहंता वाढतां

वाढतां हक्कांची कल्पना घेऊन उठते आणि मागें एके ठिकाणीं सांगितलेला निगरगट्टपणा किंवा कोडगेपणा लष्करांतील व्यसनी माणसांना प्राप्त होतो. कांहीं वर्षांपूर्वीं, म्हणजे जेव्हां काँग्रेसचें सरकार पहिल्यानें अधिकारावर आले तेव्हां, त्याच्या दरबारी यमानियमांचा, व्रतस्थपणाचा, आणि शुध्दाशुध्दतेचा मोठा आग्रह असे. आणि तो फार युक्त होता असें माझें मत आहे. पण तेव्हांपासून आतांपर्यंत या सरकारच्या मनाच्या ठेवणींत पुष्कळच फरक पडलेला दिसतो. पूर्वीचा आग्रह आणि तो नियमांकितपणा सध्यांच्या सरकारला टिकवून धरतां येईल असें वाटत नाहीं. आणि लष्करांतील व्यसनाकडे तें पूर्वीच्या इतक्याच कडकपणानें पाहात रहाणार नाहीं असें दिसतें.

यांत एक मोठी चमत्कारिक भर पडलेली आहे. या परवांच्या युद्धानें नीतिविचाराचे पाये डळमळावयास लाविले आहेत, आणि लष्कर म्हटलें म्हणजे एवढ्या खाराखिरीनें पाहण्याची जागा नव्हे, असें सर्वांसच वाटावयास लागलें आहे. आपण जास्त रासवट बनलों आहोंत, आणि संस्कृतिमिश्रणांत एक निराळीच लज्जत आहे, असें आपण मानूं लागलों आहोंत. या स्थित्यंतराचा परिणाम आतां तरुण मुलांचीं जीं सैन्यें बनावयाचीं आहेत त्यांच्यावर झाल्याशिवाय राहणार नाहीं, असा बळकट धाक वाटतो. काँग्रेससरकारनें अर्थातच दारूबंदी केलेली आहे; या बंदीची व्याप्ती अवश्य त्या मर्यादेपर्यंत आणि प्रत्येक ठिकाणीं नेऊन पोंचाविली पाहिजे; तशी ती नेऊन पोंचविण्याची सक्त खबरदारी काँग्रेससरकार घेईल याविषयीं मला शंका नाहीं. पण सर्व पालकांनीं आणि कॉलेजच्या चालकांनींही या बाबतींत सावध असलें पाहिजे; नाहीं तर एकीकडे सैनिकी शिक्षण मिळत आहे म्हणून आम्हांला फुशारकी वाटूं लागेल, आणि दुसरीकडे घरादाराचा होम करणारें एक घाणेरडें व्यसन प्रत्येकाच्या घरांत शिरेल! सार्वजनिक जीवितांत निरनिराळ्या संस्कृतींचा एकंकार

होणें अपरिहार्य आहे हें मी ओळखतों; आणि म्हणूनच खुद्द मुलांनीं, पालकांनीं, आणि कॉलेजच्या चालकांनीं या गोष्टीवर जाणूनबुजून भर दिला पाहिजे. आपण या गोष्टीचा बभ्रा करावयास भितों. जीवितांत कांहीं एक पडदपोशी असावी हें मलाहि मान्य आहे. समाजांत एकादें पाप, एकादा अनीतीचा आचार हा अमुक एका प्रमाणांत नेहमीं चालू राहणारच राहणार; कारण माणसाची जात प्रकृतितः त्या बाजूला प्रवणच असते. परंतु पाप किंवा अनीतीचा विचार हीं नेहमीं लपत छपत चालतात, आणि चारचौघांत यावयास बिचकतात. पण ज्यावेळीं ही संकोचवृत्ति सोडून ते निगरगट्ट बनतात आणि व्यसन हेंच वैभव मानितात, त्यावेळेस त्यांची पडदपोशी संभाळणें आणि तिचा फायदा त्यांना घेऊं देणें हें बिलकुल इष्ट नाहीं. तो पडदा फाडून टाकून व्यसनासक्त माणसांना चव्हाट्यावर ओढणें हें योग्यच ठरतें. या दृष्टीनें पाहतां आपलीं मुलें फौजेंत गेलीं म्हणून व्यसनी होत आहेत कीं काय, हें करडेपणानें पाहणें पालकांचें आणि शिक्षणसंस्थांच्या चालकांचें कामच आहे.

या कामीं सैन्यांत शिरणाऱ्या प्राध्यापकवर्गावर फारच मोठी जबाबदारी आहे. त्यांनीं स्वतः या संपर्कापासून अगदीं अलिप्त राहिलें पाहिजे. पण या विषयाची चर्चा पुरी करावयाची तर मला सांगितलें पाहिजे कीं, सर्वच प्राध्यापक या कामीं दक्ष राहतात असें वाटत नाहीं. लष्करी जीवनाचा हा एक हक्कच आहे, असा तेहि आपला समज करून घेतात; आणि मग 'गाईच्या मागें वासरूं' या न्यायानें कोंवळीं मुलें भलत्याच फंदांत सांपडतात, हें खरें कीं खोटें हें ज्यानें त्यानें प्रामाणिकपणानें सांगावें, निदान मनाशीं विवंचून पाहावें आणि मग त्यांनीं मला दोष द्यावा. आपलीं मुलें चांगल्यांच्या संगतींत आहेत असेंच पालकांना वाटत असतें. पालकांनीं आपल्यावर टाकलेल्या या विश्वासाला आपण सर्वथा पात्र आहोंत, असेंच प्राध्यापकवर्गानें दाखविलें पाहिजे. पण दुर्दैवाची

गोष्ट ही कीं, लष्करातील तळाचें बाजूस राहो, पण लोकांचीं मुलेंमुली बरोबर घेऊन सहलीस गेलेले असतांना कित्येक प्राध्यापक या कामीं चुका करतात, हें अनेकांच्या नजरेस आलेलें आहे. त्यांनीं किती जरी दाबादाबी केली आणि तोंड चुकविलें तरी विद्यार्थ्यांना सगळें कळतें. कारण या पदार्थांच्या अंगीं आपली कीर्ति चोंहोकडे पसरविण्याचा एक चमत्कारिक गुण आहे ! ही व्यसनाची चोरटी प्रवृत्ति सार्वत्रिक आहे असें मला दुरूनसुध्दां सुचवावयाचें नाहीं. पण एरवीं मोठे संभावित दिसणारे लोक अशा फंदांत सांपडलेले आहेत, हें मुलामुलींच्या पुष्कळदां ध्यानांत येतें; आणि मग गुरुजन म्हणजे काय याचा निवाडा हे विद्यार्थी तावडतोबच करतात ! खासगी जीवनांत जर हा प्रकार, तर लष्करांत गेल्याबरोबर या व्यसनाचा साखसुरत अवलंब हा आपला हक्कच आहे, असें यांच्यापैकीं बऱ्याच लोकांना वाटूं लागावें हें अगदीं खरें आहे. म्हणून, जर आपलीं मुलें यांच्या छापेंत वागावयाचीं आहेत, तर पालकांनीं व शिक्षणसंस्थांच्या चालकांनीं या बाबतींत तक्षकासारखें दक्ष असावयास हवें.

या लेखांत एका अत्यंत अप्रिय विषयाची चर्चा मीं केलेली आहे. कारण सैनिकीकरणाचा जोर जों जों वाढूं लागेल तों तों हें व्यसनहि त्याच्याबरोबर समाजांत शिरूं लागेल आणि निलाजरेपणानें व उजळ माथ्यानें तें वागूं लागेल अशी धास्ती वाटते.

---

# शाकाहार व मांसाहार १३

कॉलेजचे विद्यार्थी हे एन्. सी. सी. मध्यें जावे हें जरी अत्यवश्य असलें तरी त्यांनीं व्यसनाधीन होऊं नये म्हणून शिक्षणसंस्थांच्या अधि-काऱ्यांनीं आणि त्यांच्या पालकांनीं कशी दक्षता बाळगावयास हवी यासंबंधीचें विवेचन मागील लेखांत केलें आहे. व्यसनरूपानें नव्हे पण एक अपरिचित आचार म्हणून विद्यार्थिवर्गांत कांहीं अंशानें पसरत चाललेल्या दुसऱ्या एका प्रकारासंबंधानें या लेखांत लिहावयाचें योजिलें आहे.

असें सांगतात कीं मांसाशनाचा सवय विद्यार्थ्यांत पसरत चालली आहे. या बाबतींतील माझे विचार कोणाला प्रतिगामी स्वरूपाचे वाटले तरी हरकत नाहीं. पुरोगामी आणि प्रतिगामी यांच्या व्याख्या ठर-विण्याचें काम कांहीं ठराविक लोकांनीं जोंपर्यंत आपल्या हातीं ठेविलें आहे तोंपर्यंत त्या व्याख्यांना कसलीहि किंमत देतां येत नाहीं. मात्र या कामीं सामान्य स्वरूपाचें लिहून भागण्यासारखें नाहीं. तत्त्ववाद, सारा-सार–विवेक, निरनिराळ्या लोकांचे आहारविहार, परस्परांच्या आचा-रांविषयींचा आदरभाव इत्यादि अनेक विचार लक्षांत घेऊनच या बाबीचा खल केला पाहिजे. कॉलेजांत जाणारे विद्यार्थी कांहीं थोड्या वर्षांपूर्वींपर्यंत केवळ पांढरपेशा वर्गांतीलच असत; आणि त्यांतल्यात्यांत ब्राह्मण वर्गांती-लच असत. दक्षिणी ब्राह्मणसमाज हा परंपरेप्रमाणें पाहतां मांसनिवृत्त आहे. अर्थातच कॉलेजांत जाणारे विद्यार्थी बहुतेक सारे मांसनिवृत्तच असत. आतां शिक्षणाचा प्रसार पुष्कळच झाल्यानें मांसाशन करणाऱ्या जातींतून शेंकडो विद्यार्थी कॉलेजांत दाखल होत आहेत. अर्थातच कॉलेजांतील विद्यार्थी-वर्गांत तशा प्रकारचा आहार करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढत आहे.

आपल्याकडील सर्वच लोकांच्या बाबतींत असें एक विधान करतां येण्यासारखें आहे कीं, वनस्पत्याहार हाच सर्वांचा मुख्य आहार आहे; म्हणजे त्यावर सर्वांचें भागतें. आणि म्हणून कॉलेजांतील वसतिगृहांत बहुधा जी भोजनाची व्यवस्था केलेली असते तीहि शाकाहाराचीच असते. एकाद्या कॉलेजांत मांसाशनाची व्यवस्था केलेली असणें अगदीं शक्य आहे. याचा परिणाम एका निराळ्या तऱ्हेनें दृष्टीस पडतो. ज्या विद्यार्थ्यांना मधून मधून कां होईना, पण मांसाशन करणें घरच्या पद्धतीप्रमाणें अवश्य वाटतें त्यांची, वर सांगितलेल्या पद्धतीमुळें, व्हावी तशी सोय न झाल्यानें, शहरांत ज्या उपहार–गृहांत ती व्यवस्था केलेली असते तेथें जाणें त्यांना भागच पडतें. मांसाशन करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या जों जों वाढत जाईल तों तों आपल्या वसतिगृहांतच आमची हीहि व्यवस्था व्हावयास हवी असें ते म्हणूं लागतील आणि कॉलेजच्या चालकांना तशी निराळी व्यवस्था करावी लागेल. कारण मांसाशन हा कांहीं लोकांना जरी निषिद्ध आचार असला तरी कांहीं लोकांत तो मान्य आणि संभावित आचार आहे. आणि म्हणून, विद्यार्थ्यांची संख्या पुरेशी झाली तर आणि त्यांचें मत आग्रही बनलें तर कॉलेजच्या चालकांना ही व्यवस्था करावी लागेल. सध्यां मात्र असें होत आहे कीं, आपल्या मूळ आचाराप्रमाणें अधूनमधून तरी या आहारासाठीं त्यांना शहरांतील उपाहारगृहांत जावें लागतें. पण यामुळें असा एक समज बळावत चालला आहे कीं कॉलेजांतील सरसकट विद्यार्थ्यांत मांसाशनाची संवय वाढत चालली आहे. ती संवय लागत चालली आहे हें विधान मला अमान्य करावयाचें नाहीं. पण त्या संवयीचें प्रमाण लोक समजतात तितकें मोठें नसलें पाहिजे, एवढेंच माझें म्हणणें आहे. ‘ कॉलेजचे विद्यार्थी ’ या शब्दसंहतीला जुन्या काळचा मोजका अर्थ आतां उरलेला नाहीं. त्यांत मांसाशन करणाऱ्या जातींचेहि शेंकडो विद्यार्थी अन्तर्भूत होतात, या गोष्टीकडे ज्या लोकांचें लक्ष पुरेसें जात नाहीं ते लोक असें सांगतात कीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांत मांसाशनाचा फार प्रसार होत आहे.

आतां प्रमाणाच्या बाबतींत जरी ही चूक होत असली तरी मूळ विधानांत सत्याचा अंश आहे हें आपणांसहि मान्य करावयास हवें आणि तो सत्यांश लक्षांत घेऊनच पुढील विवेचन मी करीत आहें. जात–पात, आहारविहार इत्यादि बाबतींत कांहीं बोलावयाचें म्हणजे भारी कठीण होऊन बसलें आहे. एकाद्या गोष्टीचा शुद्ध तात्त्विक बुद्धीनें विचार करण्याची व तो ऐकण्याची संवय आपल्याला जितकी लागावयास हवी तितकी अजून लागलेली नाहीं. त्यामुळें शुद्ध तात्त्विक विवेचन म्हणजे काय, आणि परस्परांच्या सामाजिक तुलनेचा प्रयत्न म्हणजे काय, याचा निवाडा होत नाहीं. तात्त्विक विवेचनास प्रवृत्त व्हावें तों आपली प्रतिष्ठा वाढवावयास आपण निघालों आहोंत असा दोष पदरीं येतो. म्हणून मला एकदां वाटलें होतें कीं या विषयावर लिहूंच नये. पण जर कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या जीवनाचें सर्वांगीण निरीक्षण मी करीत आहें तर उपस्थित झालेला हा प्रश्न मी त्यांतून वगळावा हें बरोबर होणार नाहीं हें लक्षांत घेऊनच मी या विवेचनास प्रवृत्त होत आहें. मांसाशन करणाऱ्या जातींतील माझ्या शेंकडो तरुण मित्रांना आणि त्यांच्या पालकांना मी अत्यंत सचोटीनें सांगतों कीं शुद्ध तात्त्विक दृष्टीनें, संस्कृतीच्या एका अंगाचें विवेचन मी करीत आहें. यांत कोणाला कांहीं दूषण लावावें, कोणाला कमी लेखावें किंवा कोणाच्या भावना दुखवाव्या असा माझा यत्किंचितहि हेतु नाहीं. पृथ्वीवरील बहुतेक सारे लोक मांसाशन करणारेच आहेत. हिंदुस्थानांतच व हिंदुसमाजांतच वनस्पत्याहाराचा महिमा थोडा जास्त आहे. अर्थात् जो प्रघात सर्व जगताला लागू आहे, त्याच्यासंबंधानें तुच्छतेनें किंवा अवहेलनेनें बोलण्याची मला थोडीसुद्धां इच्छा नाहीं; व म्हणूनच वर मी त्या आचाराला मान्य व संभावित आचार असें म्हटलें आहे. पण जर समाजांतील कांहीं जातींच्या लोकांना शाकाहाराचा महिमा विशेष वाटत असला तर तो प्रघात संभाळण्यासाठीं त्यांनीं आपल्या मुलांना त्या प्रघातासंबंधानें चार महत्वाच्या गोष्टी सांगितल्या

तर त्यांत गैर काय आहे? ज्यांना त्याचें महत्व इतकेंसें वाटत नाहीं त्यांनीं ही बाब बिनमहत्त्वाची म्हणून विचारांतून सोडून देणें हेंच त्यांच्या दृष्टीनें बरोबर ठरेल.

फार प्राचीन काळीं सर्वच लोक मांसाशन करीत असत. रामायण, महाभारत, मनुस्मृत्यादि स्मृतिग्रंथ, आणि पुराणें यांतील यमनियम आणि कथा हीं वाचलीं म्हणजे असें दिसून येतें कीं ब्राह्मणांसकट सर्वच जाती पूर्वीं एकदां मांसाशन करीत असत. आपण कदाचित् सुरू केलेल्या मांसाशनाच्या प्रघाताला ज्यांना आधार हवा असतो किंवा मांसनिवृत्त लोकांना थोडेसें लावून बोलावयाचें असतें, त्यांना वर सांगितलेल्या ग्रंथांतील उल्लेख म्हणजे मोठे आधारासारखेच वाटतात. चांगलेचांगले लोक या कामीं वैचारिक चूक करतात असें मला वाटतें. पूर्वीं एकदां मांसाशन करीत असलेल्या कांहीं जाती पुढें मांसाशन करीनाशा झाल्या, हा महत्त्वाचा मुद्दा आहे. त्या मांसाशन करीत असत हा मुद्दा तितका महत्त्वाचा नाहीं. अहिंसेचें तत्त्व हिंदुसमाजांत आचाररूपानें केव्हां रूढ झालें हें मला आज निश्चयानें सांगतां यावयाचें नाहीं. पण पूर्वीं एकदां तें रूढ नव्हतें व पुढें तें रूढ झालें ही गोष्ट मात्र इतिहासाला धरून आहे. हें तत्त्व आर्यधर्मांतील प्राचीन ऋषींनीं मुळांत रुजविलेलें असून बुद्धानें त्याची वाढ केलेली असो किंवा बुद्धानें स्वतःच त्याचें बीजारोपण केलेलें असो, पण तें तत्त्व हिंदुसमाजांत बळ धरून राहिलें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. वाढतां वाढतां त्या तत्त्वानें आपल्या सर्व सामाजिक व्यवहारांचें आक्रमण केलें आणि त्याची जी कांहीं किंमत देणें भाग पडलें ती आपण दिली असें इतिहासकारांचें मत आहे. अर्थात् ज्या ठिकाणीं ही गैरसोय दिसून आली, त्या ठिकाणीं या तत्त्वाला मान राहिला नाहीं; पण जेथें ही गैरसोय वाटत नव्हती, तेथें मात्र या तत्त्वाचा अंमल चालूच राहिला. याचा अर्थ असा कीं, ज्यांचे व्यवसाय सौम्य स्वरूपाचे होते ते मांसनिवृत्तच राहिले,

आणि ज्यांचे उग्र व आक्रमक स्वरूपाचे होते ते मांसाशनी बनले. आणि या दोनहि परंपरा, एकमेकींशीं कसलाहि दावा न मांडतां, प्रत्येकीच्या अंगीं असलेले गुणावगुण ओळखून, मित्रभावानें एकत्र नांदत आल्या आहेत.

या कामीं आणखी एक बारीकसा विचार लक्षांत घ्यावयास हवा. मांसनिवृत्तीच्या बुडाशीं अहिंसा, भूतदया अशासारखीं उदात्त तत्त्वें असल्यामुळें तिचा महिमा मांसाशन करणाऱ्या लोकांनींहि प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या मान्य केलेला दिसतो. महाभारतांत मांसाशन करणाऱ्या राम, कृष्ण इत्यादि अनेक राजांचीं नांवें दिलीं आहेत व पुढें म्हटलें आहे कीं हे राजे चतुर्मासांत मांसाशन करीत नसत. यावरून तत्कालीन मताचा कल दिसून येतो. दुसरीहि एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. देवांचें रूप पावलेल्या याच राम–कृष्णांची जे पूजा करतात आणि विष्णूचीं विविध रूपें पूजितात त्यांतील कित्येक जाति स्वतः मांसाशन करीत असल्या तरी आपल्या देवांना नैवेद्य दाखविण्याच्या वेळीं त्या केवळ शाकाहारी पदार्थांचाच उपयोग करतात. देवापुढें काय नेऊन ठेवावें याविषयींची त्यांची कल्पना कोणतें रूप पावली होती हें यावरून दिसून येईल. वर जो मताचा कल म्हणून म्हटला आहे तो हाच. आणखीहि एक गमतीचें गमक सांगतां येण्यासारखें आहे. उत्तर हिंदुस्थानांतील, इतकेंच काय पण खुद्द नेपाळांतील, अनेक प्रसिद्ध देवळांत देवाच्या पूजेसाठीं दक्षिणी ब्राह्मणांचीं कुळें नेऊन ठेवलेलीं असतात! यांतलें मर्महि हेंच आहे. दक्षिणी ब्राह्मण मांसनिवृत्त असतो आणि म्हणून पूजेच्या कामाला तो जास्त लायक आहे, हेंच मत त्या त्या ठिकाणीं रूढ असलें पाहिजे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. लोकांनीं मांसनिवृत्ति ही त्यांतल्यात्यांत अधिक चांगली मानिली, याचें कारण सहज कळण्यासारखें आहे. आपण भूतदया इत्यादि शब्द योजतों, परंतु आपल्या हरएक तऱ्हेच्या व्यवहारांत या भूतदयेचा अंमल आपण कोठें चालूं देतों आणि कोठें चालूं देत नाहीं हें पाहणें पुष्कळच

मनोरंजक असतें. मांसनिवृत्त लोक सर्वच ठिकाणीं सदय असतात असें मानणें अर्थातच अगदीं चूक आहे; आणि मांसाशन करणारे लोक अदय होत असें समजणें हा तर केवळ गुन्हाच आहे. तात्पर्य इतकेंच आहे कीं, भूतदया या गुणाला कोणी एके ठिकाणीं महत्त्व देतो, तर दुसरा कोणी दुसऱ्या ठिकाणीं महत्त्व देतो. जो मनुष्य व्रतवैकल्य करीत असेल आणि आहारविहारांत फारच हळुवारपणानें वागत असेल, तो आपल्या टांग्यांच्या घोड्याला कदाचित् फडाफड मारीत असेल; आणि ज्याचा आहारविहार याहून निराळा आहे तो आपल्या घोड्याला खराऱ्यानें खाजवून, धुऊन, आणि त्याची मालिस्ती करून सुखी ठेवीत असेल. म्हणून यासंबंधानें परस्परांविषयींची कांहीं अवास्तव कल्पना बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. मात्र मनुष्याच्या सांस्कृतिक वाढींतील हा एक टप्पा आहे, हें सूक्ष्म विचार करणाऱ्या सर्व लोकांना मान्य करावें लागेल.

युरोप खंडातील कांहीं कांहीं श्रेष्ठ लोकांनीं, या विषयाचा विचार करून आपल्या आहारांत बदल केला, आणि ते वनस्पत्याहारी बनले असें इतिहासावरून दिसून येतें. थिऑसॉफिकल सोसायटीच्या वाङ्मयांत अशा कित्येक श्रेष्ठ लोकांची केलेली यादी वाचल्याचें स्मरतें. परंतु या विषयांत फार खोल गेल्यानें मानापमानाचे प्रश्न उपस्थित होण्याचा संभव फार आहे. आणि सध्यांच्या या चलबिचलीच्या स्थितींत कुणाला कशाचा अवमान वाटेल हें एकदम ध्यानांत येत नाहीं. म्हणून दिग्दर्शनापुरतें मीं सध्यां येथें लिहिलें आहे. माझें असें मत आहे कीं आपल्या घरांत जर परंपरेनें शाकाहाराची चाल चालू असली तर ती बदलण्याचें कारण कोणाला प्रायः आढळणार नाहीं. बहुधा जें होतें तें हें कीं शिष्टाचार म्हणून, चार चौघांत नाहीं म्हणणें वाईट दिसतें म्हणून, मूळचा आचार सोडावासा वाटतो. हिंदुसमाजांत कितीतरी जाती अशा आहेत व कितीतरी पंथ असे आहेत कीं ज्यांतील लोकांनीं वनस्पत्याहारच चालू

ठेवलेला आहे. त्यांतील तरुण लोकांना, आतांच सांगितल्यासारख्या, कांहीं मानीव अडचणी उत्पन्न झाल्या तरी त्या त्यांनीं दूर सारल्या पाहिजेत, आणि मूळच्या आचाराला चिकटून राहिलें पाहिजे. इतकेंच दाखविला म्हणजे सोय होऊं शकते आणि आतां जगभर पदार्थांची ने–आण इतकी सुलभ आणि विपुल झाली आहे कीं, हा आचार सोडण्याची आवश्यकता सहसा कोठेंहि भासणार नाहीं. त्यांतूनहि परदेशची कायमची बस्ती, तेथील हवामानाचा विचार, युद्धासारखे अकल्पित प्रसंग यांचा विचार करतां, अगतिक बनलें असतां कसें वागावें याची निराळी शिफारस करण्याचें कारण नाहीं. पण त्या प्रश्नाचा आणि कॉलेजांतील विद्यार्थ्यांचा कोठेंच संबंध येत नाहीं. म्हणून भावी अडचणी आजच मनाशीं कल्पून आपल्या आचारांतून बाहेर पडण्याची उत्सुकता त्यांनीं दाखविणें हें माझ्या मतानें अत्यन्त गैर आहे. तर समाजांतील ज्या वनस्पत्याहारी सांप्रदायांतील विद्यार्थी कॉलेजचें शिक्षण घेत असतील त्यांनीं आपली परंपरा सोडूं नये अशी त्यांस आग्रहाची विनंति आहे.

---

# विद्यार्थ्यांचें भावी शिक्षण १४

यापूर्वीच्या लेखांतून आजच्या विद्यार्थीजीवनाच्या निरनिराळ्या पैलूंचें परिशीलन मीं केलें. ज्ञानसंपादनाच्या कामीं यापुढें मुख्यतः विश्वविद्यालयानें व मुलांमुलींनीं आपली दृष्टि कशी विशाल ठेवली पाहिजे याविषयीं कांहीं स्फुट विचार या लेखांत सांगतों.

समाजाची रचना कशी होते, त्याची धारणा कशी होते, आणि समाज विलयाला कसा जातो, यासंबंधीचें ज्ञान आपल्या शिक्षणांत अंतर्भूत करणें अत्यंत अवश्य आहे. पौगंड दशा संपल्यानंतर प्रत्येक तरुण स्त्री-पुरुषाला जीवितांत जे प्रश्न सोडविण्याचा प्रसंग येईल त्या प्रश्नांची माहिती विद्यार्थीदशेंत करून देणें हा शिक्षणाचा एक आवश्यक भाग बनला पाहिजे. स्त्रीपुरुषांच्या शरीराची रचना, प्रजोत्पादनाला अवश्य असणारे गुणविशेष, आनुवंशिकता आणि तिचे परिणाम, बाल्यदशेंत आणि पौगंड दशेंत संपादावयाचें शारीरिक व मानसिक गुण, विवाहाच्या बाबतींत अवश्य असलेली शारीरिक व मानसिक तुल्यबलता, ठळक ठळक रोगांची माहिती, मानवयोनीचीं आरंभापासूनचीं स्थित्यंतरें, निरनिराळ्या वंशाची अथवा वंशखंडाची भ्रमंती व स्थलांतरें, भौगोलिक स्थितिविशेषांनीं त्यांच्यावर घडलेले परिणाम, एकमेकांपासून अलग राहिल्यानें झालेला लाभ किंवा झालेली हानि, लग्नसंस्थेची उपपत्ति, विविध देशांत या संस्थेला प्राप्त होत गेलेलीं रूपांतरें, आर्थिक व राजकीय स्थितिविशेषांचे लग्नसंस्थेवर झालेले परिणाम, स्त्री–पुरुषांची पिंडगत समता–विषमता, त्यांचे सिद्ध होत गेलेले व्यवसायभेद, स्त्रीविषयक आक्रमणाची जमातींच्या मनांतील वासना, बालविवाह आणि पडदा यांची उपपत्ति, स्त्रीपुरुषांच्या संख्यांचे समाजावर होणारे परिणाम,

बहुपत्नीत्व, एकपत्नीत्व, एकपतित्व आणि ब्रह्मचर्य या सर्वांचे गुणावगुण, धर्मानें या कामीं केलेली ढवळाढवळ आणि तिचे झालेले दुष्परिणाम, आक्रमक समाज आणि संस्कृतिसंपन्न समाज यांचें परस्पर नातें व त्यांतून संस्कृतिसंपन्न समाज टिकून रहावयास अवश्य असलेलें पौरुषयुक्त जीवन, दया, माया, न्याय इत्यादि सद्गुणांच्या आणि तत्त्वांच्या परिपालनाच्या युक्त मर्यादा इत्यादि सर्व पोटविषयांचे ज्ञान प्रत्येक स्त्री-पुरुष विद्यार्थ्याला करून देणें अगत्याचें आहे.

शिक्षण म्हणजे जर भावी जीविताची सिद्धता असेल, तर आपल्या समाजांत उपस्थित होत असलेल्या सर्व प्रश्नांची समजूत आणि जमल्यास त्या प्रश्नांची समर्पक उत्तरें हीं विद्यार्थ्यांना प्राप्त करून दिलींच पाहिजेत. त्यांनीं अमुक मताचें व्हावें असा आग्रह धरणें युक्त होणार नाहीं; परन्तु शास्त्रीय पद्धतीनें प्रश्नांचीं समजूत आणि प्रश्नांचीं उत्तरें हा लाभ त्यांना शिक्षणाच्याद्वारा झालाच पाहिजे. 'समाजशास्त्र', 'समाजशास्त्र' हा शब्द आपल्या सुधारकांच्या आणि प्रतिपादकांच्या बोलण्यांत पुष्कळदां येतो. त्यांच्यापैकीं किती लोकांनीं समाजशास्त्राचा खरा खरा अभ्यास केला असेल तें निश्चयानें सांगवत नाहीं. या शास्त्राचीं कांहीं मूलतत्त्वें विद्यार्थ्यांना मात्र शिकविलेलीं असणें अवश्य आहे. पण आपण जर केवळ समाजशास्त्रच शिकविलें आणि विद्यार्थ्यांची मनें अधांतरींच ठेवून दिलीं, तर त्यांना त्याचा फारसा उपयोग होणार नाहीं. त्यांना वस्तुस्थितीचा बोध करून दिला पाहिजे. समाजरचना या शब्दाला जो अर्थ आहे तो त्याला निर्विकल्पपणानें लवकर पटेल; परन्तु हिंदुसमाजरचना या शब्दसंहतीला असलेला अर्थ त्याला सविकल्पपणें शिकविल्यानेंच समाजाचें खरेंखरें हित होईल. फार संकटें येऊं लागल्यामुळें आणि व्यूहाच्या पोटांत व्यूह आहेत असें दिसूं लागल्यामुळें, हिंदु समाजावर रागावणारे आणि त्याच्यासंबंधानें अद्वातद्वा बोलणारे वक्ते आणि लेखक आपल्याला गावगन्ना भेटतात. परंतु

त्यांच्या या पराक्रमाचा उपयोग समाजाच्या अभ्यासाला फारच थोडा होतो. किंबहुना इतकी वाईट वस्तू अभ्यासासच पात्र नाहीं, असें सुद्धां तरुण लोकांस वाटूं लागतें. परंतु ते याच समाजांत जन्माला आलेले असतात, त्यांना येथेंच लहानाचें मोठें व्हावयाचें असतें, आणि मरेतोंपर्यंत त्यांना आपले प्रपंच या समाजांतच करावयाचे असतात; म्हणून त्याच्यासंबंधानें अवहेलनेची भावना उत्पन्न करून ठेवण्यांत विशेष पुरुषार्थ न मानतां त्या समाजाच्या अभ्यासाला त्यांना प्रवृत्त करणें हेंच सुधारकाचें खरेंखुरें काम आहे. आणि या कामाचा पाया आपण शिक्षण चालू असतांना घालावा असें मला वाटतें.

मुख्यतः जातिसंस्थेचा इतिहास आणि तिच्या व्याप्तीची माहिती, तिचा आरंभ, वर्ण म्हणजे काय, जात म्हणजे काय, आर्यधर्म म्हणजे काय, हिंदुधर्म म्हणजे काय, समाजांत कालानुक्रमानें पडत चाललेलीं स्थित्यंतरें, यांची माहिती धर्म म्हणून नव्हे तर सामाजिक अभ्यास म्हणून, विद्यार्थ्यांना करून देणें अत्यावश्यक आहे. अगदीं स्वच्छ गोऱ्या लोकांपासून तों काळ्याकुळकुळीत लोकांपर्यंत सर्व प्रकारच्या वर्णछटा या समाजांत आहेत. पायाखालीं मुंगी सुध्दां मरतां कामा नये असें समजण्यापासून तों, क्वचित् प्रसंगीं कां होईना, नरमांसभक्षणापर्यंत सर्व प्रकारच्या हिंसेच्या आणि अहिंसेच्या छटा या समाजांत नांदत आहेत. केवळ ज्ञानस्वरूप असणाऱ्या ब्रह्माचें चिंतन करणारापासून तों खरोखरच दगडधोंड्यांत कांहीं अलौकिक सामर्थ्य आहे म्हणून त्याची पूजा करण्यापर्यंत सर्व तऱ्हेचे आस्तिक लोक या समाजांत आहेत. आणि तत्वज्ञानापासून तों केवळ उर्मटपणाच्या क्षेत्रापर्यंतचा अज्ञेयवाद या समाजांत सर्वत्र खेळत आहे. अनेक तत्त्वज्ञानांचीं दर्शनें या समाजानें प्रमाण मानलीं आहेत आणि गांभीर्य, घृणा, व परिहास या भावना उत्पन्न करणाऱ्या नाना प्रकारच्या चालीरीती या समाजांत शेजारीशेजारींच नांदत आहेत. कित्येक

सहस्र जाती, शेंकडों पंथ आणि परस्परविरोधी अशीं विविध तत्त्वज्ञानें हींही शेजारधर्मानें रहात आलीं आहेत. एकीकडे सार्वभौमाची सत्ता आणि दुसरीकडे गांवकीचें स्वतंत्र राज्य या दोनही टोकांची हवा येथील लोकांनीं सुखानें खाल्ली आहे. ब्रह्मज्ञानी म्हणूनच कडकडीत सोवळें पाळणारा आणि ब्रह्मज्ञानी म्हणूनच सबगोलंकाराचा काला ओरपणारा हे दोघेही कदाचित् एकाच आढ्याखालीं गुण्यागोविंदानें रहात आले आहेत. कोणचेंही नवीन येणारें तत्त्वज्ञान जर समाजाची रचना आणि परमार्थांतील त्याची सर्व-संग्राहक वृत्ति यांची हत्या करणारें नसेल, तर त्याला आपल्या घरांत जागा देण्याला या समाजानें कधींही खळखळ केलेली नाहीं. आणि हजारों लहान लहान पुंजांचें आपलें स्वरूप असल्यामुळें आणखी चार नव्या पुंजांची भर पडली तरी यानें कधीं खंत मानलेली नाहीं. अशा या समाजांत जन्माला आलेल्या आणि वाढलेल्या कोणाही तरुण स्त्री–पुरुषाला त्या समाजाचें यथार्थ ज्ञान करून दिल्यावांचून जीविताच्या प्रवासाला प्रवृत्त करणें हें अत्यंत अश्लाघ्य आहे. या समाजांतच जर त्याला वागावयाचें आहे, याचींच सुखदुःखें जर त्याला आपलीं मानावयाचीं आहेत, याच समाजाची जर त्याला सुधारणा करावयाची आहे, आणि याला सरूपता प्राप्त करून देऊन जगांतील श्रेष्ठ लोकांच्या पंक्तीस नेऊन बसविण्याचें काम त्याला करावयाचें आहे, तर पहिल्या परिच्छेदांत सांगितलेल्या अनेकविध ज्ञानाची माहिती आपल्या विद्यार्थ्यांना करून देणें अगदीं अटळ समजलें पाहिजे.

आपल्या शिक्षणांत आणखी एका गोष्टीची उणीव राहूं देतां कामा नये. सर्व सुधारकांचा भर आपल्या वैगुण्यदर्शनावर फारच झाला आहे. निषेध आणि धिःकार यांच्या पलीकडे विचारांचें आणखी एक फार विस्तीर्ण स्तबक आहे याची जाणीव विद्यार्थ्यांना करून देणें प्राप्त आहे; आणि ही करून देण्यास उत्तम इलाज हा आहे कीं पृथ्वीवरील

निरनिराळे समाज थोड्या शतकांपूर्वी कोणच्या अवस्थेंत होते, त्यावेळीं त्यांच्यांत व आपल्यांत कितपत तफावत होती, आधुनिक शास्त्रज्ञानाचा प्रसार तिकडे कसा संभवला, व आपण त्याला पारखे कसे राहिलों, अप-समजुती आणि भ्रांत विचार यांच्या निरसनाला शास्त्रांचीं ज्ञानें कशीं उपयोगी पडलीं आहेत, इत्यादिकांचा तौलनिक अभ्यास विद्यार्थ्यांकडून करून घेतला तरच त्यांना आपल्या संबंधीं यथार्थ ज्ञान होण्याचें काम सोपें होईल.

ज्ञान शब्दाची व्याप्ति या काळांत वाढत चाललेली आहे इकडे काणाडोळा करून चालावयाचें नाहीं. खगोलांतील दूरस्थ ताऱ्यापासून तों भूगर्भातील उष्णतेपर्यंत आणि आपल्या शरीरांतील बारीकसारीक रक्त-वाहिन्यापर्यंत ज्ञानाचा पल्ला पोंचलेला आहे; आणि आपलें जीवित सुखाचें करावयास यांतील कितीं तरी ज्ञानविशेषांचा उपयोग होत आहे. अली-कडे तरूण लोकांना आपल्या शरीरासंबंधीची माहिती करून घेण्याची जिज्ञासा अधिक अधिक वाढूं लागली आहे हें सर्वांना माहित आहे. मनाची ही एक विकृत धारणा आहे असा पुष्कळ लोकांचा समज आहे. परन्तु हाही एक जिज्ञासेचाच व्यापार आहे, या दृष्टीनेंच आपण तिकडे पाहिलें पाहिजे. म्हणून जी गोष्ट तरुण विद्यार्थी कदाचित् चोरून करीत असतील ती ज्ञानाच्या विषयांतच प्रविष्ट करून घेऊन शास्त्ररूपानें त्यांना शिकविणें हेंहि शेवटीं त्यांच्या हिताचेंच आहे असें अनेक विचारी लोकांचें मत झालें आहे. मीं या विषयाचा अभ्यास केलेला नाहीं; पण त्याचें एकंदर धोरण शेवटीं तरुण लोकांच्या हिताला पोषक ठरणार आहे असें अनुमान मात्र मला करावेसें वाटतें. म्हणून या लैंगिक विषयांतील जे कोणी ज्ञाते असतील त्यांच्या ज्ञानाचा संग्रह आपल्या शिक्षणांत करावा हें कां योग्य याचा विचार शिक्षणखात्यानें करण्याचा काळ आतां आला आहे एवढें तरी मानावयास हरकत नाहीं. मात्र या बाबतींत सावधगिरीची

आवश्यकता फारच मोठी आहे. पुष्कळदां असें वाटतें कीं समाज कोणत्या अवस्थेंत असतांना त्याला कोणतीं ज्ञानें पचण्यासारखीं आहेत याचा विचारसुद्धां करावयास हवा. ज्ञान हें स्वतः उदासीनच आहे, त्याला बरें वाईट कांहींच नसतें; विचार असतो तो केवळ पात्रापात्रतेचा असतो. या दृष्टीनें पाहातां आतांच सांगितलेलें ज्ञान अलिप्तपणें अभ्यासावयास, अत्यंत विषम व विविध संस्कृतीच्या पण एकत्र येणाऱ्या स्त्री–पुरुष विद्यार्थ्यांना पात्रता आलेली आहे कीं नाहीं याचा विचार मात्र आपल्या शिक्षणतज्ज्ञांना करावा लागेल. मी हा विचार अगदीं अधांतरीं लिहीत आहें याची जाणीव मला आहे. परन्तु त्या विषयाचें ज्ञान मला नसल्यामुळें त्याची उपयुक्तता आणि त्याच्या अभ्यासांत अवश्य असलेली सावधगिरी यासंबंधानेंच काय तें तिऱ्हाइत बुद्धीनें मला बोलतां येण्यासारखें आहे.

सध्यांचा काळ लक्षांत घेतां आणि निरनिराळ्या समाजघटकांची परिणति आणि प्रवृत्ति अजमावून पाहतां विद्यार्थ्यांना कांहीं विधायक सूचना करणें मला इष्ट दिसतें. इंग्रजी अंमलाच्या सुरवातीपासून तों तहत आतांपर्यंत आपण जसे परकी लोकांच्या तसे परकी ज्ञानांच्या आणि संस्कृतींच्या छायेंत वागत आलों आहोंत. इंग्रजी अंमल हें आपलें खरें दास्य नव्हतें; आपलें खरें दास्य म्हणजे परकी समाजापुढें सदैव पदर पसरून उभें राहिलेलें असणें हें होय. इंग्रजांच्या देशांत आणि त्याच्या खालोखाल युरोपांत जें जें नवें निघेल तें बरेंचसें जुनें झाल्यानंतर आपण पत्करणें हाच उद्योग आपण आज दीडशें वर्षे करीत आलों आहोंत. त्यांचीं राजकीय तत्वज्ञानें, त्यांचीं धार्मिक परिवर्तनें, त्यांचीं वाङ्मयें यांत तिकडे जें जें काय नवीन झालें तें तें इकडे येऊन पोंचलें आहे. आणि आपल्या मनाचा आणि बुद्धीचा गुजारा त्यावरच चालला आहे असें दिसून येईल. तरुण विद्यार्थ्यांनीं ही आपल्या वाडवडिलांची संवय अंगावरच्या जीर्ण रकट्याप्रमाणें, तिरस्कारानें फेकूनच द्यावी, आणि आपल्या समाजाच्या आणि परिस्थितीच्या

खोल अभ्यासानें जें कोणतें ज्ञान उपपन्न होईल तेंच आपलें असें समजावें. दर वेळीं असें झालें आहे कीं, तिकडील लोकांनीं आपल्या स्वतःच्या परिस्थितीच्या आणि समाजाच्या चिंतनानें कांहीं ज्ञानें बसवावीं आणि आपला समाज निराळा असतांना आणि परिस्थिती वेगळी असतांना तीं इकडे लावून घेण्याचा आम्हीं अट्टाहास करावा. या आवर्तांतून विद्यार्थ्यांनीं बाहेर पडलें पाहिजे. हाच विचार मनांत अतिशय दाटल्यानें इतिहासकार राजवाडे यांनीं एकदां असें निकरानें सांगितलें कीं, आमच्या भौतिक शास्त्रकारांनींसुद्धां दत्तक ज्ञानावर विसंबून राहूं नये; रसायन, पदार्थविज्ञान, इत्यादि शास्त्रांत सिद्धरूप पावलेलीं जीं प्रमेयें आहेत तीं सुद्धां आमच्या संशोधकांनीं पुन्हां एकदां सिद्ध करावीं. राजवाड्यांचा हा आग्रह शब्दशः खरा मानणें म्हणजे राजवाड्यांना अन्याय करण्यासारखेंच आहे. त्यांच्या उद्गारांतलें मर्मच केवळ ध्यानांत घ्यावयास हवें; आणि तें मर्म हें कीं, आपण स्वतंत्रपणानें विचार करण्यास शिकलें पाहिजे.

महाराष्ट्रांतील विद्यार्थ्यांच्या मनाला, मी पुढें सांगतों त्या विचारानें एक चरका बसेल; पण तो बसवावा अशीच माझी इच्छा आहे. आपण राजकारणानें इतके ग्रस्त झालों आहोंत कीं विविध ज्ञानांची उपेक्षा आपण करीत आलों आहोंत; आणि हिंदुस्थानांतील इतर कांहीं प्रांतांच्या मागें आपण पडलों आहोंत. उठल्या सुटल्या तरुण स्त्रीपुरुषांच्या प्रीतीविषयींच लिहिणाऱ्या कादंबरीकारांना, "शृंगाराशिवाय तुम्हांला दुसरा रस माहीतच नाहीं कीं काय, ?" असें विचारण्यांत ज्यांना लज्जत वाटते त्यांना दुसऱ्यांनीं कोणीं असें विचारायला हवें कीं, "राजकारणाशिवाय तुम्हांला दुसरा कोणताही विचार आणि कोणतेंहि ज्ञान महत्त्वाचें वाटत नाहीं कीं काय ?" ही राजकारणाची खोड आपल्याला अतिशय लागलेली आहे. शुद्ध ज्ञानाची उपासना आपण विसरलों आहोंत. पूर्वींच्या शास्त्रीपंडितांना हसणें फार सोपें काम आहे. पण त्यांची ज्ञानावरची आसक्ति सर्वथा अनुकरणीय होती.

इकडे तुमचा डोंगाळा जरी माजला तरी त्यांच्या अध्ययनांत कधीं खंड पडावयाचा नाहीं. ते आपल्या पोथीचीं पानेंच पहात बसत असत. आपण स्वतःला विद्यार्थी आणि प्राध्यापक म्हणवतों पण आपल्या जुन्या पंडितांप्रमाणें आपण ज्ञानैकनिष्ठ असत नाहीं. आपण तो एक परीक्षेचा किंवा पोटाचा विषय समजतों. आणि जरूर तेवढा वेळ त्यांत घातल्यावर, बहुधा कोणच्या तरी राजकारणाचा फाया कानांत घालून इकडे तिकडे हिंडत असतों. हें आमच्या मुख्य पेशाशीं विसंवादी आहे. मॅक्समुलर यानें ज्ञानैकनिष्ठेबद्दल हिंदू शास्त्रीपंडितांची तारीफ केली आहे ती त्याच्यासारख्या निष्ठावंताला शोभण्यासारखीच आहे. ही निष्ठा आपण गमावल्यामुळें शास्त्रशोधाच्या बाबतींत आपण महाराष्ट्रीय लोक मागें पडलों. गुजराथेंतला सुशिक्षित समाज आपला उरलेला वेळ व्यापाराच्या चिंतनांत घालवितो तसा महाराष्ट्रांतला सुशिक्षित समाज राजकारणाच्या चिंतनांत घालवितो. सांगण्याचें तात्पर्य असें कीं शास्त्री—पंडितांच्या कुळांत जन्मलेल्या लोकांचीसुद्धां श्रद्धा आधुनिक शास्त्रज्ञानावर न बसतां ती राजकारणावर मात्र बसली आहे.

मौजेची गोष्ट हीं कीं मराठी राज्य कां बुडालें याची मीमांसा करतांना ‘ नाना फडणविसानें शास्त्रज्ञानाची उपेक्षा केली, शिवाजीनें बंदुकीच्या दारूचें मूळ आपल्या इथेंच उभें केलें नाहीं, आणि इंग्रजांचे छापलेले कागद डोळ्यापुढें दिसत असतां मराठीशाहींतील कोणाही मुत्सद्यानें हें कसें घडतें याची चौकशीं केली नाहीं ’ अशी टीका पूर्वजांवर करणाऱ्या आपल्या नव्या शिक्षितांनींसुद्धां त्याच शास्त्रज्ञानाची तीच उपेक्षा केली आणि उपेक्षेमुळें महाराष्ट्रांतील लोक भौतिक शास्त्रज्ञानाच्या बाबतींत इतर प्रांतांच्या मागें रेंगाळत राहिले आहेत. शुद्ध ज्ञानाची उपासना जर जिवंत राहिली असती तर अव्वल इंग्रजींतसुद्धां त्याच उपासनेला वश होऊन कोणीकोणी परदेशीसुद्धां जाऊन राहिले असते. आणि जर कां

त्यांनीं ती पीठिका आपल्या देशांत आणली असती तर स्वराज्य मागावयास गेलेल्या शिष्टमंडळापेक्षां नवे शोध लावणाऱ्या या पंडितांचा गौरव जनतेनें जास्त हौसेनें केला असता. असो. ही झालेली चूक आतां आपण सुधारावयास हवी. विद्यार्थ्यांनीं आपलें लक्ष, विद्येच्या कामीं तात्पुरतें आणि बाकीच्या विषयांत मनसोक्त, असा प्रकार न करतां, तिच्या शाश्वत उपासनेकडे आवर्जून लावावें असें त्यांना आग्रहाचें सांगणें आहे.

---

# आपल्या विद्यार्थ्यांचा मागसलेपणा १५

अशी एक ओरड आहे कीं, अखिल भारतीय चढाओढीचे प्रसंग आले म्हणजे आपले कॉलेजचे विद्यार्थी किंवा नुकतेच पदवी घेतलेले आपले तरुण लोक हे मागें पडतात. ही तक्रार खरी आहे असें माझें मत आहे. आपलें नवें निघालेलें विश्वविद्यालय व निरनिराळ्या कॉलेजचे प्राचार्य यांनीं जर वेळींच सावधगिरी दाखविली नाहीं; तर ही तक्रार दिवसेंदिवस वाढतच जाईल असा धाक वाटतो. परवांच्या महायुद्धाच्या प्रसंगीं, या तक्रारीला उग्र प्राप्त झालें. महाराष्ट्रांतील पालकांच्या लक्षांत ही गोष्ट चरचरून भरली कीं, आपलीं प्रौढ मुलें अपुरीं पडत आहेत. परंतु, आयत्या वेळीं कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. तेव्हां जें साधलें नाहीं तें आतां साध्य करावयास हरकत नाहीं. पहिली गोष्ट म्हणजे, आपण महाराष्ट्रीय लोक मोकळेपणानें बोलावयास थोडे नाखूष असतों. ही नाखुषी आपल्या पिंडांतच आहे, कां हें आवरण आपल्या मनावर तात्पुरतें आलें आहे, हें कळावयास कांहीं मार्ग नाहीं. इतर प्रांतांतील लोक म्हणतात कीं, "महाराष्ट्रांतील माणसें भारीच घुमीं आणि मानी असतात; चार–चौघांत बसलीं तर, तीं आपण होऊन कधीं बोलूं लागत नाहींत; दुसरें कोणीं बोलूं लागलें तर, जितक्यास तितकाच जबाब देऊन, तीं पुन्हां गप्प बसतात." आमच्या कॉलेजमध्यें–म्हणजे सर परशुरामभाऊ कॉलेजांत–असलेल्या कांहीं कांहीं परप्रांतीय प्राध्यापकांनीं बरोब्बर हीच टीका आम्हां महाराष्ट्रीय सहकाऱ्यांवर केलेली मला स्मरते. ते म्हणत, कीं 'तुम्हीं तुमच्या तुमच्यांत सुद्धां गप्प बसून राहतां !' असें जर आहे तर, अनोळखी माणसाशीं, आम्ही आपण होऊन कितीसें बोलूं लागूं हें दिसतच आहे ! आपण इतर कोणाला कमी लेखतों किंवा पोटांतून त्यांचा तिरस्कार करतों, व म्हणून

त्यांच्याशीं बोलत नाहीं असें मला वाटत नाहीं. आमचा हा एक स्वभावाचाच दोष असेल; नाहीं असें नाहीं. पण हा जर पिंडगत दोष असला तर, तो कसा घालवितां येईल, हें मला सांगतां येत नाहीं. तो घालवावयास हवा, हें मात्र खरें. तथापि कितीही इलाज केले तरी, शेवटीं मूळ प्रकृती उधसून वर येते हें आपल्याला माहीत आहे. तथापि, जर आपलें हित आपल्याला कळत असेल, तर हा दोष घालविण्याचे सक्त उपाय आपण केले पाहिजेत.

गप्प बसण्याचा हा पिंडगत दोष सोडून दिला तरी, आपलें आणखी एक वैगुण्य या घुमेपणाला कारण होतें. इतर प्रांतीयांशीं बोलावयाचें, म्हणजे बहुधा इंग्रजींतच बोलणें भाग पडतें. तेथें तर आम्ही अगदीं मुख-दुर्बळ बनतों ! आपल्याला इंग्रजी वाक्यरचना माहीत नसते असें तरी कसें म्हणतां येईल ? आपण जर, सर्व परिक्षांत पास होतों, इंग्रजी प्रश्नपत्रिकांचीं उत्तरें जर आपण इतर प्रांतीयांइतकींच चांगल्या तऱ्हेनें देतों, तर आप-ल्याला चांगलें इंग्रजी येत असलें पाहिजे, हें आपोआपच ठरतें. परंतु इंग्रजी बोलावयाचें म्हणजे मात्र आपल्याला भीति वाटते, हें कांहीं खोटें नाहीं. संस्कृत, मराठी, निरनिराळीं भौतिक शास्त्रें, तत्त्वज्ञान, गणित, इत्यादि विषयांचे आपले प्राध्यापक फार हुषार म्हणून नाणावलेले अस-तात. पण आपल्या इंग्रजी शिकविणाऱ्या प्राध्यापकांचा लौकिक विशेष पसरल्याचें कधीं ऐकलें नाहीं ! तो महाराष्ट्र सोडून बाहेर दूरवर जाणें हें तर राहोंच; पण ज्या त्या शहरांतसुध्दां विशेष मान्यता पावलेला असतो असें वाटत नाहीं. असें कां व्हावें हें कळत नाहीं ! पुस्तक उघडून हातांत घेतलें, म्हणजे तो विषय समजावून देण्याची कला आपल्याला साधलेली आहे. हें काम इंग्रजींतूनही आपण बरें करतों. पण तेवढें झालें म्हणजे आपला आणि त्या भाषेचा कांहीं संबंध नाहीं असें आपण मानूं लागतों. हाच कदाचित् आपला दोष असावा, असें वाटतें. काम झालें कीं, आपण एकदम मातृभाषेकडे वळावें, हें तत्वतः पाहतां अगदीं बरोबर आहे;

स्वाभिमानाच्या दृष्टीनें, तर अवश्यच आहे. पण परकी भाषा तोंडांत बसावयास, व तिच्या वर्णोच्चारांत सफाई प्राप्त व्हावयास, ती आपल्या बोलण्यांत नेहमीं असली पाहिजे. कामापुरताच तिचा अवलंब केल्यानें, ही सफाई कधींही प्राप्त होईल असें वाटत नाहीं. बरें, कारण नसतांना, एकमेकांशीं बोलतांना इंग्रजींत बोलूं लागणें, हें तर आपल्या स्वाभिमानाला कधींच पटण्यासारखें नाहीं. या त्रांगड्यातून बाहेर कसें पडतां येईल, हें मात्र आपण पाहिलें पाहिजे !

परप्रांतांत पुष्कळ प्रवास करणें, हा एक इलाज आहे. परंतु, केवळ इंग्रजी भाषा तोंडीं बसवावी, एवढ्यासाठीं प्रवासाला कोण निघणार ? दुसरें असें कीं, ज्या इतर प्रांतीय लोकांना ही सफाई आलेली असते, ते तरी अशा प्रवासाला कधीं निघालेले होते ? असा प्रवास न करतांच, त्यांना सफाईदार इंग्रजी बोलतां येऊं लागलें ना ? मग आपल्याला तसें कां येऊं नये ? ते लोक आपल्या घरींदारीं, इंग्रजींतच बोलतात कां ? मला माहीत नाहीं, परंतु असें होत नसावेसें वाटतें. मग या गोष्टीचा छडा आपण लावणार तरी कसा ? शेवटीं येतां येतां, आरंभीं सांगितलेल्या स्वभावदोषां-कडेच वळावें लागतें.

आपल्यापैकीं जे लोक शिक्षणाच्या व्यवसायांत आहेत, त्यांच्यांतील एक बारीकसें वैगुण्य मला चांगलें माहीत आहे. या वैगुण्याचा उल्लेख कै० तात्यासाहेब केळकर यांनीं आपल्या लिखाणांत एकदां केला होता. शिक्षक झाले काय, किंवा प्रोफेसर्स् झाले काय, आपलें इंग्रजी चुकेल कीं काय, अशी एक बारीकशी भीति त्यांच्या मनांत नेहमीं वागत असते. भसाभस बोलणारे इतर प्रांतांतील लोक चुका करीत नसतील असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. पण एक तर त्यांना त्या कळत नसाव्या; किंवा ते या चुकांविषयीं बेफिकीर तरी असावे. शिक्षणाचा धंदा करणाऱ्या आपल्या

लोकांना, ही चुकांची ओळख बरोबर असते; व शुद्धताशुद्धतेविषयींची बेफिकीरी त्यांच्या प्रवृत्तींत बिलकूल नसते. चुकेल कीं काय या धाकानें आपण इंग्रजीचा अवलंब करीतच नाहीं. आतां, शुद्धताशुद्धतेची जाणीव हा कांहीं अवगुण समजतां येणार नाहीं ! पण, तो आपल्या ठिकाणीं इतका प्रबल बनतो कीं, आपण मुळचे जरी थोडे बहुत वाचाट असलों, तरी मूक बनतों ! तात्पर्य, कांहीं अंशीं स्वभावदोषांमुळें, कांहीं अंशीं नित्याच्या व्यवहारांत इंग्रजीचा उपयोग न केल्यामुळें, व कांहीं अंशीं चुकेल कीं काय या धाकामुळें आपण घुमे बनतों.

ही मीमांसा बरोबर आहे, असें क्षणभर मानलें तरी, ती आपल्याला तारक होऊं शकत नाहीं. हिंदी म्हणा, इंग्रजी म्हणा, जी कोणची भाषा असेल, तिचा अवलंब आपण धडाक्यानें करावयास शिकलें पाहिजे. याचा आरंभ कॉलेजांतून बाहेर पडल्यावर नव्हे, तर कॉलेजांत असतांनाच केला पाहिजे. या कामीं ' विद्यार्थ्यांचें विद्यार्थ्यांनीं पहावें ' असें जर कां कॉलेजचे अधिकारी म्हणूं लागले, तर तें चुकीचें होईल. स्वतंत्रपणें विद्यार्थ्यांच्या हातून हें वैगुण्य नाहींसें होईल असें समजणें अगदीं चूक आहे. शाळांच्या व कॉलेजांच्या अधिकाऱ्यांनीं हें वैगुण्य घालविण्याची खटपट आपण होऊन केली पाहिजे. शाळा—कॉलेजांत इंग्रजी बोलण्याचा सराव पुष्कळ ठेवला पाहिजे. मातृभाषा आणि राष्ट्रभाषा यांच्या अभिमानाला प्रस्तुत काळीं प्राप्त झालेली चलती लक्षांत गेतां, माझें हें प्रतिपादन पुष्कळांना अभिमान—शून्यतेचें वाटण्याचा संभव आहे. त्यांना तसें वाटलें तर खुशाल वाटो ! आपल्या मुलांच्या कल्याणाची गोष्ट कोणची तीच मला सांगितली पाहिजे. आपले विद्यार्थी चढाओढींत मागें राहतात. याचें एक कारण त्यांचा मुखदुर्बळपणा हें आहे. ही गोष्ट कोणालाही नाकारतां येणार नाहीं; मग स्वभाषेचा आणि राष्ट्रभाषेचा त्याचा अभिमान कितीही प्रखर असो. मागें पडावयाचें नसलें तर, हा दोष घालविला पाहिजे.

तो घालवावयाचा म्हणजे खूप संवय करून इंग्रजीची सफाई प्राप्त करून घेतलीच पाहिजे. हें काम विद्यार्थ्यांच्या मनाचा आणि सवयींचा बनाव चालू असतांनाच होण्यासारखें आहे. म्हणून शाळाकॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं हें काम हातीं घेणें जरूर आहे. मुख्य म्हणजे, आपण संभाषणाला फारच बुजतों. यासाठीं इंग्रजींत प्रश्नोत्तरें करण्याची संवय मुद्दाम लावून घेतली पाहिजे. ही संवय चांगली अंगवळणीं पडली म्हणजे कोणाचीही गांठ पडली तरी आपलीं मुलें चांगलीं चुरुचुरु बोलूं लागतील.

दुसरें असें कीं, आपल्या विद्यार्थ्यांना सामान्य ज्ञान असावें तितकें असत नाहीं. ही उणीव भरून काढण्याचें ठिकाणही आपलीं शाळा–कॉलेजेंच हीं होत. जग इतकें जवळ जवळ येत चाललें आहे कीं, व उलाढाली इतक्या त्वरेनें होत आहेत कीं, आपण जर त्याची दाखलगिरी ठेवली नाहीं, तर आपण खचितच मागें पडूं. चालू जगांत रहावयास आपण अपात्र आहों, असें ठरूं लागेल. तुम्हांला वेदान्ताचीं सूत्रें चांगलीं माहीत असतील, कौमुदी पाठ येत असेल; अलंकारांची ओळख तुम्हीं मोठ्या रसिकतेनें करून घेतलेली असेल, आणि त्या त्या विषयांत परीक्षेच्या वेळीं, तुम्ही ८० टक्के गुण मिळविले असतील; पण जर, कोरियांत सध्यां काय चालू आहे, रशियाचे व अमेरिकेचे संबंध काय आहेत, दक्षिण आशियांतील देशांना कोणता धाक पडला आहे, ओरिसा प्रांताचा गव्हर्नर कोण आहे, सर चिंतामणी कोण आहेत, व ते कोणाच्या जागीं आलेले आहेत याचीं उत्तरें तुम्हांला जर ताडकन् देता आलीं नाहींत, तर तुमचे ते अलंकार, तें व्याकरण, तो वेदान्त हीं सारीं चढाओढीच्या बाजारांत तरी अगदीं वाया आहेत. उच्च दर्जाच्या नोकऱ्यांसाठी, किंवा लष्करांतील जागांसाठीं जेव्हां विद्यार्थ्यांना मुलाखतीसाठीं बोलवितात, तेव्हां ते चणचणीत आहेत कीं नाहीं; त्यांच्या बोलण्यांत सफाई आहे कां नाहीं; जगाचें ज्ञान त्यांना कितपत आहे, या गोष्टींकडेच मुलाखत घेणारांचें लक्ष असतें.

कागदोपत्रीं नोंदलेलें तुमचें पांडित्य ते मान्य करतील; पण त्याचा उपयोग पुढें वाढून ठेवलेल्या कामाला फारसा नसतो. यासाठीं संभाषणाची संवय जशी अवश्य, तसें निरनिराळ्या चालू विषयांचें ज्ञानही अवश्यच आहे व हें संपादण्याचें ठिकाण म्हणजे आपलीं शाळा–कॉलेजेंच होत.

आपली मुलें मागें पडतात याचें आणखीं एक कारण आहे. पण तें आपल्याला चुकवितां येण्यासारखें नाहीं. विशेषतः लष्करांतील वरिष्ठ दर्जाच्या नोकरीसाठीं पसंती होतांना हें कारण आपल्याला फार बाधक ठरतें. पसंति–समिति बसली म्हणजे तिच्या समोर अखिल भारतांतील तरुण मुलें जमा होतात. आतां आपणा सर्वांचा देश जरी एक असला व आपली सर्वांची शासनसंस्थाही एक असली तरी आपले अंगलट, आपले वर्ण, स्वरुपें, व आपली उंची कांहीं सारखी नसते. उत्तर हिंदुस्थानांतून आलेल्या मुलांच्या मानानें आपल्या मुलांचीं चण लहान वाटते. शरीराची काटी सडक उंच, पिळदार, व चलाख दिसली तर माणूस एकदम मनांत भरतें. पण आपली बहुतेक मुलें चणीनें लहान व डरजुलीं दिसतात. त्यांत वर्ण व रूप यांचे साह्य असलें तरी निभावतें. पण हें देणेंही कांहीं जणांच्याच वाट्याला आलेलें असतें. अर्थातच बाकीचीं पहाणारांच्या मनांत भरत नाहींत. बरें प्रश्नोत्तरानें गार करतील म्हणावें तर तेंही कलम बेताचेंच असतें हें मागें सांगितलेंच आहे. आपलें येऊन जाऊन बळ काय तें परीक्षेतील यश हें होय. पण विशेषतः लष्करच्या नोकरीला या यशाचीं इतकीशी मातब्बरी नसते. तें बेताचें असलें, पण जर वर सांगितलेलें वैभव विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं दिसलें तर त्यांची पसंती सहज होते. पण याला कांहींच इलाज करतां येण्यासारखा नाहीं? नसलेला वर्ण आणावयाचा कसा? नसलेलें रूप आणावयाचें कोठलें? चणीचा प्रश्नही तितकाच अवघड असतो. म्हणून या कामी सार्वजनिक चढाओढींत आपलीं मुलें पुष्कळदां मागें पडणारच. पण याला एक इलाज आहे. पसती करणारांचें धोरण लक्षांत घेऊन आपण अशींच मुलें घाडलीं

पाहिजेत कीं ज्यांच्यापाशीं हें वैभव आहे ! त्यांनाच फक्त पसंतीसाठीं धाडलें पाहिजे. अंगलट व्यायामानें आणतां येतो व अवश्य तेवढीं उंची असली तर ती डौलदार बनवितां येतें. पण रंगरूपाचें तसें नाहीं. म्हणून ज्यांना हेंही वैभव लाभलें असेल त्यांचीच निवड आपण स्वतः करावी. या कामाकडे सुद्धा कॉलेजच्या चालकांनींच बारकाईनें लक्ष द्यावें.

दुसरें असें आहे कीं आपली मुलें जरा कमी फॅशनेबल असतात. आपण फॅशनची टर करतों. आतां, फॅशेन शब्दानें जो छटेल नखऱ्याचा अंश सूचित होतो तो उपहास्यही असेल ही. पण त्या शब्दानें स्वच्छता, टापटीप, शोभा इतकेंच काय पण थोडी ऐट असा जो बोध होतो तो पसंतीसाठीं निघालेल्या विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं असणें अवश्य आहे. आपला सोज्वळ साधेपणा हा एरवीं मोठा स्पृहणीय समजला जात असेल. पण त्याचा मुलाहिजा ही पसंति–समिति खचित ठेवणार नाहीं. समितीशी या मुद्यावर भांडत बसण्यानें कांहींच साधण्यासारखें नसतें. तिची दुरुस्ती करणें तुमच्या हातचें नसतें आणि ती जेव्हां केव्हां होणार असेल तिचा उपयोग तुम्हांला आज होणारा नसतो. म्हणून आपलें साध्य.कोणतें आहे तें ध्यानांत ठेवून थोड्या रुबाबानें, इतमामानें वागलें म्हणून बिघडलें कोठें ?

मी असें ऐकतों कीं आपलें राजकारण पुष्कळदां आपल्या आड येतें. ‘ आपलें ’ म्हणजे आपल्या प्रांतांतील निरनिराळ्या लोकांनीं आतांपर्यंत केलेलें असेल तें; व सध्यां चालविलेलें असेल तें. इंग्रजांच्या राज्यांत या राजकारणामुळें आपलें पुष्कळ नुकसान झालेलें आहे. सध्यां सरकारी समित्या या राजकारणाला किती महत्त्व देतात हें मला प्रत्यक्ष उदाहरणांवरून सांगतां येण्यासारखें नाहीं. परंतु सरकारचीं एकंदर धोरणें, त्याची प्रवृत्ति व घोषणा–वाक्यें व बिरुदावळ्या या लक्षांत घेतां असल्या समित्या पसंतीसाठीं आलेल्या विद्यार्थ्यांना राजकारणाचे प्रश्न विचारीत

असतील असें वाटत नाहीं. या ठिकाणीं मात्र आपला बाणा आपण सोडतां कामा नये. आपल्याला स्वतःचाच कांहीं आग्रह उत्पन्न झालेले नसले तर निराळें. पण जर ते झालेले असले तर केवळ नोकरी मिळते म्हणून त्यांचा इन्कार करावा असें मी कधींही म्हणणार नाहीं. नमतें घेण्याच्या आपल्या धोरणाला मर्यादा असल्याच पाहिंजेत. नाहींतर आपल्याला दानत नाहीं असें होईल. ती दानत आपण कधींहि खर्ची टाकूं नये. पसंत न झालों तरी पुरवलें; पण राजकीय, धार्मिक, सामाजिक आग्रह सोडणार नाहीं असें आपण निकरानें म्हटलें पाहिजे.

---

# शिक्षण-संस्थांचीं नवीं कर्तव्यें



आपल्या संस्थांतून शिक्षणाची भरड पुष्कळ चालतें. पण मऊ-सूत पीठ निघत नाहीं. दोन दोन हजार विद्यार्थी आपण एका मापानें मोजतों व एकाच जात्यांत घालतों. विद्यार्थ्या-विद्यार्थ्यांत पुष्कळ तफावत असते; तर त्यांतल्या त्यांत हुशार विद्यार्थ्यांना विशेष प्रकारचें जास्त शिक्षण देण्याची व्यवस्था आपण केली तर फार बरें होईल. आपलें शिक्षण म्हणजे उंचावरून सोडलेली एक तोटी असते. केव्हां केव्हां ती प्रभूत व चांगलें पाचक पाणी देते; तर केव्हां केव्हां तिचा स्रोत बारिक असून, तिचे पाणीहि मचूळ असतें. अपेक्षा अशी असते कीं, ज्यानें त्यानें आपआपला घडा या नळाखालीं धरावा आणि भरून न्यावा. पण यापेक्षां कांहीं जास्त व्हावें, अशी जाणत्या लोकांची इच्छा आहे. कमींत कमी अमुक दर्जाचें शिक्षण हें प्रत्येकाला मिळालेंच पाहिजे व तो देत असलेल्या शुल्काची किंमतही त्याला मिळाली पाहिजे, हें खरें आहे. परंतु, त्याची स्वतःची पात्रता जर, याहून थोडी जास्त असली व त्याला स्वतःला हौसही असली, तर त्याला जास्त कांहींतरी शिकवावें, म्हणजे निराळे विषय शिकवावे; किंवा चालू विषयांतील उंच दर्जाच्या स्तबकांत त्याला प्रविष्ट करावें, हें अवश्य आहे. यासाठीं अवश्य तर निराळा वेळ ठेवावा. ज्यांची देण्याची ऐपत असेल त्यांच्याकडून जास्त शुल्क घ्यावें.

सध्यां होतें तें हें कीं, सामान्य प्रतीच्या विद्यार्थ्याला झेपेल आणि पचेल तेंच आपण हुशार विद्यार्थ्यांना सुद्धां देतों. परीक्षेंत हे विद्यार्थी वर येतात; पण अंदाज असा आहे कीं, कॉलेजांत मिळालेलें शिक्षण ज्यांच्या बुद्धीला अपुरें वाटतें; जे जास्त जिज्ञासु आणि हौशी आहेत ते आणखी कांहीं तरी शिकावयास खुषीनें तयार होतील. या

रीतीनें, अशा विद्यार्थ्यांची एक स्वतंत्र प्रतच बनेल. ही बनविल्यानें आपण सरसकट विद्यार्थ्यांना कांहीं अन्याय करतों असेंही नाहीं. त्यांच्या पात्रतेप्रमाणें आपण योग्य तें देणें त्यांना देतोंच. मिळालेलें शिक्षण आणि दिलेलें शुल्क यांचा विनिमय यथास्थित होतो. पण मी आतां सांगत आहें त्यांचा व या शिक्षणाचा कसलाच संबंध नाहीं. जे विद्यार्थी बुद्धिदृष्ट्या जास्त वकुबाचे आहेत; व सामान्य विद्यार्थ्यांच्या पंक्तीला बसल्यामुळें, ज्यांची क्षुधा शिल्लकच राहते, त्यांची कांहीं तरी व्यवस्था शाळेच्या वरच्या वरच्या वर्गांत व कॉलेजांत अवश्य व्हावी असें वाटतें. त्यांना शिकविण्याच्या विषयांची निवड, पुढील पिढीच्या भावी जीवनाकडे लक्ष देऊन तज्ञांनीं करावी. असें झालें तर, विद्यार्थ्यां–विद्यार्थ्यांत जो तरतमभाव असतो, त्याचा पूर्ण उपयोग आपण करून घेतला, पुढील पिढीच्या तयारीला हातभार लावला, असें होईल. ज्यांना सामान्य प्रतीचें शिक्षण मिळेल, ते आपल्या पोटाला मिळवीत राहतील; पण ज्यांना कांहीं नवें व जास्त शिकण्याची हिंमत आहे, ते पोटाला मिळवून, शिवाय देशाच्या बौद्धिक जीवनांत विशेष प्रकारची भर घालतील.

विशेषतः भौतिक शास्त्रांचा अभ्यास कांहीं शेलक्या विद्यार्थ्यांकडून जास्त करून घेतां आला, तर येथून पुढें देशांत जी शास्त्रज्ञानाची आवश्यकता अधिकाधिक भासत जगार आहे, ती भागविण्याची तयारी शिक्षण–संस्थांनीं आधींच करून ठेवली आहे, असें दिसेल. निरनिराळ्या तऱ्हेचे प्रयोग करून घेणें, हुषार विद्यार्थ्यांना ते स्वतंत्रपणें करावयास लावणें, बारीक बारीक संशोधनांची कामें त्यांच्यावर सोपविणें, यानें अशा विद्यार्थ्यांना शास्त्रांच्या अभ्यासांत नवीन लज्जत उत्पन्न झाल्यासारखी वाटेल. यांच्यांतूनच संशोधकही उत्पन्न होतील. तात्पर्य, बुद्धिमान् विद्यार्थ्यांच्या शिल्लक राहून जात असलेल्या बुद्धीचा उपयोग, शिक्षणसंस्थांनीं अवश्य करून घ्यावा.

परंतु, येवढा आखाडा मांडणें शक्य नाहीं, असें जर या संस्थांच्या चालकांना वाटत असेल, तर या आखाड्याची मीं सुचविलेली व्याप्ती त्यांनीं कमी करावी. म्हणजे असें कीं, वर्गांत मुलें आल्यानंतर, निरनिराळ्या तऱ्हांनीं त्यांची चांचणी करावी; त्यांत जीं कोणी मुलें फारच बुद्धिमान् दिसतील, त्यांना विशेष प्रकारचें शिक्षण देण्याची व्यवस्था करावी. अशा मुलांची संख्या अर्थात्च फार थोडी असेल. यांच्या बुद्धीवर जर स्वतंत्र संस्कार होऊं लागले तर, नेहमींपेक्षां कांहीं नवें पीक हे लोक काढित आहेत असें लोकांना दिसूं लागलें. स्वतंत्र अध्ययन केलेले तरुण लोक देशाला पुरविण्याचें श्रेय यांना लाभेल. निदान नेहमींच्या विषयांचे विशेष अभ्यास करून घेतले तर परीक्षांत श्रेष्ठ प्रकारचें यश तीं मुलें हटकून संपादन करूं लागतील. व पहिल्या वर्गांत, यदृच्छया कोणी येईल तर पहावें असें जें सध्यां म्हणत बसावें लागतें, तें बसावें लागणार नाहीं. कै. वामन शिवराम आपटे यांची अशी एक गोष्ट सांगतात कीं, न्यू इंग्लिश स्कूलचे व्यवस्थापकाचें काम तर ते नेकीनें करीतच; पण संस्कृतावर त्यांची विशेष भक्ती असल्यामुळें या विषयाचें ज्ञान आपल्या विद्यार्थ्यांना द्यावें, व त्यांना स्कॉलर्स् बनवावें, अशी आकांक्षा ते बाळगीत. ते चवथ्या इयत्तेच्या वर्गांत जात व संस्कृतच्या अभ्यासाला विशेष पात्र कोण आहेत, हें कसोशीनें पहात. मग तीं दहा पांच मुलें हाताशीं धरून, चवथी, पांचवी, सहावी, असें करीत करीत, ते त्यांना शेवटपर्यंत नेत. पण या चार वर्षांत इतर मुलांच्या मानानें, या निराळ्या विद्यार्थ्यांची प्रगति कोठच्या कोठें जास्त होई. यांतील कोणी ना कोणी विद्यार्थी जगन्नाथ शंकरशेट स्कॉलर्शिप् हटकून मिळवी. हा प्रकार वर्षानुवर्षे चालला होता. लोक आचंबा करीत कीं, या शाळेंतून इतके हुषार विद्यार्थी निघतात तरी कसे ? याचें एकच उत्तर होतें. तें हें कीं, शेलके विद्यार्थी हाताशीं घेऊन आपटे हे त्यांची स्वतंत्र तयारी करवून घेत. याला दुसरें उदाहरण हवें असलें तर, न्यू इंग्लिश स्कूलमधील पूर्वींच्या क्रिकेट् संघाचें देतां येईल. श्री. कृष्णाजी

गोविंद किनरे हे न्यू इंग्लिश स्कूलमध्यें मराठीचे मोठे फर्डे शिक्षक होते. पण त्यांना क्रिकेट्चाही नाद होता. या खेळांत, विद्यार्थी तयार करावयास लागणारी हिंमत, चिकाटी, व त्यागवृत्ति हीं त्यांच्या ठिकाणीं भरपूर होतीं. क्रीडांगणावर बदाबदी खेळण्यासाठीं मुलें जमलीं, म्हणजे कोण किती वेगानें धांवतो, कोणाच्या हाताची फेंक कशी आहे, कोणाचा नेम अचूक लागतो इत्यादि गोष्टींवर ते बारीक लक्ष ठेवीत. मग त्यांतून, बारा-पंधरा मुलें क्रिकेट्च्या शिक्षणासाठीं ते निवडून घेत व यांपैकीं प्रत्येक मुलाला खेळांतील प्रत्येक अंगाचें शिक्षण ते सक्तीनें देतच. पण ज्याच्या त्याच्या विशेष गुणाला अनुसरून गोलंदाजी, फलंदाजी, चेंडूझेल, इत्यादींचे विशेष शिक्षणही देत. स्वतः मैदानावर उभें राहून, रोज तीन तीन तास, हा क्रिकेट्चा सराव चालूं राही. इतकी मेहनत केल्यानंतर, यश मिळेना तर काय होईल? वर्षामागें वर्ष न्यू इंग्लिश स्कूलनें क्रिकेट्च्या ढाली मिळवीत रहाव्या, हें दृश्य तेव्हां अनेकांनीं पाहिलेलें आहे. पटाईत क्रिकेटर्सची एक पिढी श्री. किनरे यांच्या हातून तयार होऊन गेली. जें आपटे यांनी संस्कृताच्या बाबतींत केलें, व किनरे यांनीं क्रिकेटच्या खेळांत करून दाखविलें, तें भौतिक शास्त्रें, तत्वज्ञान, भाषा, इत्यादी बाबतींत, कांहीं विद्वान् प्राध्यापकांना व शिक्षकांना खचितच करून दाखवितां येईल. हीं मुलें म्हणजेच आपल्या देशाची खरी खरी दौलत ठरेल. यासाठीं जास्त पैसा खर्च करावा लागला, तरी तो करणें योग्य ठरेल. पण शिक्षकांच्या व प्राध्यापकांच्या एका निराळ्या नशीचें ज्ञान अधिकाऱ्यांनीं करून घेतलें पाहिजे. फार हुषार विद्यार्थी हाताशीं येत आहेत व तें कांहीं विशेष शिकूं इच्छितात, असें जर कां या लोकांना दिसूं लागलें, तर ज्ञानदानाची एक उदार ऊर्मि त्यांच्या मनांत आपोआपच उत्पन्न होते, असा नेहमींचा अनुभव आहे. या ऊर्मीचा उपयोगही अधिकाऱ्यांना करून घेतां येईल.

आणखी एक विचार या संस्थांच्या अधिकाऱ्यांना फार अगत्यानें

सुचवावासा वाटतो. तो त्यांना माहीत नसेल असें समजणें शुद्ध धाडस आहे. पण तो अंमलांत येत नाहीं, हें मात्र खरें आहे. विद्यार्थ्यांच्या भावी जीवन-क्रमाचा विचार कॉलेजच्या प्राचार्यांच्या आणि शाळेच्या व्यवस्थापकांच्या ध्यानांत वागावा तितका वागत नाहीं, असें दुःखानें म्हणावें लागतें. अवश्य तो अभ्यासक्रम पुरा करून, पुढें आपल्या हाताखालचे विद्यार्थी कोठें जातील, अशी वात्सल्यरूप काळजी या उभयतांना वाटावी, अशी अपेक्षा आहे. प्रो. नानासाहेब नारळकर यांच्या मनांत ही खास वागत असे. पालकांच्या मनांत, आपल्या मुलांच्या भावी जीवन–क्रमाची चिंता वसत असतेच. पण माहिती नसल्यामुळें, यांना कोठें धाडावें, व यांचें काय करावें, हें त्यांना समजत नाहीं. शिक्षण संस्थांनीं हें काम आपल्या शिरावर घेतलें पाहिजे. आपल्या प्रांतांत, आपल्या देशांत, व मग परदेशांत कोठें काय चालू आहे, व आपल्या हाताखालच्या यशस्वी विद्यार्थ्यांपैकीं कोणाला कोठें नेऊन ठेवतां येईल, हें शिक्षण–संस्थांच्या अधिकाऱ्यांनीं बारकाईनें पहात राहिलें पाहिजे. स्वदेशांतील व परदेशांतील निरनिराळ्या स्कॉलर्शिपांची, धंद्यांची, व शिक्षण–संस्थांची माहिती हातांशीं ठेवून, ज्या त्या विद्यार्थ्याला त्याच्या त्याच्या कुवतीप्रमाणें त्यांनीं ती पुरविली पाहिजे. अशा माहितीच्या अभावीं, पुष्कळ चांगलीं चांगलीं मुलें सुद्धां जेथल्या तेथें घोटाळत रहातात. मात्र अशा रीतीचें मार्गदर्शन जर यशस्वी व्हावयास हवें असेल, तर निदान हुषार विद्यार्थ्यांनीं इंग्रजी किंवा हिंदी यांचा अभ्यास तरी विशेष काळजीपूर्वक करून ठेवला पाहिजे.

# आदर्श विद्यार्थी कसा असावा ? १७

आदर्श विद्यार्थी कसा असावा यासंबंधींचे कांहीं विचार या शेवटच्या लेखांत सांगतों.

पुणें विश्वविद्यालयांत मराठी ही बोधभाषा झाली तर, विद्यार्थ्याला ज्ञानार्जनाला सध्यां जितका काळ लागतो तितका त्यापुढें लागणार नाहीं; आणि वीस–बावीसच्या सुमारासच तो प्रापंचिक बनूं लागेल असें मला अजूनही वाटतें. पूर्वीच्या काळीं मुलगा सतरा आठरा वर्षांचा झाला म्हणजे तो पोटाला मिळविण्यास पात्र झाला आणि त्यानें प्रापंचिक बनावयास कांहीं हरकत नाहीं, असें समजत असत. ज्याला या वयाला पोटाला मिळवितां येईना त्याला निर्बुद्ध समजण्याची चाल असे; परंतु महाराष्ट्र-विश्वविद्यालयांत मराठी बोधभाषा बनली तरी प्रापंचिक बनण्याचें विद्यार्थ्याचें वय सतरा–अठरापर्यंत कधींही खालावणार नाहीं. पूर्वींच्या काळीं शिकावयाचें असें फारसें नव्हतेंच. जे कोणी संस्कृताचा अध्यास सुरू करीत आणि त्या विषयांत पारंगत होण्याची आकांक्षा बाळगीत त्यांना आपल्या विद्यार्थीदशेचा काल पंचवीस वर्षांच्याही पुढेंपर्यंत लांबवावा लागे. पण असे लोक समाजांत फारच थोडे असत. एकंदर पांढरपेशा लोकांचें शिक्षण हिशेब–ठिशेब, मोडी–लेखन, बखरवाचन, इत्यादिकांच्या पलीकडे फारसें जात नसे; आणि हें व्हावयास सतरा वर्षांपर्यंतचें वय रगड होत असे. पण आतां सामान्य माणसाला सुद्धां तेव्हांच्यापेक्षां किती तरी पटीनें जास्त ज्ञान संपादावें लागतें. ज्ञानाच्या शाखा आणि ज्ञानाचा पल्ला हीं फार वाढलेलीं आहेत. म्हणून २०–२२ वर्षांपर्यंतचा काळ विद्यार्थ्याला विद्यार्जनांत घालवावाच लागेल.

हें वय लक्षांत घेतां शरीराची जोपासना करण्याला त्याला भरपूर संधी मिळेल. आदर्श विद्यार्थ्यांनें, एकीकडे विद्यार्जन चालू असतां, दुसरीकडे शरीराची जोपासना अखंड चालू ठेवली पाहिजे. शरीराची जोपासना करणें म्हणजे मल्ल बनणें नव्हे, किंवा त्या विषयांतील स्पर्धा-क्षेत्रांत उतरण्यास लायक बनणें असेंहि नव्हे. कांही थोडेसे विद्यार्थी हीही दिशा पत्करतील. पण आपण सरसकट विद्यार्थ्यांविषयीं बोलत आहोंत; तर अन्नपचन होणें, मन उल्लसित राहणें, जोखमीच्या कामाची भीति न वाटणें, आणि आपल्या व आपल्या कुटुंबीयांच्या रक्षणाची जबाबदारी बहुतांशीं उचलतां येणें, इतपत शरीराची जोपासना प्रत्येक विद्यार्थ्यानें केली पाहिजे. शिक्षणसंस्थांतूनच ही सक्ती व्हावयास हवी. जी गोष्ट मागें धर्मबुद्धीनें होत असे ती आतां सामाजिक जबाबदारीच्या जाणिवेनें पण सक्तीनेंच व्हावी. आपलें शरीर चांगलें आहे या जाणिवेचा आनंद प्रत्येक विद्यार्थ्याला भोगतां आला पाहिजे. जें विद्यार्थ्याला लागू आहे तेंच विद्यार्थिनीलाही लागू आहे. नमुनेदार विद्यार्थ्याच्या लक्षणांतील अगदीं पहिलें व अवश्य लक्षण माझ्या मतें हेंच आहे. त्याच्याकडे पाहिल्यावर एक प्रकारच्या दांडपणाची कल्पना बघणाराच्या मनांत उत्पन्न व्हावी. मात्र तो दांड बनला तरी त्यानें आडदांड मात्र बनूं नये.

विद्यार्थीदशेंत असतांना माणसाला कसलेंहि व्यसन लागतां उपयोगाचें नाहीं. ' विड्या ओढल्या म्हणून काय होतें ? बियर प्याल्यानें काय होतें ?' हें सारें पांखड आहे. मूळ अव्यय हा शब्द ध्यानांत ठेवावयास हवा. शरीराचा कसलाहि व्यय विद्यार्थीदशेंत होतां कामा नये. विड्या, चिरूट इत्यादि ओढल्यानें किंवा तसलींच कांहीं व्यसनें जडवून घेतल्यानें शरीराचा व्यय होतो कीं नाहीं हें कोणीहि माहितगार सांगूं शकेल. या व्ययाचा परिणाम तत्काळ न दिसेल. व्यय ताबडतोब घडतो असें नाहीं. पण शरीराची तकतकी या निरुपद्रवी दिसणाऱ्या व्यसनांनीं निःसंशय कमी होत

जाते. केवळ शिष्टाचार म्हणून, फॅशन म्हणून, असल्या बारिक सारिक उपाधी विद्यार्थीपणांतच मुलांना जडतात; आणि त्यांचा परिणाम आज झाला नाहीं तरी उद्यां खासच होतो. म्हणून प्रापंचिक बनेतोंपर्यंत, म्हणजे विद्यार्थीदशेंत, शरीराचा कसलाहि व्यय होऊं न देण्याची खबरदारी विद्यार्थ्यानें घेतली पाहिजे. विद्यार्थी जितके दिवस शिकत राहील तितके दिवस त्याचें शरीर अव्यय राहील अशी कल्पना करून चालणें चुकीचें आहे. सध्यां किती तरी विद्यार्थ्यांना जबरदस्तीचें ब्रह्मचर्य पाळावें लागतें. यांतले बहुतेक सारे तरुण लोक शरीरतः शुचिर्भूत राहातात यांत संशय नाहीं. परंतु मनानें ते लोक तितके शुचिर्भूत रहात असतील असें समजणें अगदीं चूक आहे. जों जों वयोमर्यादा वाढत जाते तों तों मनाची चलबिचल जास्त होत जाते. आणि मग तें बिचललेलें मन शरीराला अव्यय राहूं देत नाहीं; म्हणून आपल्याकडील हवामान आणि आपली आयुर्मर्यादा हीं लक्षांत घेतां विद्यार्थ्यांचें लग्न एकवीस बावीस या वयाला व्हावें असें माझें मत आहे. मागें सांगितल्याप्रमाणें येथून पुढच्या काळांत, सामान्यपणें असें म्हणतां येईल कीं विद्यार्जनाचें काम वीस वर्षांच्या वयाला संपूं लागेल. असें झालें म्हणजे शरीराची अव्ययता टिकून राहाण्याची मर्यादा आणि विद्यार्जनाचें काम हीं बरोबरच संपतील. आपलें लग्न लवकर होत आहे असें विद्यार्थ्याला वाटणार नाहीं. कारण शरीरानें तो या वयांत लग्नाला पात्र बनलेला असेल आणि विद्येनें मिळविता झाला असेल. या वयांत त्याचें लग्न झालें म्हणजे त्याच्या वासनांवर अनुपशमितपणाचा ताण पडणार नाहीं, आणि त्याचें मन कोणच्याही बौद्धिक व्यवसायाला किंवा प्राथमिक आकांक्षेच्या यशसंपादनाला मोकळें राहील. मागील एका लेखांत मीं सांगितलेंच आहे कीं मुली सतरा ते एकोणीस या वयांत असतांना लग्नाला खुषीनें तयार होतील. दोघांचेंहि शारीरिक हित लक्षांत घेतां सतरा ते एकोणीसपर्यंत मुलींचें आणि वीस ते बावीस वर्षांपर्यंत मुलांचें लग्न झालेलें चांगलें. नमुनेदार विद्यार्थ्यांचें मी हेंहि एक लक्षणच समजतों कीं, सर्व गोष्टी यथाकाल झाल्यानें त्याच्या शरीराची अव्ययता टिकून रहावी.

या विद्यार्थीदशेंतच त्याच्या मनाच्या आणि बुद्धीच्या निरनिराळ्या शक्ती वाढीस लागावयास हव्या. लहानपणापासूनच त्याची पाठ करण्याची शक्ति वडील माणसांनीं वाढीस लावावयास हवी; आणि समजूं लागल्या-वर, आपण नमुनेदार विद्यार्थी व्हावें, असें जर त्याला वाटत असेल तर ही शक्ति त्यानें द्विगुणित करायवास हवी. पाठांतराची लाज बाळगणें हें रानटीपणाचें लक्षण आहे. मानवी प्राण्यानें ज्या शक्तींचा विकास जाणून-बुजून केलेला आहे त्या शक्ती वाढत ठेवणें आणि त्यांचा वापर करणें हें प्रगतीचें लक्षण आहे. जो पुष्कळ पाठ करतो त्याच्यापुढें नाना प्रकारचीं ज्ञानें नेहमीं हात जोडून उभीं असतात; आणि त्यानें खूण करतांच तीं त्याच्या सेवेला सादर होतात. जे पाठ करीत नाहींत त्यांना बारीकसारीक कामासाठींसुद्धां कोश पहावे लागतात, संदर्भस्थळें हुडकावीं लागतात, किंवा कोणाला तरी जाऊन विचारावें लागतें. हा सर्व कालाचा अपव्ययच होय. आणि जर हें केलें नाहीं तर अनिश्चित ज्ञानावर विसंबून बसून त्याला आपलीं विधानें करावीं लागतात. म्हणून लहानपणच्या काळांत वस्तू स्मृति-निबद्ध करण्याची संवय वाढविली पाहिजे. कमावणें हा शब्द केवळ कात-ड्यालाच लागूं नाहीं; तो मनाच्या शक्तींनाही लागूं आहे. स्मृति एकदां कमाविली म्हणजे ती समावेशक आणि चिकट बनते. म्हणजे तिच्या कोशांत पुष्कळ वस्तू मावतात आणि त्यांचा कबजा ती सहसा सोडीत नाहीं. हें भांडवल माणसाला मरेतोंपर्यंत पुरतें. म्हणून नमुनेदार विद्यार्थी बनूं इच्छिणारानें पाठांतराचा झपाटा कायम ठेविला पाहिजे.

शुद्ध ज्ञानाची उपासना ही शब्दसंहति मागें एके ठिकाणीं आले-लीच आहे. तोच खरा खरा विद्यार्थी, कीं जो विद्येवर प्रीति करतो. अर्थ म्हणजे साधावयासारखी गोष्ट; म्हणून विद्यार्थी म्हणजे विद्येचें साधन करूं इच्छिणारा माणूस. या माणसाची विद्येवरच प्रीति असावयास हवी. जी विद्या किंवा जें ज्ञान तात्कालिक मतांनीं, घोषणांनीं किंवा आग्रहांनीं चोपडलेलें

असेल तें, ज्ञान या पदवीवर स्थिरच राहूं शकत नाहीं. म्हणून केवळ शुद्ध ज्ञानावर त्याची भक्ति जडावयास हवी. अमक्याला टोला देण्यासाठीं, तमक्याला वरमावयास लावण्यासाठीं, अमक्याचें उणें काढण्यासाठीं, किंवा पगदस्तीपणानें तमक्याची रूपहानि करण्यासाठीं, हातीं आलेल्या ज्ञानाचा उपयोग होण्यासारखा आहे, हें पाहून जो मनांतल्या मनांत खूष होतो तो खरा विद्यार्थी नव्हे. इतर गोष्टींनीं सर्वथा अनवलिप्त अशा ज्ञानाचाच संग्रह करीत रहाणें हें खरें खरें विद्यासाधन होय; म्हणून ज्ञानाचा अर्थ माहिती असा करून विद्यार्थ्यानें या माहितीचा विशाल संग्रह आपल्यापाशीं तयार करावा. संग्रहाचें एक साधन स्मृति हें आहे खरें; पण तेवढ्यानें भागण्यासारखें नसतें म्हणून टिपणें—टांचणें करण्याची निरलस संवय विद्यार्थ्यानें जडवून घेतली पाहिजे. मधुकरवृत्ति या ज्ञानसंग्रहाच्या कामीं फारच उपयोगी पडते. पण जमा केलेला मध जपून ठेवण्याची व्यवस्था मधमाशी करते त्याप्रमाणेंच विद्यार्थ्यानें संपादित ज्ञान जपून ठेवण्याची व्यवस्था केली पाहिजे. या संग्रहित केलेल्या ज्ञानाकडे त्यानें आपली दृष्टि पुनःपुन्हा वळविली पाहिजे. याचा अर्थ असा कीं, उपासना आणि उपस्थिति या दोहींकडे आदर्श विद्यार्थ्याचें सारखेंच लक्ष असा वयास हवें.

केवळ बुद्धिगम्य विषयांचें अध्ययन करीत राहणें हेंहि त्याचें मन खुजें बनवील. त्याचा भावकोश चांगला पुष्ट व्हावयास हवा आणि यासाठीं निरनिराळ्या प्रकारचीं वाङ्मयें विद्यार्थ्यानें अवश्य वाचलीं पाहिजेत. विद्यार्थी लोक चावट वाङ्मयें वाचतात असा आरोप जे कोणी करतात, त्यांनीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं तसलीं वाङ्मयें लिहिणारे चावट लेखक समाजांत असतात. म्हणजे पहिला गुन्हेगार लेखक असतो, विद्यार्थी नव्हे. आतां माणसाच्या मनाची मूळ प्रवृत्ति लक्षांत घेतां इकडे तिकडे कांहीं वास घेत किंवा हुंगत फिरणें ही बुद्धि त्याच्या ठिकाणीं उपजतच असते असें दिसून येईल. आईबाप किंवा शिक्षक यांची पाखर या ठिकाणीं

उपयोगी पडेल. विद्यार्थ्यांच्या आवडीनावडी लहानपणींच बनविणें हे या दोघांच्याहि हातीं असतें. अमुक गोष्ट चांगली कां, आणि तमुक गोष्ट वाईट कां, याला चांगल्या रुचीचें कां म्हणावें आणि त्याला वाईट रुचीचें कां मानावें, हा तत्त्वज्ञानांतला गंभीर प्रश्न असतो. पण तो तसा असला म्हणून आरंभापासून सर्वच गोष्टींविषयीं आपल्या ठिकाणीं भ्रम उत्पन्न करून घेणें आणि लोकांनाही भ्रमांत पाडणें हा उद्योग कोणी करूं नये. ज्ञानाच्या पुढच्या पुढच्या स्तबकांत मंत्रचळेपणा उत्पन्न झाला तरी चालतो. परंतु माणसाचें जें समुच्चित शहाणपण आहे त्यांतील बरेंचसें संशयातीतच बनलेलें आहे. आणि म्हणून अमुक गोष्ट चांगली किंवा तमुक गोष्ट वाईट असें मुलांना सांगावयास कोणी कचरण्याचें कारण नाहीं. अशा रीतीनें सदभिरुचीचें बीज विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं जर रुजविलेलें असलें तर विद्यार्थ्यांनें तें आपल्या प्रयत्नानें वाढीस लाविलें पाहिजे; आणि त्या रुचीचा अभिमान त्याचे ठिकाणीं उत्पन्न झाला पाहिजे. त्याच्या शब्दांत आणि कृतींत हीच सदभिरुचि स्वच्छ उमटलेली दिसावी. कित्येक विद्यार्थ्यांना बेहोष होऊन अद्वातद्वा बोलण्याची खोड लागलेली असते. ग्राम्य, चटोर, टारगें असें जें जें कांहीं असेल तेंच भकण्यांत कांहीं विशेष शूरपणा आहे अशी अवास्तव कल्पना कित्येकांच्या मनांत दृढ झालेली असते. असल्या विद्यार्थ्याला नमुनेदार हें नांव कधींही मिळावयाचें नाहीं. सदभिरुची आणि तिच्यामुळें प्राप्त झालेली शालीनता हीं आदर्श विद्यार्थ्यांचीं खरीं खरीं भूषणेंच होत.

अशा विद्यार्थ्यांच्या मनाचे आवेग औदार्याचे असावेत. कोणाचें कांहीं अडलें, कोणी संकटांत असलें, कोणावर कांहीं भलतीच तोहमत आली तर त्याच्या साहाय्याला धांवत जावें ही मनाची ऊर्मि विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं नेहमीं दिसून यावी. सामान्यपणें कोणाही माणसाच्या मनांत ही ऊर्मि उत्पन्न व्हावयास हवीच. पण ज्याला विद्येचा संस्कार झालेला आहे त्याच्या

ठिकाणीं तर हा आवेग उत्कर्षानें दिसावयास हवा. आपण विद्या शिकतों म्हणून कोठेंतरी घोंगट घेऊन बसणें आणि समाजाशीं तुसडपणानें वागणें हें मनुष्यपण वाढीस न लागल्याचें चिन्ह आहे.

ज्ञानसंपादनाच्या कामीं परावलंबनाची सवय विद्यार्थ्याला फार लवकर जडते. पास होण्यासाठीं कोणाचा तरी ठेका घ्यावा आणि तुरुतातुरुत वेळ निभावून न्यावी अशी वासना त्याला उत्पन्न होते. या सवयीचा अंकुर त्याच्या मनांतून लहानपणींच खुडून टाकला पाहिजे. कोशवाङ्मयाची आवड त्याला एकदां लागली म्हणजे दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्यांत त्याला अवमान वाटूं लागेल. माझा मी शब्द काढीन; अनेक अर्थ निघाले तर प्रस्तुत स्थलीं कोणता लागू पडतो हें चालनापूर्वक पाहीन; स्थल, व्यक्ती, आणि प्रसंग यांचें संदर्भ त्या त्या कोशांतून मीच हुडकून काढीन; असें विद्यार्थ्याला वाटावें. ज्ञानाच्या उगमस्थानीं जाण्यांत एक विशेष प्रकारचा आनंद असतो. नमुनेदार विद्यार्थ्याला या आनंदाची लज्जत लागावयास हवी. टिपणी देणारे लोक सर्वच वाईट असतात असें नव्हे. प्रत्येक कामांत चांगले आणि वाईट असे दोन प्रकारचे लोक असतातच; पण टिपणीवर भागविणें हें मुळांतच नुकसानकारक आहे. कै. प्रि. राजवाडे यांनीं आपल्या मुलाला केवळ कोशवाङ्मयावर अभ्यास करावयास शिकविलें होतें. तोच प्रकार सर्व लोकांच्या घरांत व्हावयास हवा. सर्व लोकांच्या घरांत सर्व प्रकारचे कोश उपलब्ध होणें हें कठीण असतें हें खरें आहे; पण असलेल्या कोशांचा तरी उपयोग विद्यार्थी कितीसा करतात हें पाहावें, म्हणजे मी म्हणतों याचें मर्म ध्यानांत येईल. कॉलेजमध्यें अभ्यास करीत असलेल्या मुलांना जर एकादा शब्द काढावयास सांगितला तर तीं गांगरल्यासारखीं होतात. या दोषाचा निचराच व्हावयास हवा. मूळ कोश पहाण्यानें विद्यार्थ्याचें भरपूर समाधान होईल. आणि कोशकारानेंही ज्या ग्रंथांतून हा उतारा केला असेल तो मूळ ग्रंथ पहाण्याची उत्सुकता सुद्धां त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होईल. स्थळ,

व्यक्ति, आणि प्रसंग हीं मूळच्या परिवेषांत पहावयास सांपडणें हें मनाला समाधान उत्पन्न करतें; आणि विहिरींत उतरून ओंजळी भरभरून पाणी प्याल्यानें तान्हेल्या माणसाचा जीव जसा संतुष्ट होतो तसा त्या संदर्भाच्या समृद्धीनें विद्यार्थी हरखून जातो. म्हणून विद्यार्थ्याला ही संवय लहानपणींच लागली पाहिजे. एकदां लागलेली ही संवय त्याची सोबत जन्मभर करील.

वर सांगितलेल्या गुणांच्या जोडीला नमुनेदार विद्यार्थ्याच्या अंगीं जो आणखी एक गुण असावयास हवा तो सांगून त्याच्या कांहीं शारीरिक गुणांकडे वळतों. विद्यार्थ्याची भूमिका संचयकाराची असली पाहिजे. वर एके ठिकाणीं मधुकरवृत्तीचा उल्लेख केलेलाच आहे. जें सांपडेल तें त्यानें टिपून घेतलें पाहिजे; आणि वानर जसें गळ्यांतल्या पिशवींत खाद्य पदार्थ साठवून एरवींच्या वेळीं तो चघळत बसतें तोच प्रकार विद्यार्थ्यानींहि करावयास हवा. मुख्यतः डोळे आणि कान यांच्या द्वारां प्राप्त होणारीं ज्ञानें त्यानें भराभर साठविलीं पाहिजेत. स्मृतीवर किंवा कागदावर त्यांचा उतारा केला पाहिजे आणि मग एरवींच्या वेळीं त्यांचें चिंतन केलें पाहिजे. केवळ उतरलें, घोकलें, पाठ केलें; पण वेळेवर काटा आल्याबरोबर आपण त्या गांवचे कोणी नव्हें असें समजून विद्यार्थी अंग झाडून बाहेर पडले तर ते विद्यार्थी नव्हेत. मनांत साठाविलेल्या ज्ञानाचें चिंतन जो विद्यार्थी एरवींच्या वेळीं करीत नाहीं त्याच्या मनःपिंडाशीं तें ज्ञान एकजीव होणार नाहीं. सूक्ष्म आणि सौम्य चर्वणानें त्या त्या ज्ञानकणांची रुचि त्याच्या अनुभवास जास्तजास्त येऊं लागेल. म्हणून ही चिंतनाची म्हणजे रवंथ करण्याची संवय नमुनेदार विद्यार्थ्याच्या अंगीं पक्की बाणली पाहिजे. ज्ञान म्हणजे डोईवरचा भारा आहे, असें त्याला वाटतां कामा नये. हा भारा [illegible]दा परीक्षकाच्या दारांत नेऊन आदळला म्हणजे आपलें काम झालें, असें त्यानें समजूं नये. ज्ञान हें पुष्टिकारक खाद्य आहे आणि तें मनाशीं एकजीव झाल्यानें आपल्या बुद्धीला आणि स्वभावाला बळकटी प्राप्त होईल

हें त्यानें ओळखलें पाहिजे. परंतु ज्ञानाचा संचय झाला आणि तें अंगीं लागलें तरी मताढ्यता ही त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होऊं नये. पुष्कळ विद्यार्थी अकालींच ‘ठाम मतें’ सांगूं लागतात आणि प्रतिपक्षाच्या संबंधानें अवहेलनेची बुद्धि बाळगूं लागतात. विद्यार्जनाला ही प्रवृत्ति सर्वथा बाधक आहे. तिचा प्रादुर्भाव जर का एकदां मनांत झाला तर, परिच्छेदाच्या प्रारंभीं सांगितलेला, ज्ञानसंचयाचा हव्यास कमजोर होईल. आणि भलत्याच वेळीं विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं आतंडेलीपणा आणि उर्मटपणा यांच्या छाया दिसूं लागतील.

नमुनेदार विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं अपेक्षित असलेल्या शारीरिक गुणांचाही उल्लेख करावयास हवा. शरीर स्वच्छ ठेवणें ही किती साधी गोष्ट आहे ! पण कितीतरी विद्यार्थी या स्वच्छतेची उपेक्षा करतात. अलीकडे रोजच्या स्नानाची सुद्धां कांहीं कांहीं विद्यार्थी उपेक्षा करतात असें ऐकतों. याचें खरोखर नवल वाटतें. आंघोळ केल्याशिवाय मुखांत अन्न घालणार नाहीं, ही पूर्वींची रूढी खरोखर सोन्याच्या मोलाची आहे. शरीराची अंतर्बाह्य शुचिता ही आपल्या संबंधानें लोकांच्या मनांत आवड उत्पन्न करते इकडे विद्यार्थ्यांचें लक्ष असावयास हवें. दंतधावन हें स्नानाइतकेंच महत्त्वाचें आहे; पण चौकशी केली तर दिसून येईल कीं, दांतांवरून केवळ बोट फिरवून चहा पिण्यास जाणारे कित्येक दुर्भागी विद्यार्थी तुम्हांस भेटतील. यांतूनच मग पुढें तोंडाला वास मारणें इत्यादि प्रकार सुरू होतात, आणि यांच्याशीं बोलावयाचें म्हणजे संकट आहे असें लोकांना वाटूं लागतें. हीच गोष्ट वस्त्रप्रावरणांनाही लागू आहे. दारिद्र्याची सबब दर वेळेला पुढें करणें हें केलेला उपदेश पत्करावयाचा नसल्याचें द्योतक आहे. गरिबीचा कपडा सुद्धां धुतल्यानें स्वच्छ होतो. घामटपणांत आणि ओंगळपणांत सुख मानून आपल्या अंगीं कांहीं एक निराळेंच वैशिष्ट्य आहे, असें भासवण्याचा मोह अनेकांना होतो. पण गचाळेपणा किंवा

गयाळीपणा हें जसें कौतुकाचें अंग होऊं शकत नाहीं, तसेंच ओंगळपणाही होऊं शकत नाहीं. म्हणून नमुनेदार विद्यार्थ्यानें स्वच्छतेची कसोशीच केली पाहिजे. सृष्टीनें आपल्याला जें रूप दिलें असेल आणि जो वर्ण दिला असेल तो मोठ्या तरतुदीनें संभाळून धरणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. फाजील नखरा किंवा छानछुकी हीं जरी करूं नये, तरी टापटीप आणि रेखीवपणा यांचा अवलंब मात्र प्रत्येक विद्यार्थ्यानें केलाच पाहिजे. Cleanliness is next to Godliness, या म्हणीचें मर्म विद्यार्थ्यानें ओळखलें पाहिजे. Godliness ही मनाची स्वच्छता होय, आणि Cleanliness ही शरीराची स्वच्छता होय. शारीरिक स्वच्छतेच्या लगत पुढचा गुण म्हणजे Godliness हाच होय! इतका या शारीरिक स्वच्छतेचा महिमा आहे.

येथून पुढें आपल्या देशांत कोणते प्रसंग उद्‌भवतील याची कल्पना करवत नाहीं. आणि म्हणून सर्व काळीं सर्वच विद्यार्थ्यांना ज्या गुणांचा उपयोग होण्यासारखा आहे त्यांचेंच अल्पसें विवेचन केलें आहे. जर काळ चमत्कारिक रीतीनें पालटला आणि विद्यार्थ्यांच्या जीविताची बैठकच बदलली तर त्यांना आणखी कांहीं निराळें सांगावें लागेल.

---